
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'तपशील' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (द्वैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे प्रकाशक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादकमंडळातील सदस्य ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादक-मंडळ ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या (द्वैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि तपशील संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका




# तपशील

अंक १३ खंड ३ २०००

**संपादक**
श्री. नाना जोशी
डॉ. मंगला सरदेशपांडे

**रचना**
हर्मिष देव्हारे

**अक्षरजुळणी**
अभिजित पंडित

**मुखपृष्ठावरील चित्र**
प्रख्यात फ्रेंच लेखक मार्सेल प्रूस्त यांचे

**मुद्रण व मुखपृष्ठ छपाई**
विजय राणे,
विजय एंटरप्रायझेस, कळवा, ठाणे.

**मालक, मुद्रक, प्रकाशक आणि पत्रव्यवहार**

श्री. नाना जोशी
४ अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई - ४०० ०१२.

## अनुक्रमणिका



**'तपशील'चा तपशील**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १००/- * (६ अकांची) वार्षिक वर्गणी रुपये २०१/-
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात पंधराव्या अंकापासून वर्गणी पाठवली तरी तेराव्या अंकापासूनच अंक देण्यात येतील.

अनुक्रमणिका



## संपादकीय

तपशीलचा हा तिसऱ्या खंडातील पहिला अंक, या अंकात अवलिया संशोधक, लेखक, गुप्तहेर, अनेक भाषा सहजपणे आत्मसात करणारा ही यादी आणखीही लांबविता येईल– सर रिचर्ड बर्टन यांच्याविषयी 'अ रेज टू लिव्ह' या लेखात वाचावयास मिळेल. जगद्विख्यात फ्रेंच लेखक प्रूस्ट यांचेवरील लेखमाला या अंकापासून चालू होत आहे. आजवर मराठीत या लेखकावर जे काही प्रसिद्ध झाले आहे, त्यापेक्षा कितीतरी पटीने ही लेखमाला उजवी व दर्जेदार आहे, हे वाचकांना पटेल असा विश्वास आहे. लॉर्काबद्दल तपशीलमध्ये यापूर्वी एक लेख आला होता. त्यातील त्रुटी जयश्री जुन्नरकरांच्या 'पुन्हा एकदा लॉर्का' या लेखाने काही प्रमाणात दूर केल्या आहेत. जॉर्ज ऑरवेल या जगद्मान्य लेखकाकडे एका नव्या दृष्टिकोनातून 'लेखक जॉर्ज ऑरवेल ते संत जॉर्ज ऑरवेल' या लेखात पहाण्यात आलेले आहे. पेन्विन/पेलिकन पुस्तकासंबंधी आज साठी-सत्तरीच्या घरात असलेले जे लोक आहेत त्यांना त्या पुस्तकांची महती सांगितलीच पाहिजे असे नाही, याचे कारण त्यांना स्वानुभवावरून त्याची प्रचिती आलेली आहे. पण या ग्रंथ मालिकेचा कल्पक प्रकाशक ॲलन लेन यांच्याबद्दल फारच थोडी माहिती मराठीत उपलब्ध आहे. सौ. समुती जोशी यांच्या लेखाने ती उणीव काही प्रमाणात भरून निघावी. सर्वसामान्यपणे पारितोषिक म्हटले की त्याबद्दल वादविवाद आलेच. जगप्रसिद्ध बुकर पारितोषिक त्याला अपवाद नाहीत. *(हे वादविाद होतात. म्हणून माझे मित्र व क्रांतीकारकांची, तपशीलात जाऊन त्यांची चरित्रे लिहणारे श्री. वि. श्री. जोशी आपले ग्रंथ बक्षिस स्पर्धेत कटाक्षाने पाठवीत नसत. परंतु त्यांचे ग्रंथ हे नुसते वाचनीय नसून, ते संग्राह्य आहेत याची पावती त्यांच्या वाचकांनी त्याना-त्यांचे अनेक ग्रंथ सहाव्या-सतव्या आवृत्तीत आणून दिलेली आहे. असो हे विषयांतर झाले)* ते वादविवाद कशा प्रकारचे असतात व पारितोषिकांसाठी विचाराधीन कादंबऱ्याना जनमानसात किती प्रतिसाद असतो याबद्दल बुकर पारितोषिक या नोंदीत वाचावयास मिळेल. दुसरी नोंद पूर्ण विरामाबद्दल. इतर अनेक गोष्टीप्रमाणे 'विरामचिन्हे' ही आपण साहेबाकडून घेतली. पण 'पूर्णविरामाची' महती या नोंदीत आठवेल. तसेच इतिहासकार राजवाडे हे किती प्रज्ञावान होती याची चुणूकही आपणास त्या नोंदीत आढळून येईल. या दोन्ही नोंदी सौ. सुमती जोशी यांनी लिहलेल्या आहेत. हे सारे साहित्य वाचकाच्या पसंतीस उतरेल अशी अपेक्षा.

या अंकापासून 'वैयक्तिक कारणामुळे' डॉ. आनंद जोशी हे संपादक मंडळावर राहू इच्छित नाहीत असे त्यांनी कळविले आहे. *डॉ. मीना वैशंपायन* यांनी *मला संपादक म्हणून काम करता येणार नाही.* असे कळविले आहे. तसे असले तरी तपशीलमध्ये त्या लेखन करणार आहेत. या दोन्ही संपादकानी कळविल्याप्रमाणे त्यांची नावे संपादक मंडळातून वगळ्यात आलेली आहेत. या दोघांनी आजवर जे काही सहकार्य दिले त्याबद्दल मन:पूर्वक आभार.

तपशीलच्या गेल्या अंकात 'संपादकीय डुलकी नव्हे चक्क झोप' आल्यामुळे एक महान घोडचूक झाली. *जयश्री जुन्नरकर यांनी लिहलेला 'धुके व रात्र' हा लेख डॉ. मंगला सरदेशपांडे यांच्या नावावर दाखविण्यात आला. या दोघांनीही ह्या चुकीबद्दल माफी करावी ही विनंती.*

**– नाना जोशी**

---

अनुक्रमणिका

# निमित्त

## 'अ रेज टू लिव्ह'

**- अ. ना. महाशब्दे**

कॅप्टन सर रिचर्ड बर्टनवर लिहावयाचा चरित्रकारांना कंटाळा आला असल्याचं दिसत नाही. व्हिक्टोरियन काळातील हा शोधक-प्रवासी, लेखक आणि अचाट कृत्ये करणारा साहसी हयात होता तेव्हापासून त्या माणसाचे गूढ उकलण्याचे प्रयत्न सुरू झाले होते. १८८० मध्ये, म्हणजे त्याच्या निधनाआधी दहाएक वर्ष, त्याच्यावरील पहिले पुस्तक प्रसिद्ध झाले आणि त्यानंतर पुस्तके प्रसिद्ध होत राहिली. 'अ रेज टु लिव्ह : अ बायोग्राफी ऑफ रिचर्ड बर्टन अँड इसबेल बर्टन' ही अलिकडच्या काळातील लक्षणीय भर. लेखिका : मेरी एस्. लोव्हेल (Lovell). आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या चरित्रग्रंथाहून हा ग्रंथ जाडजूड आहेच, शिवाय सर्वांहून अधिक काटेकोर संशोधनावर आधारित आहे. यात बर्टनची पत्नी इझबेल हिचं जीवन सांगोपांग रेखाटलेलं आहे. असं चित्रण यापूर्वी प्रकाशित झालेल्या चरित्रांमध्ये कुणी केल्याचं आढळून येत नाही.

बर्टनचं अवघं आयुष्य धावपळीचं, धकाधकीचं. एकाच वेळी नानाविध परस्परविरोधी गोष्टी करण्याची कला त्याला अवगत होती. ब्रिटिश समाजाचा कॉनसल आणि तोफांनी सज्ज असलेल्या छोट्या युद्धनौकेवरील मुत्सद्दी. आपल्या काळाच्या संवदेनशीलतेला धक्का देणारा 'आडदांड डिक', 'गौरवर्णीय निग्रो'. 'लुसिअड्स' या १६ व्या शतकातील पोर्तुगीज महाकाव्याचा आणि 'अरेबियन नाइट्स' चा भाषांतरकार. हिंदुस्थानातील अश्लील पुस्तकांचा वाकनीस. 'व्हाइट नाइल'चा उगम शोधून काढणारा शोधक प्रवासी. मक्का आणि मदिना येथील यात्रेला स्थानिक मुसलमानाचा वेष करून जाणारा जिगरबाज माणूस. आणि सिंधी, ज्यू, बलुची, वेल्श आणि 'अन्य अर्धवट जंगली वंश' यांच्याबद्दल आपल्याला निव्वळ तुच्छता आहे हे इतरेजनांना ठाऊक असावं अशी इच्छा बाळगणारा बेदरकार असामी. त्याला ओढ होती गावरात जीवनाच्या फिरत्या गतीची. त्यापायी नाना प्रदेश त्यानं पायाखाली घातले. परंतु कुठलाही प्रदेश त्याला आपलासा करू शकला नाही. त्याच्या भ्रमंतीची गतीच एवढी विलक्षण होती की, तिनं कुठल्याही प्रकारची सलगी करायला पायबंद घातला. त्यानं साठ पुस्तकं लिहिली आणि एकोणतीस भाषा त्याला अवगत होत्या. परंतु कुठल्याही प्रदेशावर एकाग्रचित्त होणं त्याला जमलं नाही आणि कुठलीही संस्कृती त्याला प्रभावित करू शकली नाही.

माणूस म्हणून बर्टनची आपल्याला अधिक ओळख पटू शकली असती, आपल्याला तो अधिक धक्के देऊ शकला असता; गूढाची किल्ली आपल्याला मिळू शकली असती, पण या शक्यतांची त्याच्या विधवेच्या आततायी कृत्यानं राखरांगोळी केली. त्याच्या मृत्यूनंतर तिनं स्वत:ला कोंडून घेतलं आणि 'निर्हेतुकतेच्या पागल झटक्या'त त्याची खाजगी कागदपत्रं, अपूर्ण कामोद्दिपक हस्तलिखितं आणि त्याच्या डायऱ्या जाळून टाकल्या. आख्यायिकेनुसार सोळा दिवस हे कामं चाललं होतं. असं सांगितलं जात होतं की लेडी बर्टन ही फार सोवळी आणि संवेदनाशील बाई होती आणि त्या काळातील नैतिक मूल्यं शिरोधार्य मानणारी होती. परंतु कठोर संशोधक लेव्हेलनं बर्टनसंबंधीचा उपलब्ध असलेला सारा पुरावा धांडोळून या प्रचलित आख्यायिकेला कायमची मूठमाती दिली.

खरं आहे, कर्तव्यदक्ष पत्नी इझबेल हिनं आपल्या नवऱ्याची कागदपत्रं डोळ्याखालून घातली, हे काम तिनं एकटीनं केलं. आजवर ती जे करत आली होती तेच तिनं केलं. आपल्या पतीच्या वैयक्तिक गोष्टींची काळजी घेतली, त्याची हस्तलिखितं वेगवेगळी करून ती नीट बांधून ठेवली. 'देणी दे, बाडबिस्तरा बांध आणि अनुसर' हा कायमस्वरूपी निरोप जगभर भटकत असताना बऱ्याच प्रसंगी बर्टननं आपल्या बायकोला दिलेला होता. आणि त्याच्या निधनानंतरची कामगिरीही याला अपवाद नव्हती. निर्हेतुकतेच्या झटक्यात तिनं जाळलं होतं ते मृत्यूपूर्वी पूर्ण करीत आणलेल्या 'द सेंटेड गार्डन'चं भाषांतर. Al Raud al atir wa nuzhat al khatir या प्राचीन कामोद्दिपक अरेबियन हस्तलिखितावर ही कृती आधारित होती. १८५० मध्ये प्रस्तुत हस्तलिखित एका फ्रेंच अधिकाऱ्याला अल्जेरियात सापडले होते. त्याचे Le jardin Parfume फ्रेंच भाषांतर १८७६ मध्ये झाले होते. या नावात हा अनुवाद बर्टननं स्वत: १८८६ मध्ये इंग्रजीमध्ये आणला होता, 'द परफ्युम्ड गार्डन ऑफ द शेख नफ्जवी' या नावानं. फ्रेंच तर्जुम्यामध्ये मूळातील कामोद्दिपक भाग बऱ्याच प्रमाणात सोवळा करण्यात आला होता; एक मोठं प्रकरण तर संपूर्ण गाळण्यात आलं होतं, आणि ते मूळ कोठे असेल ते शोधून काढण्याचा घोर बर्टनला लागून राहिला होता. 'द सेंटेड गार्डन' या नव्या शीर्षकाखाली ते प्रकाशित करण्याची त्याची फार इच्छा होती. त्याचा पाठपुरावा करत करत तो अल्जेरियात पोचला होता पण तिथून त्याला हात हलवत परतावं लागलं होतं. तिथं त्याला ज्या प्रती आढळल्या होत्या त्या केवळ संक्षिप्त आणि नासधूस झालेल्या. एकूण शोधाची समाप्ती तीव्र दु:खात झाली होती. आणि इझबेल बर्टननं आगीच्या भक्ष्यस्थानी टाकलं होतं ते केवळ या प्रवासाची निष्फळ निष्पत्ती. बर्टन त्याच्या हयातीतच चढाओढ लागावी अशी मालमत्ता बनला होता. कामोद्दिपक साहित्याचे विरोधक आणि बर्टनला आपल्यापैकी एक समजणारा स्वतंत्र विचाराचा छोटा गट असे उघड उघड दोन तट पडले होते. यातूनच प्रसृत झाली एक आख्यायिका : बर्टनच्या 'करीयर'चा कलशाध्याय ठरली असती अशा कृतीपासून इझबेलनं भावी पिढीला वंचित केलं.

एका शतकानंतर, हा व्हिक्टोरियाकालीन झगडा बर्टन पंथीयांवर सोपवणं इष्ट. कारण रिचर्ड बर्टन जाणून घेण्यासाठी सज्जड पुरावा, सारी कागदपत्रं आपल्याला उपलब्ध आहेत. जगाच्या पाठीवरील हरेक विषयांवर त्यानं लिहिलं आहे : समाजशास्त्र आणि 'सेक्स', हिंदू भूतखेतं आणि मध्य आफ्रिकेतील तलावांचा प्रदेश, सिंधू खोऱ्यात बहिरी ससाण्याच्या सहाय्यानं केली जाणारी शिकार, बायोनेटचे पाठ, ब्राझिल आणि एट्रुस्कन बोलोग्ना येथील पहाडी भाग, मक्का आणि मदिना आणि सोमालीलॅन्डमधील मज्जाव असलेले हस्सर शहर या ठिकाणी त्यानं शिरकाव करून घेतला होता. 'द सेंटेड गार्डन' ने त्याच्या आयुष्याला परिपूर्णता लाभली असती अशातला भाग नव्हता. दोन पुरुषामधला देहसंगाबद्दल तपशीलवार लिहून त्यानं समकालीनांमध्ये सनसनाटी निर्माण केलेलीच होती आणि दूर देशीच्या कामोद्दीपक कृत्यांची आणखीन एखादी कृती जगातल्या त्याच्या स्थानात आणखी काय एवढा बदल घडवून आणू शकली असती?

समग्र आत्मचरित्राचं आश्वासन बर्टननं दिलं होतं, परंतु आपल्या भ्रमंतीच्या कालक्रमवृत्तांताहून भरीव असा काही प्रयत्न करण्याच्या फंदात न पडणं बरं हे त्याच्या ध्यानी आलं असावं. तो आत्मचिकित्सक माणूस नव्हता आणि सखोल विचार करणाराही नव्हता. साम्राज्य शिखरावर असताना १८२१ मध्ये तो जन्मला आणि साम्राज्याला तडे जाण्यापूर्वी त्रिएस्तेमध्ये कॉनसल म्हणून १८६० मध्ये मृत्यू पावला. एवम्, साम्राज्याच्या ऱ्हासानं होणाऱ्या मानसिक क्लेशापासून त्याची सुटका झाली होती. साम्राज्याच्या दिमाखाला ज्यानं शान आणली होती त्या माणसाला हे साजेसंच घडून आलं होतं. ज्या माणसानं सिंधी हे आयरिशांप्रमाणं आळशी आणि कृतघ्न आहेत म्हणून एकेकाळी त्यांची वासलात लावली होती तो स्वतः अर्धा आयरिश होता. इंग्लंडचं लक्ष वेधून घेण्यासाठी त्यानं हरप्रकारे प्रयत्न केले होते. त्याची ती स्वाभाविक प्रवृत्ती होती. त्याची जडणघडणीची वर्ष युरोपमध्ये गेली होती. त्याची 'वैकल्पितता', व्हिक्टोरियन इंग्लंडच्या परिमाणबद्दलची त्याची बेचैनी, जी त्याला आयुष्यभर त्रस्त करत राहणार होती, यांचं मूळ त्याच्या कौटुंबिक परिस्थितीमध्ये आहे.

रिचर्ड बर्टनचा जन्म होण्याआधी, त्याचे वडील जोसेफ जिनेवामधील एका छोट्या ठाणबंद फौजेवर अधिकारी होते. त्यांना तिथून बडतर्फ करून अर्ध्या पगारावर ठेवण्यात आलं होतं. दैव आणि राजसत्तेचे राजकारण यांनी त्यांच्या प्रारब्धावर मोहर लावली होती. घडले होतं ते असं : चवथा जॉर्ज त्याच वर्षी राजपदी आरुढ झाला होता. कॅरोलिन ही त्याची पत्नी. तिला त्यानं सोडचिठ्ठी दिली होती. तिच्यापासून कायदेशीररित्या घटस्फोट मिळावा म्हणून राजा आतूर होता. प्रारंभीच्या भ्रमंतीमध्ये कॅरोलिनचं वास्तव्य काही काळ जिनेवामध्ये होतं. दाखवेगिरीची तिला हौस होती, आणि तिथली तिची वागणूक घटस्फोटाच्या कामकाजाच्या काळात विवाद्य होती. एका इटालियन तरुणाबरोबरचं तिचं 'फ्लर्टिंग' चर्चेचा विषय झाला होता. राणीच्या या स्वैर वर्तनाची चौकशी करण्यासाठी

अनेकांना पाचारण करण्यात आलं होतं, यात कॅप्टन जोसेफ बर्टनही होते. हे फर्मान होतं कमांडर-इन-चीफ लॉर्ड वेलिंग्टनचं. राजसत्तेच्या मर्जीनुसार राणीविरुद्ध साक्ष देण्यास त्यांनी स्पष्टपणे नकार दिला होता. या नकाराची परिणती त्याची बडतर्फी. वर्ष होतं १८२०.

या विचक्यानंतर, बर्टन कुटुंब फ्रान्सच्या अंतर्भागात तूरमध्ये पोचलं. पुढील काळात त्यांनी पिसा, नेपल्स, मार्सेल्स आदी ठिकाणी बिऱ्हाडं थाटली त्यांचा हा प्रारंभ. या भ्रमंतीचा परिणाम रिचर्ड आणि त्याचा धाकटा भाऊ एडवर्ड या दोन मुलांवर झाला. वडिलांनी त्यांची पाठवणी इंग्लंडला करेस्तोवर-रिचर्ड ऑक्सफर्डला आणि एडवर्ड केंब्रिजला- साचा तयार झालेला होता. त्यांच्या स्वतःच्या देशात ते परकीय होते. तिथलं कंटाळवाणं, उदास वातावरण, अन्न, हवामान, आणि शिष्टाचार, याबद्दल त्यांच्या मनात तिटकारा निर्माण झाला होता. शिक्षणपद्धतीतील दंडुकेशाही नीतितत्त्वे याविषयी त्यांच्या मनामध्ये चीड निर्माण झाली होती.

चर्चमध्ये करीयर करण्यासाठी ऑक्सफर्डला पाठवण्यात आलेल्या या तरुण पोराला त्यानं पदवी संपादन करण्याआधीच विद्यापीठामधून काढून टाकण्यात आलं. काय करावं कळत नव्हतं आणि जीव तर साहसासाठी उतावीळ झाला होता. अखेर त्याच्या वर्गातील तरुणांसाठी उपलब्ध असलेला मार्ग त्यानं निवडला. 'ईस्ट इंडिया कंपनी'च्या फौजेत दाखल झाला. नौदलातील एक कनिष्ठ अधिकारी म्हणून त्याची नेमणूक करण्यात आली. त्याचा भाऊ एडवर्ड थोरल्या भावाचाच मार्ग अनुसरणार होता. केंब्रिजमधून हकालपट्टी होताच तोही लष्करी सेवेत रूजू होऊन सिलोनची वाट धरणार होता.

१८ जून १८४२ रोजी मुंबईला जाण्यासाठी बर्टन जहाजावर चढला. चार महिन्यांचा जलप्रवास. या काळात बराचसा वेळ त्यानं जहाजावरील हिंदुस्थानी कर्मचाऱ्यांकडून हिंदी शिकण्यात घालवला. परक्यांबरोबरच्या जीवनाला, परक्या भाषांमधील दिनक्रमाला प्रारंभ झाला. त्याचबरोबर प्रारंभ झाला एका पद्धतीला, एका 'पॅटर्नला, जो भावी काळात अति-परिचित होणार होता : कल्पनेतील दूरस्थ स्थळांना भेटी देण्याविषयीच्या नवलाईची परिणती अखेर नैराश्यात.

मुंबईचं 'मोहक चित्रवत्' प्रथम दर्शन अल्पजिवी ठरलं. हॉटेल 'किळसवाणं' होतं, आणि तिथल्या खोल्या म्हणजे 'बेबंद पेट्या'. चहा आणि आमट्या माणसांच्या स्मृतिसंवेदनांना आयुष्यभर पछाडतील अशा. 'राज'च्या वसाहतीत समाजाचं त्यानं अवलोकन केलं : तो मध्यमवर्गीय समाज होता. 'आपली डोकी ज्यानं गमावलेली आहेत' असा, छोट्या व्यापाऱ्यांचे मुलगे आता घरी परतून 'जिल्ह्यांवर सत्ता गाजवत होते, लष्करी तुकड्यांना हुकूम फर्मावत होते, बग्गीमधून हिंडत होते . . . त्यांचे बापजादे वर्षभरात मिळवत होते त्याहून त्यांची महिन्याभराची कमाई अधिक होती.' या जगाच्या सामाजिक स्तरांविषयीची

माहिती त्यानं घाईघाईनं करून घेतली. त्याच्या ध्यानी आलं : राणीचं लष्कर कंपनीच्या लष्कराहून वरचढ होतं, तिचे अधिकारी बव्हंशी कनिष्ठ मध्यमवर्गातील होते.

त्याच्यापाशी वेळ भरपूर होता, महत्वाकांक्षा होती. काही फुकाच्या. उदाहरणार्थ, इथली परिस्थिती जे काही देऊ शकते त्याहून अधिकाची इच्छा धरणं. 'आणि अशा मूर्खांपैकी मी एक होतो.' त्यानं आपली अवघी शक्ती हिंदुस्थानातील भाषांवर प्रभुत्व मिळवण्याच्या कामी लावली आणि उत्सुकतेनं मुंबई सोडली आणि बडोदा येथील 'बॉंबे नेटिव्ह इन्फन्ट्रीच्या अठराव्या तुकडी'त दाखल झाला. शिपायांकडून कवायत करून घेणं हे त्याचं काम. 'राज'चे लैंगिक विशेषाधिकार त्यानं यथेच्छ उपभोगले. बुबुनामक नेटिव्ह रखेली त्यानं पदरी ठेवली. अनेक हिंदुस्थानी बायांबरोबर त्यानं लैंगिक जीवन व्यतीत केलं त्यांपैकी ही पहिली. साम्राज्याच्या नैतिक नियमावलीत बदल होऊ लागले होते : कडक नैतिक निर्बंध स्वैराचाराला आळा घालण्यासाठी लादण्यात आले होते. परंतु ही नियमावली बर्टनसाठी नव्हती. तो सांगतो, त्याची बुबु म्हणजे 'चालता बोलता शब्दकोश' होता. तिनं त्याला 'हिंदी व्याकरण शिकवलं', एवढंच नव्हे तर 'एतद्देशीय जीवनाच्या साऱ्या खाचाखोचा' समजावून दिल्या.

धक्का देण्याच्या प्रवृत्तीची झलक या तरुण अधिकाऱ्याच्या आयुष्याच्या सुरुवातीच्या काळात दृष्टोत्पत्तीस आली. हिंदुस्थानात नानाविध जगं होती आणि त्या साऱ्यात त्याला रस होता. १८४३ मध्ये, सर चार्ल्स नेपियरनं सिंध हा मोठा प्रांत काबीज केला आणि सिंधमध्ये जाण्याची संधी बर्टनला मिळाली. तिथं त्याला नेमून दिलेल्या कामामुळे हिंदुस्थानी जीवनाच्या अंतरंगात प्रवेश करणं त्याला शक्य झालं, शिवाय या कामगिरीनं 'सिंध ऑर, द अनहॅपी व्हॅली (१८५१) व 'सिंध, अँड द रेसीस दॅट इनहॅबिट द व्हॅली ऑफ इंडिया' (१८५१) या त्याच्या प्रारंभीच्या पुस्तकासाठी त्याला सामग्री पुरवली. दरम्यानच्या काळात त्यानं गोव्याला भेट दिली. गोव्यात १६ व्या शतकातील पोतुगीज महाकवी Luis Vaz de Camoens च वास्तव्य होतं. त्याच्याविषयीचं स्वारस्य त्याला जन्मभर पुरलं. पुढील काळात त्याच्या 'Lusiads' या महाकाव्याचे तो भाषांतर करणार होता.

साम्राज्याच्या दृष्टीनं 'एतद्देशिय बनणं' हे पाप होतं. नेटिव्ह जगात मिसळून जाणं म्हणजे अधोगती होती. शासनाला हवं होतं आपलं वेगळेपण जपणं, आपला वंश आणि आपलं अतीम साध्य याचं भान. परंतु या तरुण सामान्य कारभाऱ्यानं ही लक्ष्मणरेषा जुमानली नाही. पौर्वात्य भाषा त्याला अवगत होत्या, ऐकून ऐकून अन्य भाषा व बोली यांची त्यात भर घालत होता आणि त्यांची चेहरापट्टीही पौर्वात्याला साजेशीच होती. त्याचं रूप लक्षवेधी होती, जिप्सी सदृश, कृष्णवर्णी, वर आलेली गाळांची हाडं, काळेभोर डोळे, काळेकुळीत केस, काळीकाळी मिशी. एकूण, त्याचा चेहरामोहरादेखील त्याच्या जगामध्ये अलग होता, दुसऱ्या जगात खोलवर प्रवेश मिळवून देऊ शकणारा एक परवाना.

भेटीची माहिती त्यानं 'सोसायटी'ला दिली पण त्याबाबत जिथं तो नोकरीला होता त्या 'इस्ट इंडिया कंपनी'कडे वाच्यता केली नाही. कंपनीच्या डायरेक्टरांना अशा प्रकारची मोहीम भावणारी नव्हती. मुस्लीम भावना दुखावण्यास ते राजी होणारे नव्हते. त्या धार्मिक स्थळी आपल्या नोकरीत असणाऱ्याचं वेषांतर उघडकीस येऊन त्याला शारीरिक इजा होण्याचा संभव धोका ते पत्करू इच्छित नव्हते. याची जाण बर्टनला असल्यामुळं त्यानं या संदर्भात मोघम विधानांवर वेळ मारून नेली होती. शिवाय डायरेक्टरांना भरवसा दिला होता की 'मक्केतही छोटा व्यापारी आणि वैदू' हे वेषांतर तसं धोकादायक नाही.

दरम्यानच्या काळात इझबेल अरुंडेल या युवतीशी बर्टनची जानपेहचान झाली होती. इझबेल त्याच्याहून दहा वर्षांनी लहान होती. उमराव घराण्यातील होती. 'विल्यम द कॉंकरर' च्या काळापासून तिच्या घराण्याचा माग घेता येत होता. अरुंडेल हे इंग्लंडमधील अग्रेसर कॅथलिक घराणं होतं. फ्रांसमधील बलोन किल्ल्यालगतच्या बागेमध्ये योगायोगानं झालेल्या या दोघांच्या भेटीनं इझबेलचं भवितव्य ठरवून टाकलं होतं. त्याच्या प्रथम दर्शनीच ती मंत्रमुग्ध झाली. तिनं आपल्या बहिणीला सांगितलं, 'हा माणूस माझ्याशी लग्न करणार.'

इझबेल रोमँटिक प्रवृत्तीची तरुणी होती. तिच्या आईनं त्या काळातील डिझरेलीची प्रसिद्ध रोमँटिक कादंबरी Tancred (टॅनक्रेड) तिला दिली होती. ती वाचल्यापासून दूरस्थ प्रदेशातील रोमहर्षक स्वप्नं ती रंगवू लागली होती आणि तिला बर्टन भेटला. त्याच्या सहवासात घालवलेल्या पहिल्या सांध्यसमयीचं वर्णन तिनं केलं आहे. त्यानं तिच्याबरोबर वॉल्ट्झ नृत्य केलं. त्यानं आपला हात माझ्या कमरेभोवती जिथं ठेवला होता तो पट्टा आणि त्यानं कवटाळलेल्या माझ्या हातातील मोजे मी बाजूला ठेवून दिले, ते पुन्हा कधी वापरले नाहीत. 'वादळी, भिरभिरत्या भटक्या जीवनासाठी' ती आसुसलेली होती आणि तिच्या त्या इच्छेची पूर्ती करू शकणारा माणूस तिला भेटला होता, जो व्हिक्टोरियन इंग्लंडमधला महान जिप्सी होता. बर्टननं एके ठिकाणी लिहिलं आहे : 'बिघाड झालेलं असं मी एक जुळं आहे आणि सांधेजोड करू शकणारा असा ती दुवा आहे.' पुढं, सरकारी वर्तुळातील त्याची जोरकस समर्थक, साहित्य जगतातील त्याची कुशल एजंट या भूमिका ती पार पाडणार होती. भ्रमंतीची आणि साहसाची स्वप्नं ती रंगवत असली तरी वैवाहिक जीवनाच्या आधी तो करू इच्छित असलेल्या साहसाची कल्पना तिला होती : अरेबियाचा प्रवास त्याला करावयाचा होता आणि मध्य आफ्रिकेतील नाइल नदीच्या उगमाचा शोध त्याला घ्यावयाचा होता.

मक्का आणि मदिनाला जाणारा बर्टन हा पहिलाच शोधक प्रवासी अणि स्कॉलर नव्हता. जॉन लुडविग बर्कहार्ड या नामवंत जर्मन मानवशास्त्रज्ञानं हाच प्रवास १८१४-१५ मध्ये केला होता आणि त्यासंबंधी सांगोपांग लिहिलं होतं. परंतु हा मार्ग आखला जाणार होता, इंग्लंडसाठी, रॉयल जियोग्रॉफिक सोसायटी'साठी आणि बर्टनसाठी. या साहसाला साम्राज्याच्या प्रयोजनाची जोड मिळाली होती. हिंदुस्थानच्या बाजारपेठेसाठी बर्टन अरेबियन

घोड्यांचा अंदाज घेणार होता, हिजाझच्या समुद्रांचा नकाशा काढण्याचं तंत्र शिकणार होता आणि अरबियन द्विपकल्पाच्या लोकजीवनाचं बारकाईनं निरीक्षण करणार होता. इस्लामबद्दलची त्याची जिज्ञासाही या उपक्रमाला कारणीभूत ठरली होती. तो स्वतः अज्ञेयवादी होता आणि अवाजवी 'मिथ' आणि 'विधी' याबद्दलची इस्लामची काहीशी तात्विक नापसंती त्याला भावली होती. धार्मिक बाबीमध्ये बर्टनची मतं लवचिक होती, 'हटवादी भूमिका घेणं त्याला मान्य नव्हतं.' आत्मा आणि चैतन्य (Spirit) यांचं अस्तित्व मी दुर्लक्षित करतो. आत्म्यामध्ये आत्मा, 'मी' मध्ये 'मी', गरजच काय याची?' सूफी पंथाबद्दल त्याला आकर्षण होतं. शिख धर्म आणि साहित्य यांनी एकेकाळी त्याला दिलासा दिला होता. इस्लामबद्दल त्याला कौतुक होतं. तो 'वास्तवाशी इमान राखणारा नैतिक धर्म' होता, प्रमाणवचन आणि धर्मगुरु या दोन भ्रष्ट घटकांपासून मुक्त' होता. प्रतिस्पर्धी एकेश्वरवादी पंथाची नाचक्की करण्यास उत्सुक असलेला एक भाविक ख्रिश्चन म्हणून तो खचितच इस्लामच्या जन्मस्थानामध्ये पाऊल टाकत नव्हता. एक साहसी, एक प्रेक्षक आणि एक लेखक म्हणून तो तिथं गेला होता. हा मार्ग तसा सीधासाधा नव्हता. खबरदारी म्हणून बर्टननं सुंता करून घेतली होती. जेणेकरून शारीरिक अत्याचार होऊ न देता प्रवास आणि यात्रा करणं त्याला सुलभ होणार होतं.

यात्रा म्हणजे भव्य आंतरराष्ट्रीय घटना होती. एक प्रचंड लोंढा कॉन्स्टॅन्टिनोपलमधून निघाला आणि त्यानं दमास्कमार्गे मदिनेकडे कूच केले. दुसरा होता एजिप्शियन काफिला. त्यात बर्टन सामील झाला. अफगाणी मातापित्यापासून हिंदुस्थानात जन्मलेला आणि रंगूनमध्ये शिक्षण घेतलेला एक पठाण म्हणून बर्टननं प्रवासाला प्रारंभ केला. इस्लाम धर्म स्वीकारलेला एक पाश्चात्य म्हणून यात्रा करण्याचं त्यानं जाणीवपूर्वक टाळलं होतं. कारण 'बाटव्यांवर सतत पाळत असते . . . आणि "नव-मुस्लिमां"ना लोक आपखुषीनं माहिती देण्यास राजी नसतात, विशेषतः मनमोकळेपणानं. त्यांना संशय असतो त्याचं धर्मांतर जबरदस्तीने करण्यात आलेलं असणार. हेर म्हणून त्याच्याकडे पाहिलं जात असे आणि शक्यतो त्याच्या दृष्टीस काही फारसं पडणार नाही याची दक्षता घेतली जात असे.'

प्रवास खडतर होता. कैरोहून तो उंटावरून सुएझला आला. तिथून लाल समुद्रामधून बोटीनं तो याम्बू या बंदरावर उतरला. मदिनाचा पायी पायी प्रवास म्हणजे धोकादायक धाडस. हा मार्ग डाकूंचा सुळसुळाट असलेल्या प्रदेशातून जात होता. मक्केच्या शेरीफशी वैर असलेल्या एका स्थानिक बेडू टोळी प्रमुखानं प्रतिज्ञा केली होती की 'त्याच्या हद्दीतून जाण्याचं धाडस करणाऱ्या प्रत्येक मुर्गीची मुंडी छाटली जाईल.' धोकादायक 'पिल्ग्रिम्स पास' मध्ये यात्रेकरूंवर हल्ला झाला, त्यात बाराजण मारले गेले. बर्टन सहिसलामत सुटला. मदिनेला पोचला. खडतर प्रवासानंतर मुक्कामाला पोचल्याचं 'थ्रिल' त्यानं आपल्या रोजनिशीत नोंदवलं. तिथल्या फळबागांनी, बागबगिच्यांनी त्याच्यावर मोहिनी टाकली.

"अरेबियन नाइट्स" मधल्या एखाद्या साक्षात्कारागत ते होतं ... एखादी आज्ञा व्हावी तसे आम्ही उंट थोपवले. जुन्या भाविकांच्या श्रद्धेनं खाली उतरलो आणि खाली बसलो. आमच्या डोळ्यांचं पारणं फोडण्यासाठी थक्क होऊन पोटात कावळे ओरडत असूनही.

महिनाभर तो मदिनात राहिला. प्रेषिताच्या कबरीचं दर्शन घेतलं. धार्मिक स्थळांना भेटी दिल्या. बारकाईनं पाहणी करून नोंदी केल्या. चोरून रेखाटणे केली. (धोका पत्करायचं त्याला व्यसनच होतं) आणि मक्केकडे जावयास निघणाऱ्या काफिल्याची वाट पाहात राहिला. ३१ ऑगस्ट १८५३ रोजी तो काफिल्यात सामील झाला. मक्केची यात्रा सुरू झाली. या काफिल्याचं त्यानं प्रत्येयकारी वर्णन केलं आहे :'नजर अंदाजे तांड्यात किमान सात हजार तरी जीव असावेत, पायी, घोड्यावर, गवताच्या बिछायतीवर वा सिरीयाच्या देखण्या उंटांवर. सर्वात कनिष्ठ वर्गातील वजनदार पायंड्यात लंगडत चालले होते. प्रतिष्ठित माणसं, विशेषत: अरब, एकमदारी उंटावर सवार झाले होतं. सोजीरांकडे घोडे होते. कंगाल बाया, मुलं आणि अपंग 'हम्ल मुस्सतह'वर बसले होते ... या देखाव्याचं सौंदर्य अचंबा करायला लावणाऱ्या विविधतेत होतं; प्रत्येकाचा पेहराव त्याच्या शेजाऱ्याहून वेगळा होता, एकही उंट उंची पोषाखात मढवलेला नव्हता, एकाही घोड्यावर गणवेष चढवलेला नव्हता.' सारंच काही चित्रविचित्र !

स्थळ, वंशशास्त्र, रीतीरिवाज यांच्या तपशीलाबाबतचं बर्टनचं लिखाण यथातथ्य असायचं, परंतु त्याचं स्वत:चं आंतरिक विश्व उघड केल्याचं क्वचितच आढळून येतं. तरी देखील, मक्केच्या भव्य मशिदीच्या प्रथम दर्शनानं उडालेली खळबळ मात्र व्यक्त झालेली दिसते : 'तिथं ती उभी होती, माझ्या प्रदीर्घ आणि दमछाक करणाऱ्या यात्रेचं अंतीम ठिकाण, कैक वर्षांच्या योजना आणि आशा फलद्रूप झाल्या होत्या. शवपेटिका काही काळ प्रार्थना मंदिरात ठेवण्यात येणारा भव्य प्लॅटफॉर्म आणि त्यावरील विषण्ण वस्त्रप्रावरण यांना कल्पनाविलासाच्या मृगजळी माध्यमानं वैशिष्ट्यपूर्ण मोहकता बहाल केली होती. इथं नव्हते, इजिप्तमध्ये असतात तसे भुरकट पुरातन वास्तूचे भव्य खंड, ग्रीस आणि इटलीमध्ये असतात तसे डौलदार आणि सुसंवादी सौंदर्याचे अवशेष, हिंदुस्थानच्या इमारतीत असतो तसा रासवट भपका, तरीही दृश्य होतं विलक्षण, एकमेवाद्वितीय - परंतु हे जगप्रसिद्ध पवित्र स्थळ किती जणांनी डोळे भरून पाहिलं असेल ! मी अगदी खात्रीनं सांगतो की जे अश्रू ढाळत पडद्याला कवटाळतात, जे आपली धडधडती छाती दगडावर दाबून धरतात, त्या तमाम भाविकांपैकी कुणालाही अती उत्तरेकडून आलेल्या "हाजी"जा जाणवते तेवढी गाढ भावना क्षणभरदेखील जाणवत असेल. जणूकाही अरबांच्या काव्यमय आख्यायिकांनी सत्य सांगितलेलं होतं : पहाटेच्या मधूर झुळकेनं नव्हे तर, देवदूतांचे फडफडणारे पंख काबावरील काळे आच्छादन वरखाली करत असतात. परंतु, निरहंकारी सत्य कबूल करायचं तर, त्यांच्या होत्या धार्मिक कळकळीच्या उच्चतम भावना, आणि माझा होता तृप्त अभिमानाचा परमानंद.'

मक्केमध्ये तो फार काळ रेंगाळला नाही, यात्रेला आवश्यक असणाऱ्या गोष्टींची पूर्तता केल्यानंतर, ते ठिकाण तत्काळ सोडून जाण्याची इच्छा त्याच्या मनात बळावली. सर्व विधी आटोपल्यानंतर निघून जाणं शहाणपणाचं होतं कारण 'प्रक्षुब्ध भावनांपाठोपाठ एखादी प्रतिक्रिया अपेक्षितच'. आणि या साऱ्या गोष्टींनी भीतीदायक आदरानं भारावलेला आहे अशा माणसाची 'रंग उतरून जाण्याचा' धोका पत्करायची इच्छा नसते. निरोप घेतेसमयी तो काहीसा निष्काळजी बनला, बहुधा बेपर्वा. एका ब्रिटिश जहाजाचं त्यानं पहिल्या वर्गाच्या तिकिटाचं आरक्षण केलं. खरं तर, आपण पठाण असल्याचं तो भासवत होता आणि पठाणाला पहिल्या वर्गाचं तिकीट मिळणं दुरापास्त होतं. बर्टन हा वेषांतरित इंग्रज असावा असा संशय एका तरुण अंगरक्षकाला सतत येत होता. तो बर्टनच्या नोकराला म्हणाला, "आता माझ्या ध्यानात येतंय, तुझा धनी हिंदुस्थानातील एक साहेब आहे; आमच्या दाढींची त्यांनी खिल्ली उडवली असेल !

तो आला, त्यानं पाहिलं, त्यानं कथन केलं. प्रवासाचं इतिवृत्त.

कैरोहून 'रॉयल जियॉग्रॉफिकल सोसायटी' मधील एका परिचिताला त्यानं लिहिलं, "लंडनच्या काही वृत्तपत्रांमध्ये इजिप्तमधील माझ्या आगमनाचा वृत्तांत येणं शक्य आहे काय? केवळ माझ्या स्नेह्यांना कळावं की प्रवास सुरक्षित झालेला आहे ! याच पत्रात त्यानं कळकळीची विनंती केली, 'मी ऐकतो की झांझिबारच्या मोहिमेच्या संदर्भात 'द जियॉग्राफिल' मध्ये बोलणी चालली आहेत: त्या मोहिमेचं धुरिणत्व सांभाळण्यासाठी मी सर्व शक्ती पणाला लावीन. तू जर मला सहाय्य केलंस तर मी तयार आहेच'. त्याला सदाचीच भ्रांत, पुढील मोहिमेची. त्याच्या प्रारब्धाचा तो शाप होता.

अरेबियन द्विपकल्पाच्या मोहिमेची सांगता होताच आफ्रिका त्याला आणि त्याच्या आश्रयदात्यांनाही खुणावू लागली. वाळवंटातील यात्रेवर असतांनाच, मध्य आफ्रिकेमध्ये एक 'विशाल सागर' आहे, विषुववृत्तावर ठाण मांडून बसलेला हिमनग आहे, ही वार्ता त्याच्या कानी पडली होती. नाइल नदीच्या उगमाचा शोध-बर्टनच्या शब्दात 'आयसिस'चं अनावरण त्याचं मुख्य लक्ष्य बनलं होतं. त्यानं आखलेली योजना म्हणजे प्रचंड साहसाचं काम होतं. एडनवरून तो निघणार होता मज्जाव असलेल्या अंतर्भागातील हरारकडे, तिथून पश्चिमेकडील सागर प्रदेशातील मोहिमेवर निघण्याआधी दक्षिणेकडील झांझिबारला जाणार होता.

हरारची ख्याती चांगली नव्हती. खतरनाक शहर त्यामुळेच बर्टनच्या आव्हानालायक. समुद्रकिनाऱ्यापासून उंटावरून तिथं पोचायला दहा दिवस लागत. तिथला राजकुमार क्रुर आणि पिसाट होता. त्या शहराविषयी अशी आख्यायिक प्रसृत होती की, परदेशी आणि विश्वासघातकी याची पावलं त्या नगरीत पडताक्षणी तिचं सुवर्णयुग संपुष्टात येणार. बर्टन तिथं पोहोचला आणि हरार, 'अपेक्षाभंग करणारं' शहर असल्याचं त्याला आढळून आलं.

दहा दिवस त्यानं तिथं घालवले. त्यातील सहा दिवस गेले मुक्काम हलवण्यासाठी हरारच्या राजकुमाराची मनधरणी करण्यात (हराराविषयीची आख्यायिका खरी ठरावयाची होती. एका पिढीनंतर, कॉफी, तंबाखू आणि केशर यांचे निर्माते आणि व्यापारी यांनी गर्दी केलेलं हे आजवरचं दुष्प्राप्य स्थळं इजिप्तशियन हुकूमतीखाली यावयाचं होतं.)

सुरुवातीच्या काही दिवसातच काफिल्यावर अरिष्ट कोसळलं. बेरबेरा या समुद्राकाठीच्या गावात बर्टनच्या छावणीवर लुंटारूंनी हल्ला केला. अशी वंदत पसरली होती की, ब्रिटिश मोहीम अंतर्भागात कार्यरत आहे. गुलामांच्या बाजाराचं समूळ उच्चाटन करण्याचा ब्रिटिशांनी चंग बांधला आहे ही वार्ताही तिथं पोहोचली होती आणि या असल्या वातावरणात बर्टनची मोहीम सापडली होती. बर्टनचा सहाय्यक सर्व्हेअर आणि घनिष्ट स्नेही लेफ्टनंट विल्यम स्ट्रोयन या हल्ल्यात मारला गेला. बर्टनचा सहाय्यक सर्व्हेअर, जॉन हॅनिंग स्पेक घायाळ झाला. काटेरी तार असलेला एक भाला बर्टनच्या डाव्या गाडफडात शिरला आणि तोंडाचा टाळू छेदून उजव्या गालफडातून बाहेर पडला.

बर्टनला शत्रू अनेक. 'फ्रिलान्स' काम करण्याची त्याची पद्धती सोजीरांना, मुत्सद्यांना नापसंत होती; आणि म्हणूनच बेरबेराच्या 'एपिसोड'मध्ये बुऱ्या तऱ्हेनं नाचक्की करण्याची संधी त्यांनी वाया घालवली नव्हती. आफ्रिकेच्या अंतर्भागात पाऊल टाकण्याची परवानगी मिळेपर्यंत वाट पहात बसणं प्राप्त होतं. या खडतर, काळात त्याला दिलासा दिला. १८५५ मध्ये प्रकाशित झालेल्या 'पर्सनल नॅरेटिव्ह ऑफ अ पिलग्रिमेज टु अल्–मदिना अँड मक्का' या त्रिखंडात्मक पुस्तकानं.

बर्टनची सुरेख रेखाटणं असलेले 'पर्सनल नॅरेटिव्ह' म्हणजे विस्मयकारक तपशील आणि सहनशीलत यांचा अपूर्व संगम होता. ते काम होतं भोवतालच्या प्रत्येक गोष्टींविषयी सजग असणाऱ्या एका माणसाचं– पुरुष आणि स्त्रिया यांच्या रस्त्यांमधील गाठीभेटी, ऐहिक जग, चालीरिती आणि विधी, हवामान, प्रवाशांच्या हालअपेष्टा आणि अथपासून इतीपर्यंत भरगच्च तळटीपा; बर्टनला ज्यांच्याविषयी आकर्षण होतं अशा कैक गोष्टी, त्या दुष्प्राप्य जगासंबंधी मायदेशीच्या वाचकांना जाणून घ्यायची इच्छा होती अशा साऱ्या जिज्ञासा. ग्रंथारंभी गिबनकडून उसनवारी करण्यात आलेला मजकूर छापण्यात आला होता : 'मक्के–विषयीचा आपला समज अरेबियनांकडूनच पोसला गेला आहे, कारण त्या शहरात कुणाही पारवंड्याला प्रवेश दिला जात नाही, आपले प्रवासी मूक आहेत.' बर्टननं हे मौन भंग केलं होतं.

परंतु तो होता आफ्रिकेत आणि त्याचा प्रकाशक आणि त्याच्या प्रकाशकाच्या विवंचना यांच्या कात्रीत सापडलेला. ग्रंथाच्या प्रास्ताविकात दावा करण्यात आला होता की, आजवर गूढ असेलल्या मुसलमानी अंधश्रद्धांच्या अगदी अंतस्थ बाबींविषयीच्या आपल्या ज्ञानात या पुस्तकामुळे भर पडेल. ही भलावण खास वाचनप्रिय 'पब्लिक'साठी केलेली होती :

प्रकाशकाला चिंता वाटत होती की, या प्रचंड ग्रंथराजमधील प्रचंड भरताड वाचनप्रिय 'पब्लिक'चा अंत पाहील, तपशील आणि दंतकथा फालतू म्हणून गणल्या जातील. पण बर्टननं आग्रह धरला की, त्या गोष्टी 'विषयाचा अत्यावश्यक भाग' आहेत,'दहशत आणि अंधश्रद्धा यांचा दुष्प्राप्य जगाचा अविभाज्य पैलू आहेत.' बर्टनच्या आग्रहापुढे प्रकाशकाला नमतं घ्यावं लागलं. १८५५ मध्ये खंड प्रसिद्ध झाले.

तदनंतर आफ्रिकेला जाण्याची परवानगी मिळाली. जॉन स्पेक संगे त्यानं प्रस्थान केलं. पण रसायन तापदायक होतं. स्पेक बर्टनची नेमिसिस– दंडदेवता बनायचा होता, आणि नाईलच्या उगमावरून उद्भवलेली त्यांची दुष्मनी पुढे दशकभर इंग्लडच्या अभिजनांमध्ये उघड उघड तट पाडणारी ठरणार होती. निळ्या डोळ्यांचा आणि भुऱ्या केसांचा स्पेक हा सॉमरसेट येथील जमीनदाराचा मुलगा. ढोंगी आणि गावरान. अधूनमधून त्याला क्षणिक अंधत्व येत असे. पण तो बऱ्यापैकी खेळाडू होता. शिकार आणि नेमबाजी यांचा त्याला विशेष षौक होता. त्याचं हिंदींचं ज्ञान थातुरमातुर होतं. इतर परकीय भाषांत तो अनभिज्ञ होता. स्थानिक लोकांबद्दल त्याला अरूची असे. त्याची निरीक्षणशक्ती बेताचीच असे आणि जे अवलोकिले त्यांच्या नोंदी करून ठेवण्याची आवड त्याला नव्हती. त्याच्या थेट उलट बर्टनचा पिंड होता. फॉन ब्रॉडी या बर्टनच्या चरित्रकर्त्रीच्या भाषेत सांगायचं तर बर्टन हा स्पंज होता व स्पेक दगड म्हणूच प्रवासात सुसंवाद साधावा असं विधीलेखित नव्हतं. बर्टननं आपल्या रोजनिशीत नमूद केलं आहे की,'त्यानं जवळजवळ काहीच केलेलं नाही.' तर, स्पेकनं घरी पाठवलेल्या पत्रात लिहिलं आहे की,'बर्टन सदाचा आजारी असतो.'

प्रवास खडतर १३० जाणांचा काफिला. आजचा टांझानिका तेव्हा वेलीनं वेटाळलेलं एडन होतं. जनावर, पशूंची पारध करणाऱ्या टोळ्या व गुलामांचा व्यापार करणारे यांच्या जाण्यायेण्यानं तयार झालेल्या पाऊलवाटा हा मार्ग. वरून पावसाच्या धारा, पायाखाली दलदल, त्सेत्से माशा आणि डास यांचे चावे. बर्टन आणि स्पेक यांनी शिरकाव करण्याचं योजिलं होतं ते हे जग. नकाशाशिवाय. त्यांच्या आधी कुणी येथून प्रवास केला असेल अशा मार्गदर्शकांविना. समोरील टेकड्यांच्या रांगापल्याड काय समोर ठाकणार आहे. याची पुसटती कल्पनाही नव्हती. मार्गात भटक्या टोळीची गाठ पडल्यास तिच्याशी संवाद कसा साधायचा याची भ्रांत. कुठल्याही प्रकारचं सहाय्य नव्हतं वा कुठल्याही तऱ्हेनं संवाद साधणं शक्य नव्हतं. . . आणि हा सारा खटाटोप, जे खरोखरीच अस्तित्वात आहे की, केवळ एक दंतकथा आहे याविषयी खात्री नसलेल्या सरोवरापाशी पोहोचण्यासाठी.'

दिवसा अंग भाजून काढणारा उष्मा आणि रात्रौ हाडांना बोचणारी थंडी. भाग वाहकांनी दंगा माजवला, तेव्हा त्यांना फटकारण्यात आलं, असं दिसतं. दोघेही गोरे बऱ्याचदा आजारी आणि भ्रमात असतं. गुलामांचे अरब व्यापारी मार्गात भेटत. बर्टन नमूद करतो : 'अरबांच्या संगतीत मी नेहमीच खुशाल असतो. मी त्यांच्यापैकीच एक असल्याप्रमाणं मला ते नेहमी

वागवत. अशा वेळी, भाषा येत नसल्यामुळे जॅकची पंचाइत होत असे, तो कुठल्याही गोष्टीत सामील होत नसे आणि मला वाटतं त्यामुळे तो थोडा कडवट बनला होता.'

किनारपट्टी सोडल्यानंतर चारेक महिन्यांनी एका अरबी वस्तीत ते पोहोचले. तिथं त्यांना भेटला रने बिन अमीर. अंतर्भागातील भूगोल ठाऊक असलेला एक अरब. अंतर्भागात बरीच सरोवरं आहेत या बर्टनच्या संशयाला त्यानं दुजोरा दिला. या सरोवरांपैकी एकाचा प्रवास त्यानं केला होता– ते होतं टांगानिका सरोवर– परंतु तो म्हणाला उत्तरेला आणखीन एक सरोवर आहे. इथंच जुगाराची खेळी झाली, आणि हाडवैराची ठिणगी पेटली : टांगानिका सरोवर हेच नाईलचा उगम असण्याच्या शक्यतेवर बर्टननं जोर दिला आणि स्पेकनं, नशिबवान अंदाजानं, उत्तरेकडील सरोवर निवडलं– ज्याचं नामकरण तो 'लेक व्हिक्टोरिया न्यान्झा' असं करणार होता आणि नाईलचा तो उगम आहे यावर पुढील शोधक– प्रवासी शिक्कामोर्तब करणार होते. स्पेक लिहितो : 'मोठ्या हर्षभरानं कॅप्टन बर्टनमार्फत मी स्नेला विचारलं, त्या सरोवरामधून नदी निघते का.' कॅप्टन बर्टनमार्फत : निष्णात भाषाकोविद आणि शोधक– प्रवासी, एक वडीलधारा, ज्यानं 'सहाय्यक सर्व्हेअर आणि वनस्पतींचे नमुने गोळा करणारा' म्हणून स्पेकला बरोबर आणलं होतं त्या सहाय्यकानं त्याला दुभाष्याची हलकी भूमिका पार पाडायला लावली होती. आपल्याहून वरचढ असणाऱ्याच्या छायेत वावरावं लागतं म्हणून खार खाणाऱ्या स्पेकनं दावा साधून घेतलेला दिसतो.

नशिबाची जॉन स्पेकवर मेहरनजर झाली. टांगानिका सरोवरापाशी पोहोचल्यानंतर (अधूनमधून उद्भवणाऱ्या अंधत्वामुळे स्पेक हा प्रदेश पाहू शकला नव्हता) बर्टनं आजारी पडला आणि उत्तरेकडील मोहीम एकट्यानं करण्यास त्यानं स्पेकला अनुमती दिली. तब्येत सुधारण्यासाठी बर्टन मागं राहिला. स्थानिक बोलीभाषेचा शब्दकोश तयार करण्याच्या कामी तो लागला. सहा आठवड्यानंतर, गोळीबाराच्या आवाजानं त्याला जाग आली : समोर स्पेक आणि त्याचं पथक. ब्रेकफास्टनंतर लागलीच स्पेकनं जाहीर केलं की, नदीचा उगम त्यानं शोधून काढला होता. बर्टन लिहितो : 'सुदैवी शोधकाची खातरजमा जबरदस्त होती. त्याचं स्पष्टीकरण दुबळं होतं.' स्पेकनं सरोवरावर नाव हाकारलेली नव्हती आणि आग्नेयकडील किनारा त्यानं पाहिलेलाही नव्हता. तरीही व्हिक्टोरिया न्यान्झा हे सरोवर त्याचं होतं. ते त्यानं शोधून काढलेलं होतं.

मोहिमेच्या घुम्या आणि दुःखद परतीनंतर एडनमध्ये त्या दोघांनी एकमेकांचा निरोप घेतला. तिथल्या डॉक्टरनं लंडनला निघणाऱ्या बोटीवर चढण्याचं सर्टिफिकेट बर्टनला देण्यास नकार दिला. पंधरा दिवसांनी दुसरी एक बोट सुटणार होती. पण तोवर थांबण्यास स्पेक राजी नव्हता. बर्टननं आपल्या सहकाऱ्याला सांगितलं,'जॅक, मला शक्य होताच, मी लागलीच निघतो.' स्पेकनं दिलासा दिला,'गुडबाय ओल्ड फेलो; तू परत येईपर्यंत मी 'रॉयल जियॉग्रॅफिक सोसायटी'त पाऊल टाकणार नाही याबद्दल निश्चित रहा, आपण दोघंही

बरोबरच जाऊ. त्याबाबत जिवाला त्रास करून घेऊ नकोस.' पण स्पेकनं बर्टन येण्याची वाट पाहिली नाही. त्यानं स्वदेशी पाऊल टाकलं त्याच्या दुसऱ्या दिवशी त्यानं प्रायोजकांशी संपर्क साधला. दोन आठवड्यांनी बर्टन परतला तोवर स्पेक दावा करून मोकळा झाला होता की, हा दैदिप्यमान शोध त्याचा स्वत:चा होता आणि 'एक आजारी सहकारी, जिगरी स्पेकच्या चालत्या नावेच्या पट्ट्यात धडपडणारा' म्हणून बर्टनची अवहेलना त्यानं केली होती.

१८९० मध्ये बर्टनचं 'द लेक रिजन्स ऑफ सेंट्रल आफ्रिका' दोन खंडात प्रसिद्ध झालं. त्यातील नोंदी आणि भौगोलिक तपशील विस्मयकारक होते. (बऱ्याच वर्षांनंतर व्हेर्ने लॉव्हेट कॅमेरॉन हा शोधक प्रवासी बर्टनचं प्रस्तुत पुस्तक हाती घेऊनच पूर्वेकडून पश्चिमेला निघाला आणि तो म्हणतो की हो पुस्तक म्हणजे 'शाब्दिक छायाचित्रे' त्यातील 'बारकावे आणि तपशील तर सरसच') परंतु बर्टनचं साहित्यिक कर्तृत्व त्याला लाभदायक ठरलं नाही. स्पेकच्या जनसंपर्काच्या मोहिमेत त्याला हार पत्करावी लागत होती. स्पेकचं भौगोलिक ज्ञान बेताचं, त्यानं जे पाहिलं होतं त्याच्या नोंदीही त्यानं फारशा केल्या नव्हत्या, पण त्याचा आत्मविश्वास ('माझं सरोवर' म्हणून तो न्यान्झाचा उल्लेख करत असे) आणि उमरावाचा पुत्र म्हणून समाजातील त्याचं स्थान यांच्या जोरावर त्यानं बाजी मारली होती. बर्टनच्या 'परकेपणा'वरही त्यानं बोट ठेवलं होतं. 'ब्लॅकवूड्स मॅगेझिन'च्या संपादकापाशी त्यानं उद्गार काढले होते की 'शोधाचा मान ब्रिटनकडून एखाद्या परकीयानं नेणं 'यापरीस आपण' शेकडो मृत्यू पत्करू.'

शोधक- प्रवासी म्हणून बर्टनची कारकीर्द जवळजवळ संपुष्टात आली होती. कुठल्याशातरी कोपऱ्यात एक मामुली कॉन्स्युलर म्हणून आता त्याची नेमणूक करण्यात आली होती. उलट स्पेकला आणखीनं एका आफ्रिकन मोहिमेसाठी आर्थिक सहाय्य करण्यात आलं होतं आणि 'भूगोलातील एक गहन गूढ उकलणारा' म्हणून त्याचा गौरव केला जात होता. पण त्यानं स्वत:ला न झेपणारी उडी घेतली होती. बऱ्याच गोष्टींचं श्रेय उपटण्याचा त्यानं प्रयत्न केला होता. बर्टनवरील त्याचे शाब्दिक हल्लेही अधिक प्रखर होऊ लागले होते. हळूहळू भूगोलाविषयीचं त्याचं तोकडं ज्ञान उघडकीला येत गेलं. इतर शोधक- प्रवासी व भूगोलतज्ज्ञ, खास करून प्रख्यात डॉ. डेव्हिड लिव्हिंग्स्टन यानं व्हिक्टोरिया न्यान्झा. हे नाईलचं निर्विवाद उगमस्थान आहे हा त्याचा दावा खोटा ठरवला.

या कलहाला प्रारंभ झाल्याला पाच वर्षं उलटून गेल्यानंतर एका वैज्ञानिक सोसायटीनं बर्टन आणि स्पेक यांच्यामध्ये वादविवाद आयोजित केला. स्पेकच्या घरालगतच्या गावात हा सामना निर्णायक ठरणार होता. दोघंही स्वत:ची बाजू मांडणार होते आणि प्रतिपक्षाला सवाल विचारणार होते. परंतु वादविवाद होऊ शकला नाही. ज्यादिवशी वादविवाद होता. त्याच्या आधल्या दिवशी तित्तरवर गोळी झाडत असताना स्पेक गंभीररित्या जखमी झाला.

इझबेल अरूंडलनं आपल्या आईला पाठवलेल्या विनवणीवता पत्रात लिहिलं होतं : 'मी पुरुष असायला हवं होतं असं मला वाटतं. पुरुष असते तर रिचर्ड बर्टन झाले असते; परंतु मी केवळ एक स्त्री असल्यानं, मी रिचर्ड बर्टनची पत्नी होईल. 'पुढं तिनं पुस्ती जोडली होती : 'याचा जन्म चांगल्या कुळातला आहे, आपल्या इतक्याच तोलामोलाच्या' आणि धार्मिकबाबीबद्दल सांगायचं तर तो म्हणतो, अज्ञेयवाद आणि कॅथॉलिक प्रणाली यात कसला आहे भेदभाव.' बर्टनच्या भ्रमंतीमुळं लांबणीवर पडलेलं लग्न तिच्या आईच्या इच्छेविरुद्ध, २२ जानेवारी १८६१ रोजी बॉरविक स्ट्रीटवरील बव्हेरियन चॅपलमध्ये पार पडलं. इझबेलनं तिचा साहसी वीर अखेर मिळवला होता.

तिची चिकाटी आणि समाजातील तिच्या ओळखीपाळखी यामुळे ४०व्या वर्षी बर्टननं लष्करी कमिशन गमावल्यानंतर, तेही पेन्शनीच्या लाभाविना, त्याला 'कॉन्स्युलर सर्व्हिस' मध्ये जागा मिळू शकली होती. परराष्ट्र खात्याचा सेक्रेटरी लॉर्ड जॉन रसेल इझबेलच्या चांगल्या परिचयाचा होता. 'गोऱ्या माणसाचं थडगं' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पश्चिम आफ्रिकेत राजदूत म्हणून बर्टनची प्रथम नेमणूक झाली. त्यानंतर सात वर्षांनी, दक्षिण अमेरिकेतल्या नेमून दिलेल्या कामगिरीनंतर, आपल्या नवऱ्याला दमास्कसमध्ये राजदूत म्हणून नियुक्ती करून घेण्यात इझबेल यशस्वी झाली. बर्टनचं स्वप्न प्रत्यक्षात अवतरलं. त्यासाठी ती अविश्रांत झटली आणि हे काम करू शकणाऱ्या माणसांना ती ओळखत होती. ग्लॅडस्टनचे 'लिबरल' जिंकले, डिझरेली हरला हें तिच्या पथ्यावर पडलं. पदभार सोडण्यापूर्वीची परराष्ट्र खात्यातील सेक्रेटरीची ही अखेरची कृती म्हणजे इझबेलला दिलेली एक भेट होती : दमास्कस येथील नेमणूक.

त्याचं अरेबियन स्वप्न हे तिचंही स्वप्न होतं : ती देखील 'टॅनक्रेड'मधील भूप्रदेशाचा प्रवास करणार होती आणि आपल्या नशिबाविषयी तिनं विस्मयानं लिहिलं आहे : 'मी झटकून टाकली आहे माझ्या पावलांची माती... प्रतिष्ठितपणा... युरोपियन समाजाचा सरंजाम. माझं इष्टस्थळ आहे दमास्कस, ! बाळपणीचं आणि कौमार्यावस्थेतील माझं स्वप्न. अरब प्रमुखासमवेत मी रहाणार आहे; वाळवंटाच्या हवेचा सुगंध मी अनुभवणार आहे; माझ्या तैनातीला असतील घोडे, शरआरअे, तंबू आणि मी मुक्त असेन...! परंतु, १८६९-७० मधील दमास्कस नाजूक आणि दुष्कर असं एक ठिकाण होतं.

'हर मॅजेस्टी'चे या प्रदेशातील प्रतिनिधी आणि परराष्ट्र कचेरीतील जुनी खोडं यांना दमास्कस येथील बर्टनची नियुक्ती रूचलेली नव्हती. कॉन्स्टॅन्टिनोपलचा राजदूत सर हेन्री इलियट, याला असा धाडसी माणूस आपल्या प्रदेशानजीक असावा असं वाटत नव्हते. 'पौर्वात्य प्रवाशां'बद्दल इलियटला तिटकारा होता, बर्टनबद्दल तर सर्वाधिक त्याची तक्रार होती,'रानटी भागा'त या प्रवाशांनी जे केलं आहे ते राजदूतासारख्या नाजूक कामात खपवून

घेणं अशक्य आहे. त्याच्या बर्टनविरोधी मोहीमेत त्याचा सहकारी होता, दमास्कसचा गव्हर्नर महमंद रशीद पाशा. एका तपापूर्वी, शहरात ख्रिश्चनांची कत्तल करण्यात आली होती. आणि या दुर्घटनेनं युरोप हादरून गेला होता. पाशा हा एक जागरूक प्रशासक होता. आपल्या प्रदेशात त्याला शांतता हवी होती आणि आता त्या प्रदेशात बर्टनचं वास्तव्य असल्यानं तो चिंताग्रस्त झाला होता.

बर्टन १ ऑक्टोबर १८६९ रोजी बैरुतला आला आणि त्यानंतर दोन दिवसांनी दमास्कसला त्यानं राजदूताची सूत्रं हाती घेतली. इझबेल ३१ डिसेंबरला त्याला येऊन मिळाली. जियल्या लोकजीवनात रूळली : 'दमास्कसमधील आमचा प्रतिनिधी' या नावानं ती 'लेवान्त हेराल्ड'साठी वृत्तांत पाठवू लागली. पुढे सिरीयावर ती पुस्तकही लिहिणार होती– आणि तिच्या वृत्तांतामध्ये बऱ्याचदा पाशावर हल्ले चढवलेले असत. हे उपद्रवी लिखाण करणारं कोण हे उघडं गुपित होतं. बर्टनच्या इतिवृत्ताच्या भाषेशी आणि आवेशाशी ते मिळते जुळते होते. दमास्कस हे भिन्नभिन्न जातीधर्म आणि त्याचं स्वहित यांची धगधगती कढई होती. तिथं 'हर मॅजेस्टी'च्या संरक्षणासाठी ४००० ज्यू होते, ग्रीक कर्मठ समाज होता, प्रोटेस्टंट मिशनरी होते आणि पुराणमतवादी मुस्लीम स्थानिक अल्पसंख्याक. राजदूत यांना मिळणाऱ्या सवलतींवर डोळ्यात तेल घालून लक्ष ठेवून होते. इथलं कामकाज एकूणच अवघड होतं.

परंतु बर्टन पतीपत्नीला गोडीगुलाबीनं वागणं न जमणारं होतं. त्यांना ज्यूंबद्दल तिरस्कार वाटत होता आणि तो त्यांच्यापासून लपवून ठेवावा असं कधी त्यांना वाटलंही नाही. मिशनऱ्यांबद्दलही त्यांना यत्किंचितही आदर नव्हता. थोड्याच कालावधीत त्यांना कडव्या टीकाकारांना, विरोधकांना तोंड द्यावे लागले. मिशनऱ्यांनी परराष्ट्र कचेरीला लिहिलं की, राजदूत दमास्कसच्या अतिशय असहिष्णू वर्गाच्या हितासाठी प्रयत्नशील आहे. ज्यूनी लंडनमधील प्रतिष्ठित ज्यू सर मोझेस मॉन्टेफिओरेला आवाहन केलं आणि त्यांचा ते विनंतीपत्र आपल्या पत्रासोबत परराष्ट्र सचिवाकडे पाठवले : महोदय आपल्या ध्यानी येईल की ज्यूंबरोबर कॅप्टन बर्टनची जी वागणूक आहे, त्यातून घातपात आणि जीवघेणी विवंचना उद्भवण्याची शक्यता नाकारता येत नाही.

दमास्कस ही अशी भेट होती की, बर्टनांना ती राखता आली नाही. नाझरेय येथे तळ ठोकण्यावरून बर्टनची माणसं आणि ग्रीक ऑर्थोडॉक्स चर्च यांच्यामध्ये बाचाबाची झाली आणि या घटनेमुळे अत्युसाही दाम्पत्यापासून स्वत:ची सुटका करून घेण्याचं निमित्त हेन्री इलियट आणि पाशा यांना सापडली. त्यांनी ही संधी दवडू दिली नाही. त्यांनी सूत्रं हालवली आणि पालमिराच्या मस्त सहली आणि झगमगत्या पौर्वात्य रंगमंचाच्या पार्श्वभूमीवरील स्वच्छ जीवन, अकस्मात संपुष्टात आलं. अरेबियाचं स्वप्न साकार झाल्यानंतर जेमतेम अठरा महिन्यांनी. बर्टन इंग्लंडला परतले. एक भग्नहृदयी जोडपं. इभ्रत गमावून बसलेलं. ती परत मिळवण्याच्या कामी इझबेल लागली. दमास्कसमधील त्याच्या कामगिरीचा बचाव करण्यासाठी

तिनं 'ब्ल्यू बुक' तयार केलं. राजदूताची नवी जागा त्याला मिळावी यासाठी आणखीन एक जोरदार मोहीम सुरू केली. संधीची वाट पाहात राहिले आणि नंतर लंडनच्या सामाजिक जीवनात सहभागी झाले. दरम्यान आयूसलँडच्या सल्फर खाणीची पहाणी करण्याचं खाजगी कंत्राट त्यानं स्वीकारलं. त्यांना आशा होती, मोरोक्को, इस्तंबूल वा तेहरान येथे त्याची नेमणूक करण्यात येईल. पूर्वेकडील मुस्लीम हा नेहमीच त्याचा ध्रुवतारा होता. काबूलमधील रशियनांच्या हालचालीवर लक्ष ठेवण्याच्या कामगिरीसाठी त्यानं आपली सेवा देऊ केली. परंतु त्याच्या वाट्याला आली त्रिएस्तेमधील नियुक्ती. परराष्ट्र सचिवाकडून इझबेलला आलेल्या पत्रात हा प्रस्ताव मांडण्यात आला होता.

दमास्कसनंतर त्रिएस्ते म्हणजे अवनती होती. आणि बर्टन पतीपत्नीला त्याची जाणीव होती. या नैराश्यातही त्यांना आशा वाटत होती की, याहून अधिक चांगली नेमणूक पुढे केली जाईल. त्याची इच्छा होती, हिजडे आणि न्यूबियम पोरी यांचा निषिद्ध, बेकायदेशीर व्यापार संपुष्टात आणण्यासाठी 'स्लेव्ह कमिशनर' हे पद आपल्याला मिळावं. . . प्रत्यक्षात त्याला स्वीकारावं लागलं त्रिएस्तेमधील राजदूतपद. बयाच्या बावन्नाव्या वर्षी. हे त्याची नेमणूक अखेरची ठरायची होती. यातून मुक्तता लाभेल या स्वप्नात तो जगला : इजिप्तच्या व्हॉयसरॉयच्या भागीदारीत अरेबियाच्या एका कोपऱ्यातील सोन्याची आशा तो बाळगून होता. त्याला वाटत होतं की, ती प्रचंड दौलत जवळपासच होती. तशी ती नव्हती. बर्टनच्या स्वप्नरंजनातील उपरोध लॉव्हेलनं पुढील शब्दात टिपला आहे : 'त्याला ज्याचा सतत ध्यास लागला होता ते सोनं भूगर्भात नव्हतं, तर त्याच्या स्व:च्या शाईच्या दौतीत ते होतं.' त्याला मुक्तता लाभली आर्थिकदृष्ट्या, ती त्रियेस्तेमध्ये त्यानं केलेल्या 'द अरेबियन नाईट्स'च्या भाषांतराद्वारे. दुराचरणी म्हणून दडपून टाकू इच्छिणाऱ्या समाजाच्या रोषाची पर्वा न करता, भडक कथांच्या भाषांतराचं प्रचंड काम त्यानं पार पाडलं; प्रथम १८८५ मध्ये दहा खंडाच्या संचात, आणि पुढे १८८६-८८ मध्ये सहा पुरवणीवजा खंडात.

पाश्चात्य वाचकांना 'द अरेबियन नाईट्स' अपरिचित नव्हतं. आंत्वान गालां या फ्रेंच पंडितानं १७०४ मध्ये ते फ्रेंचमध्ये अनुवादित केलं होतं. परंतु प्रस्तुत अनुवादाचं स्वरूप कोमट होतं, त्या कृतीमधील खळाळता जीवनरसच त्यानं पिळून बाजूला टाकला होता, तिच्यातील लैंगिक कृत्यांची टवटवीत आणि रोखठोक पद्धती त्यानं रद्दबातल ठरवली होती, अशा बऱ्याच रसरशीत वर्णनांना त्यानं कात्री लावली होती. या कथांमधील सुख हेच अंतिम साध्य मानणारी प्रणाली आणि दिलखुलासपणा, यात मुस्लीम शहरातील कथेकऱ्यांनी आपल्या स्वत:च्या कल्पनाशक्तीला स्वैर उधळू दिलं होतं. कामभावना, प्राक्तन आणि शक्ती यांच्या दैवघटित स्थित्यंतरांनी ते आपल्या श्रोत्यांना मंत्रमुग्ध करून टाकत होते. १८३९ आणि १८४१ या दरम्यान एडवर्ड विल्यम लेन याचं इंग्रजी भाषंतर प्रकाशित झालं होतं.

त्यानं अश्लील भागाची गाळसाळ करून 'दिवाणखान्यातील टेबलावर' बसून वाचता येईल अशी एक सोबळी आवृत्ती तयार केली होती. साहित्यिक दृष्टीनं चांगला प्रयत्न म्हणजे जॉन पेनचं १८८२-८४ मधील नऊ खंडातील भाषांतर. या पुस्तकाचं ऋण बर्टननं खुल्या दिलानं मान्य केलं आहे. परंतु आजवर पाळण्यात आलेला सावधानतेचा इशारा बर्टननं वाऱ्यावर भिरकावून दिला.

'पोर्नोग्राफी' आणि साहित्य यांच्यामधील सीमारेषा कुठली? कुणी आखली? भीडमुर्वत बाळगावी, क्षमायाचनेचा सूर आळवावा असं बर्टनला वाटलं नाही. आधीची भाषांतरं (पेनचं वगळता) 'अर्धवट आणि काटछाट केलेली, कामभावनाविरहित आणि आत्मा हरवलेली' असल्यामुळं त्यानं ती बाजुला सारली. दहाव्या खंडातील बहुचर्चित 'टर्मिनल एसे'मध्ये आपल्या भाषांतराच्या खुल्लमखुल्लेपणाचं समर्थन त्यानं केलं आहे : 'प्रत्येक पुरुष, स्त्री आणि बालक, राजपुत्रापासून शेतकऱ्यापर्यंत, मेट्रनपासून वेश्येपर्यंत सर्वांची पूर्वेमध्ये सर्वत्र अशीच भाषा असते... "द नाईट्स"मधील गावरान अश्लीलतेबद्दल आणि ओंगळपणाबद्दल तक्रार करणाऱ्या टीकाकारांना डॉ. जॉन्सनच्या तोंडचे समजले जाणारे उद्गार उद्धृत करून मी उत्तरं देऊ शकतो. त्याच्या शब्दकोशामध्ये नाठाळ शब्द असल्याची तक्रार एका खानदानी बाईनं केली असता डॉ. जॉन्सन म्हणाला, "मादाम, तुम्ही तेच शोधत असाव्यात."' आपल्या भाषांतराच्या 'एपिग्राफ'साठी त्यानं चाणाक्षपणे 'निर्मळांच्या लेखी अवघेची निर्मळ' ही अरबी म्हण निवडली.

'द अरेबियन नाईट्स'ला अमाप यश लाभलं. ग्रंथानं त्याचा खिसा गरम केला. राजदूत म्हणून वर्षाकाठी त्याला जे मिळत होतं. त्याहून सोळासतरा पट अधिक आर्थिक प्राप्ती त्याला झाली. काहीशा विषादानं त्यानं म्हटलं, 'सत्तेचाळीस वर्षं मी धडपडलो, मला शक्य होतं तेवढ्या हरप्रकारे सन्मानानं मी प्रतिष्ठा मिळवली. मला कधीही शाबासकी मिळाली नाही, ना "थँक्यू", न एखादी फार्दिंग. माझ्या उतार वयात मी एक शंकास्पद पुस्तक भाषांतरित केलं, आणि तात्काळ माझी कमाई सोळा हजार गिनीज झाली. आता इंग्लंडची रूची मला कळून चुकली आहे, आम्हाला यापुढे पैशाची ददात कधी पडणार नाही.' सन्मान दाराशी आला. १८८६ मध्ये, वयाच्या ६५व्या वर्षी त्याला 'सर' ही किताबत बहाल करण्यात आली. अर्थात् त्यासाठी इझबेलनं नेहमीप्रमाणं आपल्या पद्धतीनं 'लॉबिंग' केलं होतं, आणि त्यात आपल्याला स्वारस्य नसल्याचं सोंग त्यानं वटवलं होतं.

आपल्या परिपक्व वयात साहसी माणसानं आकांक्षा धरावी असं त्रिएस्ते नसलं, तरी बऱ्याच गोष्टी बर्टननं तिथं तडीस नेल्या. 'द अरेबियन नाईट्स'चं भाषांतरच केवळ नव्हे तर त्याहून भरीव कामगिरी त्यानं त्रिएस्तेमध्ये पूर्णत्वास नेली, ती म्हणजे पोर्तुगालचा सर्वश्रेष्ठ गीतकवी Luis Vaz Camoens याची छोटी गीतं आणि Lusiads यांचं भाषांतर. 'माझ्या आयुष्यातील अत्यंत सुखद परिश्रम म्हणजे Lusiads चं भाषांतर' त्या कवीला त्यानं

आपला गुरू मानला होता. १८४७पासून लहर लागेल तसं यावर काम करत होता. १८८० मध्ये त्रिएस्तेत त्यानं ते पूर्ण केलं. त्या कृपाळू धंदेवाईक शहरात त्याला निवारा लाभला होता.

- ४ -

रिचर्ड बर्टनचा अवघा दिमाख, त्याच्या मोहिमा, हे सारं ध्यानी ठेवूनही वाटत राहतं, तो कुठंतरी उणा पडत होता. काही वेळेला वाटतं, एका यशस्वी आणि सुसंबद्ध जगाच्या पार्श्वभूमीवरील त्याची साहसं म्हणजे निर्धास्त आणि दिखाऊगिरी करणाऱ्या एखाद्या माणसाचे ढंग. १८९० मध्ये बर्टन वारला (आणि त्याची पत्नी त्यानंतर सहा वर्षांनी)– म्हणजे, व्हिक्टोरियन युगाला तडे जाण्याआधी त्यानं रंगमंचावरून 'एक्झिट' घेतली होती. व्हिक्टोरिया महाराणीचं निधन होण्याआधी एक तप, ट्रान्सवालमधील एका क्षुल्लक भांडणाचं निमित्त होऊन सुरू झालेल्या बोअर युद्धानं साम्राज्याच्या आत्मविश्वासाला हादरा दिला. त्याआधी एक तप त्यानं जगाचा निरोप घेतला होता. १८९७ मधील व्हिक्टोरिया 'ज्युबिली' हा साम्राज्याच्या कळस होता, परंतु तो एका अंताचा आरंभही होता. 'फेअरवेल द ट्रम्पेट्स'मध्ये जान मॉरिसनं निर्देश केल्याप्रमाणं इंग्लंडमध्ये तेव्हा 'अशांततेची चाहूल' लागत होती, 'मान्य करता येत नसली तरी घडी सरतं आल्याची भावना' जाणवत होती. बोअर युद्धानं ब्रिटिश दर्पणाला तडे पाडले; ज्युबिली संपली होती; भार पेलवणार नाही एवढं साम्राज्य विस्तारलं होतं. स्वत:च्या वंश श्रेष्ठत्वाबद्दल ज्यांच्या मनात तिळमात्र संदेह नव्हता, ज्याच्या बळावर ते दूरदूरच्या परक्या देशात आत्मविश्वासानं सत्ता गाजवत होते, त्या समाजाला या रानवट युद्धानं मूठाती दिली होती. बेशिस्त, अनाभिज्ञ टोळीविरुद्ध ब्रिटन जिंकलं होतं. पण त्यात व्हिक्टोरियन अस्मिता नेस्तनाबूत झाली होती, आणि त्यायोगे गती लाभायची होती, क्षितिजावर ठोकावणाऱ्या आधुनिकतेला.

परंतु बर्टनला ते सारं चुकलं. विल्फ्रेड स्कॅबेन ब्लंट यानं बर्टनच्या अविश्रांत धावपळींमधून आरपार पाहिलं. ब्लंट त्याच्याहून दोन तपानं लहान होता, काहीसा 'पौर्वात्त्य प्रवासी'' होता. उत्साही होता, खानदानी होता आणि ब्रिटिश सत्तेच्या विरोधात त्यानं आयर्लंड, हिंदुस्थान आणि इजिप्त देशांच्या मागण्या उचलून धरल्या होत्या. 'लांडग्याच्या कातड्यातील एक मेंढा' म्हणून त्यानं बर्टनची वासलात लावली व आपण अरबांपैकीच एक आहोत या त्याच्या समजुतीची संभावना केली. पूर्वेमध्ये होऊ घातलेल्या बदलाची चाहूल ब्लंटला लागली होती, बर्टनला लागली नव्हती. बर्टनच्या काळात, शोधमोहिमा जुनाट पद्धतीच्या ठरत होत्य; एव्हाना दूरस्थ देशातील वसाहतविरोधी राजकीय चळवळीत साम्राज्याचा पोकळपणा उजेडात आला होता. या पोकळपणाखालीच बर्टन अक्षरश: पुरला गेला. तो मेला तेव्हा, इझबेलनं त्याला लंडनमधील एका कबरस्तानात पुरलं, अरबी तंबूच्या आकारात त्याचं संगमरवरी थडगं बाधलं, दरवाजा उघडताच उंटाच्या गळ्यातील घंटांची

किणकिण कानी पडेल अशी व्यवस्था केली.

एवंम, आमच्या लेखी बर्टन आहे कालबाह्य, ऐतिहासिक भाबडेपणाचा एक नमुना. आधुनिक जगाच्या वेशीपल्याड तो आहे. पूर्व आफ्रिकेतील अरब प्रदेशातील पुढील काळातील एक ब्रिटिश प्रवासी टि. इ. लॉरेन्स यांच्यामधील घणघण आणि करुणा आपल्याला आढळून येते तशी बर्टनमध्ये आपल्याला सापडू शकत नाही. लॉरेन्स हा एक कूट प्रश्न होता, विक्षिप्त होता; साम्राज्याचा 'एजन्ट' होता. अरब राष्ट्रवाद्यांचा एक 'मित्र' ज्याची इच्छा होती, जगात 'नव्या आशिया' तातडीनं उभा करायची. तो एक अत्याधुनिक माणूस होता. भ्रमनिरास आणि साम्राज्य-विनाश यांच्या पार्श्वभूमीवर त्याची कहाणी उलगडत जाते. कराचीच्या पुरुषांच्या कुंटणखान्यात शिरकाव करून घेणारा तो हाजी अब्दुल्ला नव्हता. अरबांच्या जगामधील आपल्या भ्रमंतीबद्दल तो म्हणतो : 'परक्यांची मालमत्ता असल्यागत जो कुणी स्वत:ला समर्पित करतो तो माणूस 'याहू' जीवन जगतो, एक निष्ठूर धन्याला आत्मा देण्याचा सौदा त्यानं केलेला असतो. तो त्यांच्यातलाच एक नसतो. माझ्या बाबतीत, अरबांच्या पेहरावात शहाण्याचा आणि त्यांची मानसिक जडणघडणीचे अनुकरण करण्याचा या प्रयत्नांमुळे माझ्या इंग्लिश अस्मितेनं मला सोडचिठ्ठी दिली, आणि पाश्चिमात्य आणि त्यांचे रुढीरिवाज यांच्याकडे मला नव्या नजरेनं पाहणे भाग पाडले. माझ्यासाठी त्यांनी सारं काही नष्ट केलं होतं. त्याचबरोबर प्रामाणिकपणानं पूर्णपणे अरबी होणं मला जमलं नाही : ती केवळ आपुलकी होती. एखाद्या माणसाला सहजीच प्रतारणा करता येईल, पण त्याला अन्य श्रद्धांमध्ये त्याचं परिवर्तन घडवून आपण क्वचितच शक्य होईल. मी एक सरूप टाकलं पण दुसऱ्याचा स्वीकार केला नाही... क्वचित प्रसंगी हे 'स्व' अवकाशात संभाषण करतात; आणि त्यानंतर पागलपणा समीप येतो, मला वाटतं, अशा माणसाच्या निकट जो दोन चालीरिती, दोन शिक्षणपद्धती, दोन परिसर यांच्या बुंथीमधून तत्काळ गोष्टी पाहू शकतो.' या शब्दांमध्ये निरागसता नाही. ते दुभंगलेल्या विवेकबुद्धीचा विलाप व्यक्त करतात. लॉरेन्समध्ये अपराधी भावना होती, संभ्रम होता आणि प्रगतीबरोबरच उध्वस्त साहचर्य होतं. परंतु ही समज येण्याआधीच्या काळात बर्टन जगला होता. याच कारणासाठी झपाटलेला लॉरेन्स आणि त्याचं एकमेव पुस्तक आपल्यासाठी जिवंत राहू शकतं; तर बर्टनचं काम आपल्या नजरेआड जातं आणि बव्हंशी विस्मृतिप्राय होतं.

बर्टनच्या मर्यादा त्याचा थोर नायक Camoens याचं जीवन आणि भावावस्था यांच्या पार्श्वभूमीवर चांगल्या प्रकारे जोखता येतात. या पोर्तुगीज कवीचं वर्णन तो करतो. तेव्हा बर्टन स्वत:बद्दलच विचार करत असावा. तो लिहितो : तो होता प्रवाशाच्या अभ्यासांची परिपूर्णता. त्याच्या यौवनापसूनचा एक पांथस्थ आणि एक जल प्रवासी; काहीसा वादळी सैनिक, जखमी आणि त्याच्या जखमांसाठी दोषी ठरवलेला; एक पराक्रमी खड्ग आणि त्याहून एक पराक्रमी लेखणी; दिलदार युगाचा एक नमुना, एक बावनकशी देशभक्त, आपल्या देशाच्या

दिगंत कीर्तीचा एवढा ध्यास घेतलेला की, त्याच्या थोरवीपुढे जग नतमस्तक झालं आहे हे पाहण्याहून अधिक समाधानाची गोष्ट त्याच्या लेखी अन्य कुठलीही नव्हती; त्याच्या काळातील पहिला आणि अग्रेसर असा एक प्रतिभावंत, जो अत्यंत दारिद्र्यात आणि हलाखीत मरण पावला. या 'पोर्तुगीज जलप्रवाशाच्या 'करीयर'च्या बर्टनच्या आदरयुक्त भीतीमध्ये आत्मकथनाचा अंश स्पष्ट आहे.' छात्र, सैनिक, प्रवासी, देशभक्त, कवी, अलौकिक प्रतिभावंत, एकाच "करीयर"मध्ये अशा प्रकारे गर्दी करून असलेले सायास, मनसुबे, घटना' आणि तरीही, प्रवासापुरतच या पोर्तुगीज कवीचं मोठेपण सीमित नव्हतं: भ्रमनिरास त्याच्याही वाट्याला आला होता आणि हीच गोष्ट त्याच्या १९व्या शतकातील चाहत्यानं आणि भाषांतरकारानं ध्यानी घेतली नव्हती. १५२४मध्ये वास्के द गामा मृत्यू पावला त्यावर्षी त्याचा जन्म झाला. आणि १५८० मध्ये पोर्तुगाल कॅस्टिलियन वर्चस्वाखाली गेलं. त्यावर्षी त्यानं निधन झालं. हे वर्चस्व सहजपणे टिकलं. Camoens चं आयुष्य साम्राज्याच्या ऱ्हासाशी निगडीत आहे. पोर्तुगालचा प्रचंड राजेशाही रेटा मोडून काढण्यात आल्यानंतर त्याला स्वत:चं स्वत्व गवसलं. बर्टनचा काळ जसा होता त्यात बर्टनचा दोष नव्हता, अपेक्षाभंग आणि झाडाझडती यांच्या आधीच बर्टन जन्माला जगला आणि भटकला.

मेरी एस्. लॉव्हेलच्या रूपानं त्याला अत्यंत विचारी, काटेकोर आणि प्रामाणिक चरित्रकर्त्री लाभली, परंतु कुठलाही चरित्रकार चरित्रनायकाच्या जीवनविषयक उपलब्ध सामग्रीच्या आधारेच त्याच्या व्यक्तिमत्वाचा शक्य तेवढ्या खोलात जाऊन शोध घेऊ शकतो. तो निव्वळ साहसप्रिय होता. आणि साहस म्हणजे सनसनाटी वृत्तीनं ज्याचं समर्थन केलं जातं असा शुद्ध पलायनवाद. ऐतिहासिक जाणीव म्हणून, ऐतिहासिक जबाबदारी म्हणून ते करण्यात आलेलं नसतं. त्या साहसाला भूक असते. अनुभव ग्रहण करण्याची, पण त्या अनुभवांकडे पुरेशा गांभीर्यानं पाहिलं जात नाही. आणि त्यांचं विश्लेषणही केलं जात नाही. आपल्या साहसांच्या पल्याड, वाळवंटं आणि आपल्या कल्पनाशक्तीचं सरोवर यांच्या पल्याड कुठली 'नेमिसिस'– दंडदेवता – आहे याची कल्पना येण्याएवढा रिचर्ड बर्टन भविष्यवेधी नव्हता. परंतु तो जे पाहू शकला नव्हता, ते आम्ही मागं वळून पाहतो. आपण परिणतींची, तिष्पतींची लेकरं आहोत. **(आधारित)**

---

आपल्या मित्रास आपण हवेहवेसे वाटण्याइतके मौल्यवान का आहोत याबद्दल आपणास जाणीव नसते हा नियमच आहे. मी क्ष वर प्रेम का करतें, या विषयी त्याला सुतरामही कल्पना नाही याबद्दल मला खात्री आहे. मी त्याच्यावर प्रेम का करते? असे त्याच्यापाशी काय आहे? याचे ज्ञान त्याला आहे की नाही याबद्दल मला शंका आहे.

**- मेरी रदरफर्ड**

# एका लेखकाचा परिचय

## मार्सेल प्रूस्त

**–विष्णू सदाशिव व्रह्मे**

१

१८७०च्या ऑगस्टमध्ये प्रशियन सैन्यानं फ्रेंच सरहद्दीवर धडक मारली, फ्रांसमध्ये शिरकाव केला आणि फ्रांसचा पुरता पाडाव केला. सम्राटास कैद झाली. सम्राज्ञी निसटली आणि तिनं इंग्लंड गाठलं. या अशुभ घटना घडत असताना, आशिल्ल-आन्द्रिआँ नामक एका फ्रेंच फिजिशियनचा सन्मान केला जात होता. युद्धाची धामधूम नसती तर या बातमीनं फ्रांसवासीयाचं लक्ष वेधून घेतलं असतं. साम्राज्याच्या सरकारच्या पडत्या काळातील ही कृती होती. डॉ. आन्द्रिआँ प्रूस्तला 'लिजन ऑफ ऑनर' ही कितावत बहाल करून त्याचा गौरव करण्यात आला होता. सप्टेंबरमध्ये सदाँच्या पराभवाची वार्ता सर्वत्र पसरली असतानाच, तो विवाहबद्ध झाला.

डॉ. प्रूस्त उंचापुरा होता. देखणा. सशक्त चेहरा. छाप पाडणारी काळी दाढी. नाकाच्या शेंड्यावर ठेवलेला पिन्स-नेझ. रुबाबदार व्यक्तिमत्व. इल्लीअरमधील लुई प्रूस्तचा हा मुलगा. गाव तसं छोटं. शार्तपासून फार दूर नव्हतं. लुईचं लहानसं दुकान होतं. मसाले, साखर, लाकडीबूट, मेणबत्त्या, रश्या यासारख्या किरकोळ वस्तू तो विकत होता. १८२७ च्या सुमारास व्हर्जिनिआ तोरचझ हिच्याशी त्याचा विवाह झाला. त्यांना दोन मुलं झाली. थोरली मुलगी एलिझाबेथ. हिचा जन्म १६ ऑगस्ट १८२८चा. तिच्या पाठचा आन्द्रिआँ. याचा जन्म १८ मार्च १८३४ मधला. शिक्षणासाठी तो शार्तला गेला. शाळेत त्यानं स्कॉलरशिप मिळवली. त्याच्या वडिलांची इच्छा, त्यानं पाद्री व्हावं. परंतु त्याचा कल होता विज्ञानाकडे. १८५३च्या जुलैमध्ये वैद्यकीय अभ्यासासाठी तो पॅरिसमध्ये दाखल झाला. वाडवडिलांचं गाव सोडून बाहेर पडणारा तो पहिला प्रूस्त. त्यानंतर दोनच वर्षांनी त्याच्या वडिलांचं निधन झालं.

२९ डिसेंबर १९६२ रोजी त्याच्या 'आयडिओपॅथिक न्यूमोथोरॅक्स' या प्रबंधाला मान्यता मिळून त्याला 'डॉक्टरेट ऑफ मेडिसिन' ही पदवी प्रदान करण्यात आली. राजधानीमध्येच त्यानं वैद्यकीय व्यवसाय थाटला आणि सार्वजनिक आरोग्याच्या अभ्यासाला सुरुवात केली. अभ्यासाचा खास विषय होता : कॉलराच्या साथीमधील समस्या. १८६६च्या सुमारास प्लेगच्या साथीनं थैमान घातलं. डॉ. प्रूस्तनं स्वत:चा जीव धोक्यात घालून रोग्यांची शुश्रूषा केली. काळवेळ न पहाता. एव्हाना त्याच्या ध्यानी आलं होतं की कॉलऱ्याचं निर्मूलन करण्याचा एकमेव उपाय म्हणजे ती साथ युरोपच्या सरहद्दीवरच रोखण. म्हणजेच इजिप्तच्या



अनुक्रमणिका

वेशीवरच या साथीला पायबंद घालायलां हवा. १८६९ मध्ये सरकारनं त्याला पर्शियामध्ये पाठवलं. तो प्रथम रशियामध्ये गेला. या आधीच्या साथी रशियामध्ये कोणत्या मार्गानं आल्या याचा शोध त्यानं घेतला. रणरणत्या उन्हात तो घोड्यावरून फिरला. प्रवासात स्थानिक मुखियांच्या त्यानं मुलाखती घेतल्या. तेहरानमध्ये पर्शियाच्या शहानं त्याचं स्वागत केलं. सुरेख पर्शियन गालिचा त्याला भेट दिला. कॉन्स्टेन्टिनोपलच्या वझिर अली पाशा यानंही त्याचं सन्मानपूर्वक स्वागत केलं. तो पॅरिसला परतला तेव्हा बरीचशी उपयुक्त माहिती त्यानं बरोबर आणली. त्या आधारे त्यानं लिहिलेले विस्तृत अभ्यासपूर्ण लेख 'ल जुर्नाल ऑफिसिएल' मध्ये प्रसिद्ध झाले. या मिशनसाठीच त्याला महाराणी युजनी हिच्या हस्ते 'लिजन ऑफ ऑनर' प्रदान करण्यात आला. त्यानंतर काही दिवसांनी सदाँचा पाडाव झाला. ३ सप्टेंबरला साम्राज्य कोसळलं. त्याच्या आधल्या दिवशीच त्याचं जान्न वाईल हिच्याशी लग्न झालं. तिचं वय होतं एकवीस. डॉ. प्रूस्त तिच्याहून पंधरा वर्षांनी मोठा होता.

वाईल हे ज्यू. घराणं मुळचं अल्साक– लॉररेनमधील मेट्झ या गावचं. आता पॅरीसमध्ये स्थायिक. वधूचे वडील नाथ वाईल. वय वर्षे चौपन्न. एक सधन स्टॉकब्रोकर. दयाळू अंत:करणाचा म्हातारा. जान्नच्या आईचं वय होतं पंचेचाळीस. बाई स्वतंत्र बाण्याची. निस्वार्थी. आत्मसंयमन आणि आपलं कुटुंब याबरोबरच तिला संगीताची, साहित्याची आवड. आपला हा वारसा तिनं मुलीला दिला होता. नवरी मुलगी देखणी आणि बुद्धिमान. पियानो वादक. इंग्रजी आणि जर्मन भाषा अवगत. थोडंफार लॅटिन आणि ग्रीक. वाचन अफाट. काहीशी 'पुस्तकी'. लाजाळू. विनोदबुद्धी तरल. दुसऱ्यावर छाप पाडणारं व्यक्तिमत्व. डॉ. प्रूस्तला अनुरूप अशी नवरी.

लग्न झाल्यानंतर काही आठवड्यातच मादाम प्रूस्तला दिवस गेले आणि परिस्थिती तर खडतर. विजयी जर्मन सैन्यानं १९ सप्टेंबरला पॅरिसला वेढा घातला. चार महिन्याहून अधिक काळ त्या शहराचा बाहेरच्या जगाशी संबंध तुटला. मांस, पाव, फळं, दूध दुर्मिळ झाले. तिचं माहेर श्रीमंत होतं, तिचा नवरा डॉक्टर होता, तरीही तिला आणि तिच्या उदरी वाढणाऱ्या गर्भाला आवश्यक तेवढं अन्न मिळत होतं की नाही शंका आहे. डॉ. प्रूस्तच्या आईची बातमीही काही कळली नव्हती. जीवाला घोर लागलेला. दुष्काळी हिवाळ्यानंतर जर्मन पॅरिसमध्ये घुसले. त्यानंतर धामधूमीचा वसंत. कम्यून जाहीर झालं आणि राष्ट्रीय असेम्ब्लीच्या फौजांनी शहरावर हल्ला चढवला. प्रूस्त राहात होते. त्या भागात युद्धाची धुमश्चक्री सुरू झाली. तोफखान्यानं रस्ता पादाक्रांत केला. घराच्या छपरावर लपून राहिलेल्या सैनिकांच्या गोळीबारांनी वातावरण तंग झालं. डॉ. प्रूस्त मरायचेच. थोडक्यात बचावले. मादाम प्रूस्त घाबरून गेली. प्रूस्त कुटुंब ओनय्यला राहायला गेले. पॅरिसच्या या उपनगरात तिचा अविवाहित आणि सधन काका लुई राहात होता. त्याच्या घरी १० जुलै १८७१ रोजी मादाम प्रूस्त प्रसूत झाली. मुलगा झाला. फ्रेंच फॅशननुसार त्याचं नामकरण करण्यात आलं;

व्हालान्टीन-लुई-जॉर्ज-युजेन-मार्सेल.

नवजात बालकाची प्रकृती एवढी नाजूक होती की, तो जगेल की नाही याचीच शंका होती. वेढा आणि कम्यून या काळात झालेली आपल्या आईची उपासमार आणि तिच्या जिवाला लागलेला घोर याचाच परिणाम आपणाला आयुष्यभर भोगावा लागणारा आजार, अशीच धारणा मार्सेलची होती. तो वाचला. वाढू लागला. एक गोड, नाजूक, भित्रा आणि भावविवश मुलगा. त्याच्याकडे पाहून वाटलं असतं की, तो एक छोटी सुंदर मुलगी आहे. छोटी जिवणी, सुरेख रेखीव नाक, आईप्रमाणेच टपोरे डोळे आणि दाट सोनेरी केस. तो आईवडिलांना घट्ट धरून असायचा. सकाळपासून रात्रीपर्यंत त्यांच्याकडून प्रेमाची वसुली करायचा.

२४ मे १८७३ रोजी त्याचा भाऊ रॉबर्ट जन्मला. आपल्या मागून जन्मला आलेल्या भावंडाबद्दल थोरल्याला असूया वाटते. पण तशी असूया मार्सेलला वाटण्याचं काही कारण नव्हतं. आईचं दोघांही मुलांवर प्रेम होतं. तरी ती जाणून होती की रॉबर्टपेक्षा मार्सेलला तिच्या प्रेमाची गरज अधिक आहे. भावाच्या जन्मानंतर मार्सेलचं आईवडील प्रेम अधिक जुलमी आणि बेसुमार बनलं. आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या विरोधातील स्नेहशील कटात त्यानं आईलाही सामील करून घेतलं. तिला पाठवलेल्या पत्रात तो भावाचा उल्लेख 'डिक', किंवा 'हिज मॅजेस्टी' अशा टोपण नावानं करायचा. त्यानं ठरवून टाकलं होतं की आपल्या दोघांमध्ये कुणाला असूया वाटत असेल तर ती रॉबर्टलाच. असं असलं तरी दोघा भावांमध्ये अतिशय सलगी नसली तरी त्यांची एकमेकांवर माया होती. धाकट्या भावाला आपण संरक्षण द्यायला हवं ही मार्सेलची वृत्ती त्याच्या आयुष्याच्या अखेरपर्यंत टिकून होती. एकानं तर लिहिलं आहे की बंधूप्रेम म्हणजे काय ते या दोघा भावांच्या एकमेकांवरील प्रेमावरून ध्यानी यावं.

मार्सेल जसजसा वाढत गेला आणि त्याची माया पक्की झाली, तेव्हा आईबापांमधील भेदभाव त्यानं अचूक हेरले. व्यवसायात एकापाठोपाठ यश संपादन करणाऱ्या तडफदार आणि कार्यक्षम वडिलांबद्दल त्याला आदर होता. थकणं हा शब्द त्यांच्या कोशात नव्हता. त्यांची प्रॅक्टीस चालू होती. पुस्तकं लिहित होते. बऱ्याच आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये तांत्रिक सल्लागार म्हणून त्यांचा सहभाग असे. फ्रांसमधील सार्वजनिक आरोग्यखात्याचे ते इन्स्पेक्टर जनरल बनले. त्याचबरोबर पॅरिस विद्यापिठात सार्वजनिक आरोग्याचे प्राध्यापक झाले. 'अकॅडमी ऑफ मॉरल अँड पोलिटिकल सायन्सेस'मध्ये पद मिळाल्यानं आपल्या करीयरच्या यशात शिरपेच खोवला जाईल, या अपेक्षेनं त्यांची धडपड चालू होती. त्यांनी संपादन केलेल्या यशाच्या हकिगती ऐकून छोट्या प्रूस्तचा उर अभिमानानं भरून येत असे तरीही बापलेकाचं नातं कधी घनिष्ट बनलं नाही. कैकदा दोघांमध्ये तणावच जाणवत असे.

छोटा स्वप्नाळू प्रूस्त कृतीशील पुरुषांपासून बाजूला सरणं अटळ होतं आणि आपल्या आईवरचं तो अवघी माया केंद्रित करणार हेही अटळ होतं. आई प्रेमळ होती, दुसऱ्यांविषयी

अतिशय सहानुभूती बाळगणारी होती. आणि या गोष्टींची तिच्या मुलाला आस होती. साहजिकच तो तिच्याकडे ओढला गेला. दोघांमध्ये जवळीक निर्माण झाली. तिच्या बाहुपाशात स्वत:ला झोकून देण्याचा, तिला कवेत घेण्याचा, चुंबनांनी तिला गुदमरवून टाकण्याचा त्याला कधी कंटाळा येत नव्हता. अभ्यास करतेसमयी तो तिला आपल्या शेजारी बसवून ठेवत होता. तिच्या सहवासाचं सुख लाभावं म्हणून झोपायच्या वेळी आपल्या शेजारी तो तिला पडून राहायला लावत होता. संध्याकाळी ती बाहेर जायला लागली की त्याला बाबापुता करून थोपवणं मुष्किल व्हायचं.

प्रूस्तच्या बालपणीच्या दोनेक आठवणी तश्या क्षुल्लक वाटत असल्या तरी त्या वैशिष्ट्यपूर्ण आहेत आणि 'आँ सान्तेय' मध्ये त्या समाविष्ट करण्याइतपत प्रूस्तला त्या महत्त्वपूर्णही वाटल्या आहेत.

एका नवीन वर्षाच्या दिवशी नवीन वर्षाच्या भेटी वाटण्याच्या कामात– हा समारंभ प्रूस्त कुटुंबात अतिशय पवित्र मानला जात होता. – मार्सेल आणि रॉबर्ट यांनाही सहभागी करून घेण्यात आलं. मादाम प्रूस्तनं मार्सेलकडे पाच फ्रँक दिले आणि सांगितलं की ते आपल्या चुलत भावंडाच्या स्वयंपाकीणीला नेऊन दे. वाटेत त्यानं एका छोट्या बूटपॉलिशवाल्याला पाहिलं. साधारण त्याच्याच वयाचा होता. कुडकुडत होता. दिनवाणा होता. मार्सेलनं कसलाही विचार न करता सर्व पैसे त्याला दिले. आई खवळली. तिनं त्याला शिक्षा केली : चाळीस वर्षानंतर हा प्रसंग त्याला लखखपणे आठवत होता. त्याच्या घरकाम करणाऱ्या बाईला त्यानं तो ऐकवला होता. त्याच्या अवाजवी औदार्यावरून तसेच कींव आणि पैसे यांच्या मोबदल्यात दरिद्री आणि दु:खितांचे प्रेम खरेदी करण्याच्या त्याच्या वृत्तीवरून तो आणि त्याचे आईवडील यांच्यामध्ये सतत खटके उडत असत. त्याचे आईवडील वारले तरी या स्मृती जाग्या होत्या.

आणखीन एक घटना. बाळपणीचीच. त्याला चंद्राबद्दल भारी आकर्षण वाटत असे. भेट म्हणून आपल्याला खगोलशास्त्रावरील पुस्तकं आणावीत म्हणून तो आग्रह करत असे थंडीचा मोसम होता. एका दुपारी त्याच्या आईच्या मैत्रिणी आल्या होत्या. सर्वजणी ड्राईंगरूम–मध्ये बसल्या असताना आईनं थोरल्या लेकाला सांगितलं की 'चंद्राबद्दलची' त्याची पुस्तके मैत्रिणींना दाखवायला घेऊन ये. त्यानं खगोलशास्त्रावरील पुस्तकांबरोबर व्याकरणाचंही एक पुस्तक आणलं. त्या पुस्तकात नाक आणि गमतीदार चेहरा असलेल्या चंद्राचं एक चित्र होतं आणि त्याला वाटत होतं की हे सुद्धा एक चंद्राबद्दलचंच पुस्तक आहे. त्याचं वय होतं– 'जेव्हा जग पूर्णपणे ज्ञात आणि वास्तव असं काहीतरी अद्याप बनलेलं नव्हतं, जेव्हा वाटत असे की वास्तव जगातील एखादं अनोळखी स्थळ अ-वास्तव असलेल्या जगाप्रत नेणारा मार्ग दावू शकेल.'

परंतु अठराशे सत्तरीलमधल्या महत्त्वाच्या घटना ते राहात होते. त्या ९ बुलव्हार्द

मालरोर्बच्या परिसरात घडत नव्हत्या. करड्या घरांच्या वाळवंटातील बूर्झ्वा फर्निचरचं ते एक बेटं होतं. ते प्रिय असेना, नंदनवन बनण्याची किमया त्यात नव्हती. नित्याच्या ऐहिक जीवनाचं ते दर्शन होतं त्याची एडन होती. ओतय्य आणि इल्लीअर येथील उपवनं, जी पुढील काळात कॉम्ब्रेची उपवनं बनायची होती. सुट्ट्यांमध्येच तो ती पाहात होता. पुढे दम्याच्या 'ओरिजिनल सीन'करवी तो ती कायमचा गमावून बसला होता; परंतु त्यानं जर का ती कधीच गमावली नसती, तर त्यांची नंदनवन कधीच बनली नसती हे तितकंच खरं आहे.

ओतय्य पॅरिसपासून तसं जवळच होतं. तरीसुद्धा आपलं खेडेपण टिकवून होतं. पंचवीस वर्षातील वसंत आणि ग्रीष्म या ऋतूंमध्ये प्रूस्तांना थारेपालट करण्याची इच्छा झाली. डॉ. प्रूस्तला पॅरिस सोडणं शक्य नसायचं, अशा वेळी ते ओतय्यला निघत. इथून मार्सेल ट्रेन वा बसनं शाळेत जाऊ शकत होता, तासाभराचा प्रवास. डॉ. प्रस्तूदेखील 'शारीत हॉस्पिटल' वा 'होटल-दिए' येथील कामकाज करायला सकाळी बाहेर पडत. बस घरासमोरूनच सुटत असे डॉ. प्रस्तू घराबाहेर पडण्याआधी नोकर बस थांबवण्याचे हाताने इशारे करत पळत असे, ड्रायव्हरनं थोडा दम धरावा म्हणून त्याची विनवणी करत असे. त्याच्या मागोमाग मुलांना 'बाय् बाय्' करीत डॉक्टरमहाशय बसच्या दिशेनं पावलं उचलत. हे सकाळचं प्रस्थान एक कौटुंबिक विनोद बनला होता. पाहुणे आले की त्यांची करमणूक करण्यासाठी घरच्यांचा हा एक हातखंडा प्रयोग होता.

इथलं लुईमामाचं घर प्रशस्त होतं. सजावटही भपकेबाज. इथं एक 'बिलियर्ड रूम' होती. मार्सेलच्या खोलीत 'एम्पायर-ब्ल्यू' साटिनचे पडदे होते. आणि डायनिंग रूममध्ये काट्यांसाठी स्टँड होता त्याला काचेच्या लोलकांचे तुकडे बसवलेले होते. मार्सेलला त्याचं भारी आकर्षण विशेषत: त्यातून फाकणाऱ्या रंगीबेरंगी किरणाचं. घरात माणसं बरीच. मार्सेलचा मामा जॉर्ज इथंच राहात होता आणि त्याचे आजोबा-आजी यांची दिवसातून एखादी तरी फेरी होत असे. भोजनसमयी वाईल कुटुंबाच्या तीन पिढ्या एकत्र येत. लुई आणि नाथ, दोघंही धंदा आणि राजकारण याविषयांवर बोलत. त्यांची मतं नेमस्त. संध्याकाळी हवा गरम असल्यास बाहेर बागेमधल्या लाइमवृक्षाखाली संभाषणं रंगत.

प्रूस्त सात वर्षांचा असताना एक घटना घडली. त्याच्या आयुष्यातील अत्यंत महत्त्वाची. तिनं त्याच्या निदर्शनास आणून दिलं की प्रेमाचा अंत झाला आहे आणि सुख अस्तित्वात नाही. हे खंडन करण्याच्या प्रयत्नात त्यानं आपलं आयुष्य घालवलं, आपल्या मैत्रमधून, प्रेम-प्रकरणांमधून आणि 'सोसायटी'बरोबरच्या संबंधांमधून. परंतु सातत्यानं त्याचीच पुनर्निर्मिती होत राहिली. त्याच्या हातून कादंबरी लिहून होईपर्यंत. कादंबरीची निर्मिती-प्रक्रिया सुरू झाली. तो मागं गेला, कालाबाहेरील कालाकडे, जिथं हे अद्याप घडलेलं नव्हतं आणि म्हणूनच कधीही घडणार नव्हतं.

उन्हाळ्यातील संध्याकाळी. मादाम प्रूस्त आपल्या नवऱ्याच्या एका वैद्यकीय सहकाऱ्याची

देखभाल करण्यात गुंतलेली होती आणि त्यामुळे प्रूस्तच्या बेडरूममध्ये जाऊन रोजच्या प्रमाणं त्याला 'गुड-नाइट' चुंबन देण्याचं राहून गेलं होतं. प्रूस्तचा जीव कासावीस झाला. तो खिडकीपाशी गेला. बाहेर चंद्रप्रकाशात न्हालेल्या बागेत मंडळी बसली होती. एका झाडाखाली भोजन आटोपलं होतं. दारूचे घुटके घेत त्यांचं संभाषण चाललेलं होतं. प्रूस्तला काही केल्या झोप येईना. त्यानं नोकराला सांगितलं की खाली जाऊन आईला वर पाठवून दे. पण त्यानं त्याच्या विनंतीकडे दुर्लक्ष केलं. अखेर निकराचा प्रयत्न म्हणून त्यानं खिडकी उघडली आणि मोठ्यानं आईला म्हणाला, 'मॉम, मला तू हवी आहेस, एका सेकंदासाठी.' सुस्वभावी डॉ. प्रूस्तनं बायकोला जाण्यास अनुमती दिली. अधिक शोभा व्हायला नको म्हणून तीही उठली, वर गेली आणि आपल्या मुलाचं तिनं सांत्वन केलं. परंतु डोकं फिरल्यागत तो ओक्साबोक्शी रडत राहिला. कारण कधीही भरून न येणारी इजा झालेली होती. नोकर चौकस नजरेनं बघत राहिला आणि आईनं खुलासा केला, "मार्सेलबाळाला स्वत:लाच कळत नाही की त्याला काय झालंय किंवा त्याला काय हवंय– दोष मज्जातंतूचा." आपलं हे वागणं हा एक हेतु–पुरस्सर गुन्हा आहे असं तो समजत होता. परंतु तसं काही नव्हतं. ज्याच्यावर त्याचा ताबा नाही अशी ती काहीतरी गोष्ट आहे हे त्याला समजलं; आणि त्याला अत्यानंद झाला.

या घटनेचे त्यानं दोन वृत्तांत लिहिले, 'आँ सान्तेय' आणि 'आ ला रशार्श द्युतां पेर्दू' यांमधील प्रारंभीचा प्रसंग. 'आँ सान्तेयमधीलय तुर्जुमा वस्तुस्थितीला धरून आहे.' 'द्यु कोते द शे स्वान' मध्ये प्रसंग अधिक तपशीलवार आहे. अन्य वर्षांमधील अन्य प्रसंगांशी तो जोडण्यात आला आहे. बाग कॉम्ब्रे येथील आहे, घंटा ऐकू येते ती एल्लीअर येथल्या बागेमधली, अभ्यागत आहेत. स्वान, नोकर फ्रानसोइज; आणि उदार अंत:करणाचे वडील. त्यांचं वागणं अधिक हृदयस्पर्शी आहे, उदात्त आहे, ते अनपेक्षित आहे. मुलाच्या खोलीत आपल्या बायकोनं रात्र घालवावी म्हणून ते अनुमती देतात. दोन दिवसांनी येणाऱ्या मुलाच्या वाढदिवसासाठी भेट म्हणून आणलेल्या जॉर्ज सॅण्ड हिची 'फ्रानसोइज ल शाम्पी' कादंबरी आई मोठ्यानं वाचून दाखवते. हा प्रसंग इथं कलात्मकदृष्ट्या समग्र प्रसंगापासून अलग करता येणारा नाही एवढा तो मुरलेला आहे. परंतु हा 'आँ सान्तेय' मध्ये नाही. इथलं निवेदन वस्तुस्थितीला धरून आहे. तरीदेखील कादंबरी वाचण्याचा प्रसंग प्रत्यक्षात घडलेल्या स्मृतीच्या भावनांनी अभिमंत्रित झालेला आहे. ही घटना घडली होती ओतय्य येथल्या एका रात्री. मार्सेलच्या अंगात ताप होता. ताप वाढू नये म्हणून फॅमिली डॉक्टरनं प्रिस्क्रिप्शन दिलं आणि फर्मावलं : 'मुलाला हलक्या आहारावर ठेवा.' मादाम प्रूस्त त्यावर काही बोलली नाही आणि तिच्या मौनावरून मार्सेलनं ताडलं की तिनं एव्हाना निर्णय घेतलेली असणार की मुलाला औषध द्यायचं नाही आणि ताप जाईपर्यंत त्यानं काही खाता कामा नये. अशा प्रसंगी ती म्हणायची, "मुलांनो, माझ्यापेक्षा डॉक्टर असेल हुशार. पण योग्य काय ते मला ठाऊक आहे." म्हणून तिनं मार्सेलला फक्त दूध दिलं आणि त्याला 'फ्रानसोइज ल शाम्पी' आणि 'ला

पती फादेत्त' वाचून दाखवली. त्यानंतर काही दिवसांनी तिनं पाहिलं, त्याचं अंग थंड आहे आणि नाडी स्थिर आहे, त्याला उकडलेला लेफ मासा खायला देण्यात आला.

आईचं चुंबन मार्सेलला प्रथम न मिळणं, नंतर मिळणं हा त्याच्या आयुष्याच्या प्रारंभीच्या काळातील एक निर्णायक भावनात्मक आघात आहे असं समजणं म्हणजे त्या घटनेचं अति-सुलभीकरण होईल. त्याचं महत्त्व नमुन्यादाखल म्हणून नि:संशय प्रतिकात्मक आहे, न नोंदवल्या गेलेल्या असंख्य आठवणींच्या बरोबरीनं. त्याच्या बाळपणाचं एक समग्र स्वरूप म्हणून मानसोपचारतज्ज्ञ सांगतील, हा 'स्क्रीनमेमरी'चा एक प्रकार आहे. या योगे पूर्वकालीन आणि अधिक खोलवरच्या स्मृती किंचित छपवल्या जातात आणि किंचित उघड केल्या जातात. प्रूस्तचं स्वत:चं विश्लेषण पुरेसं समाधानकारक नाही. तो अतीव पश्चात्तापानं सांगतो की प्रस्तुत घटना म्हणजे त्याला नॉर्मल आणि स्वावलंबी बनवण्यासाठीच्या त्याच्या आईच्या प्रयत्नांमधील हा पहिला पराभव, त्याच्या काल्पनिक आणि अस्तित्वात नसलेल्या 'आत्मविश्वासाच्या अभावा'प्रत झालेल्या त्याच्या अवनतीमधील पहिली अवस्था. तथापि, आपण संशय घेऊ शकतो की त्याचा राग हा त्याच्या पश्चात्तापापेक्षा अधिक खोलवर गेलेला आहे. खरी मेख आईची अंतिम शरणागती नव्हेतर तिचा आद्य नकार आहे. तिची मान्यता हे प्रेमाचं कृत्य नव्हतं, तर त्याच्या 'ब्लॅकमेल' पुढे पत्करलेली शरणागती होती. तथापि, यापुढं ती त्याला 'गुड नाईट' चुंबन देईल आणि ती दिली न गेल्यास तो तिचा नेहमीच तिरस्कार करील. 'आँ सान्तेय' मधील आपल्या आईवरची त्याची चीड उघड आहे आणि ती शांत झालेली नाही. त्यानं ती कादंबरी लिहिली तेव्हा ती हयात होती, आणि म्हणून त्यानं तिला अद्याप माफ केलेलं नव्हतं. त्यानं लक्षात घेतलं नव्हतं की त्याच्या जिवाला घोर लागत होता. त्यासाठी दोष द्यायचा झाला तर तो मानवी जीवनाच्या स्वभावधर्माला द्यायला पाहिजे, आपल्या आईला नव्हे. ती मृत्यू पावली आणि त्यानंतर तिला माफ करण्यात आले त्यानंतरच्या 'आ ला रशार्श'मध्ये त्यानं सत्य सांगितलं होतं : त्याच्या आतमध्ये कुठंतरी हुंदके चालूच होते. बागेच्या फाटकावरील अभ्यागतांसाठीच्या घंटीचा 'किणकिणा, कर्कश, अखंड आवाज होतच राहिला होता. त्या आवाजांना मूक करण्यासाठी, जे प्रेम त्यानं गमावलेलं होतं त्या अपार आणि बिनशर्त प्रेमाचा त्यानं सर्वत्र शोध घेतला होता. तो पुन्हा ऐकण्यासाठी त्यानं सतत आपल्या मागण्या एवढ्या टोकापर्यंत वाढवल्या होत्या की त्या नाकारल्या जाव्यात. शक्यता आहे की आपल्या आईचं प्रेम पुन्हा मिळवण्याचा अबोध उद्देश आणि त्याच वेळी तिने ते नाकारल्यामुळं तिला शिक्षा करावी ही इच्छा यांच्या रस्सीखेचीत तो आजारी पडत असावा.

ओतय्यमधील आणखीन एक अतिशय महत्त्वाची घटना : प्रूस्त तेव्हा नऊ वर्षांचा होता. काही मित्रांबरोबर प्रूस्त कुटुंब शेजारच्या बु द बुलोग्नला फिरायला गेलं होतं. तिथून घरी परतत असताना वाटेवर प्रूस्तचा जीव गुदमरल्यासारखा झाला होता. वाटलं होतं, भयभीत

झालेल्या वडिलांच्या डोळ्यांदेखत त्याचे प्राण जाणार. आयुष्यभर त्याला साथ देणाऱ्या दम्याचा तो प्रारंभ होता. वैद्यकीयदृष्ट्या सांगायचं तर त्याची व्याधी अस्वाधीन आणि खरी होती. परंतु आपल्याला असं सांगण्यात आलं आहे की दमा अबोध संघर्ष आणि आकांक्षा यांच्याशी अतिशय निगडीत असतो आणि प्रूस्तच्या बाबतीत ते खरंही होतं. घबराट उडवणारा असा तो एक स्वामी होता, एक आज्ञाधारक सेवकही होता. त्याच्या बालपणी अंगात संचारल्यागत रडण्याचे त्याला झटके येत. त्यांना ज्या गोष्टी कारणीभूत होत्या त्याच त्याच्या दम्याच्या झटक्यांनाही कारणीभूत होत्या. त्याचं अबोध मन मागत होतं त्याच्या बापाची कींव आणि आईचं प्रेम. शक्यता आहे, त्याच्या धापा लागण्यामधून गुदमरण्याचा प्रसंग ओढवत असेल. अश्रूपातामध्ये आणि लैंगिक सुखाच्या क्षणीही असाच जीव गुदमरतो. आपल्या फुफ्फुसांकरवी तो पाप करत होता आणि अंती त्याची फुफ्फुसं त्याचा जीव घेणार होती. फ्लॉबेर आणि डोस्टोएवस्की या थोर लेखकांना अपस्माराचे झटके येत. त्याचं नातं त्यांच्या कलेशी होतं. अलग न करता येण्याजोगं आणि काही अशी अनौपचारिक असं. दमा हा प्रूस्तचा अपस्मार होता. प्रारंभीच्या काळात, इतरांपासूनचं त्याचं वेगळेपण, प्रेमासाठीची त्याची याचना, कर्तव्यं टाळण्याचा एक आसरा यांची दमा ही एक खूण होती. त्याच्या अबोध हेतूनांही अद्याप नवखी अशी. दम्यानं पुढील काळात जगापासून स्वतःला दूर राखायला आणि प्रचंड साहित्यकृती निर्माण करायला मदत केली होती. तथापि, सांप्रत, तो एक छोटा मुलगा होता, वसंतामधील बागेतील हिरव्या पर्णांच्या सुगंधी हवेत गुदमरत होता आणि वेदनांनी गडबडा लोळत होता.

इल्लीअर येथील मार्सेलचे आजोबा मरून बरीच वर्षं झाली होती. २ ऑक्टोबर १८५५ रोजी ते निधन पावले होते. त्यानंतर अकरा वर्षं त्यांच्या पत्नीनं, मार्सेलच्या आजीनं ११ प्लास द्यु मारशेवरील आपलं वाण्याचं दुकान सांभाळलं होतं. तिचा मुलगा डॉ. प्रूस्त एव्हाना तिला आर्थिक सहाय्य करत होता. त्यानंतर तिनं आपलं बिऱ्हाड त्याच रस्त्यावरील ६ नंबरच्या इमारतीत हलवलं होतं. तिची खोली वरच्या मजल्यावर. खिडकीत बसून रस्त्यावरून जाणारी येणारी माणसं ती पाहात असे. बाजारचा दिवस शुक्रवार व रविवारी 'मास.' या दिवशी रस्ता फुलून जाई. काळवेळ अगदी सहजगत्या पुढं सरकत होता.

तिची मुलगी एलिझाबेथ त्याच गावात होती. ज्यूल आमिओत या एका सधन व्यापाऱ्याशी १८४७च्या मेमध्ये तिचं लग्न झालं होतं. सुट्टीत प्रूस्त कुटुंब कधीमधी त्यांच्याकडे येऊन राहात होतं. गुड फ्रायडेच्या आधल्या दिवशी ते पॅरीसहून ट्रेननं निघत. ट्रेन शार्त मार्गे जाई. पंधराएक मैलाचं अंतर. इल्लिअर जवळ येताच चर्चचं सुळक्यासारखं शिखर पाहायला प्रत्येकजण खिडकीतून बाहेर टवकारून पाही. डॉ. प्रूस्तच्या लेखी गाव जवळ आल्याची ती निशाणी होती. त्यांचा हुकूम सुटायचा,'आवराआवर करा. मिनिटभरात आपण पोहोचू.' मग लगबग सर्वजण ट्रेनमधून उतरत. रूळ ओलांडून एलिझाबेथ आत्याच्या

घरची वाट धरत. थंडीनं कुडकुडणारे प्रवासी डायनिंगरूमच्या शेकोटीपाशी बसून ऊब घेत आणि मादाम प्रूस्त चाकरांना सांगे,'मार्सेलसाठी गरम पाण्याची बाटली. गरम म्हणजे अगदी उकळतं आणि उश्या. निदान चार तरी हव्यात. फारशा उंच होणार नाहीत त्या. त्याला बिछान्यात पडायला बऱ्या.' त्या पहिल्या रात्री मार्सेल धडधडत्या काळजानं जागा होई चर्चच्या घंटांचा दोन टोल्याचा नाद तेव्हा काळोखात तरंगत विरून जाई. एकदोन दिवसांनी सवयीनं आवाज ऐकू येईनासा होई.

मार्सेलचा इथला दिनक्रम पॅरीसहून अगदी भिन्न असे. कुडकुडत्या पहाटे तो डायनिंग-रूमच्या शेकोटी शेजारी बसून वाचत असायचा. घराशेजारील बागेतल्या पंपाच्या आवाजानं त्याची एकाग्रत भंग पावे. भिंतीवर घड्याळ, कॅलेंडर आणि रंगवलेल्या थाळ्या. सूर्य माथ्यावर आला की जेवणासाठी टेबल मांडलं जाई. डॉ. प्रूस्तचा आवाज घुमे,'आता पुस्तकं बाजूला. जेवायची वेळ झालीय.' घरातली सर्व मंडळी जमायची आणि मार्सेलला पुस्तक नाईलाजानं बाजूला ठेवावं लागे.

आत्याची स्वयंपाकीणबाई अतिशय सुग्रण, पण आत्याची रूची त्याहूनही चोखंदळ. एखाद दिवशी ती थाळी चिवडत राहायची. तेव्हा प्रत्येकाला कळून चुके की जेवणाबद्दलचं आपलं अप्रिय मत व्यक्त करण्यापासून ती स्वत:ला आवरत आहे. तिच्या डोळ्यामधून व्यक्त होणारी नाराजी पाहून तिच्या नवऱ्याच्या रागाचा पारा चढे. तो तिरकसपणे तिचं मत विचारी, प्रश्नांचा भडीमार करे, खवळून उठे. एवढं होऊनही ती ढिम्म. तिला खुंट्याला बांधून पेटवली असती तरी तिच्या तोंडून शब्द फुटला नसता की पुडिंगमध्ये साखर थोडी कमी झालीय. भोजनानंतर कॉफीपान. कॉफी ज्यूल अमिओत स्वत: बनवायचा.

सुरुवाती-सुरुवातीला इलिझाबेथआत्या जेवायला खाली उतरे. हळूहळू तिनं गावाबाहेर पडायचं थांबवलं. नंतर क्रमाक्रमानं घर, खोली आणि अखेरीस बिछाना सोडून बाहेर पडणं तिनं बंद केलं. विचीपाणी, पेन्सिन, लाइम-चहा आणि मेडेलिन केक हाच तिचा आहार बनला. आपण रोगग्रस्त आहोत या भ्रमातच तिचा वावर होता, तोही तिच्या बेडरूमच्या चार भिंतीच्या आत. कालांतरानं तिनं मित्रांच्या भेटीगाठी बंद केल्या. कारण ते म्हणायचे, ती अगदी बरी आहे, तिला काही झालेलं नाही, फक्त तिनं स्वच्छ सूर्यप्रकाशात फिरायला हवं किंवा चांगला लालभडक गोमांसाचा तुकडा खायला हवा. दोनच अभ्यागतांचं स्वागत होत असे. त्यांपैकी एक होता पाद्री. यानंच मार्सेलला लॅटिनची तोंडओळख करून दिली, आपल्या बागेतल्या फुलांचा नावासकट परिचय घडवला, गावातल्या स्थळांच्या नावांची उत्पत्ती ऐकवली. परंतु त्याच्याहून इलिझाबेथला प्रिय होती एक व्यक्ती. 'आ ला रशार्श' मध्ये तिचा उल्लेख एलाली या नावानं करण्यात आला आहे. एलिझाबेथ आजारी आहे असंच ती भासवत असे. त्यामुळे तिची मर्जी ती सांभाळून होती. शिवाय मरणाचा विषय काढून तिला घाबरवत नव्हती. मार्सेलच्या आजीबरोबर नोकर-सोबती म्हणून ती राहात होती. चर्चचा 'मास'

संपला की ती येई व नंतर आठवडाभराच्या 'गॉसिप'ला रंग चढे. निरोप घेते समयी एक सुवर्ण नाणं तिच्या हातावर पडे आणि स्वयंपाकीणबाईच्या चेहऱ्यावर संतापानं आठी पडे. तिच्याविरुद्ध स्वयंपाकीणबाईला काहीही करता येत नसलं तरी घरात ती हुकुमशहा होती. तथापि, पॅरीसहून येणाऱ्या पाहुण्यांच्या आदरसत्कारात ती काही उणं पडू देत नसे. तिचं मालकिणीकडे दुर्लक्ष होईल पण कॉफी आणि गरम-पाण्याच्या बाटल्यांचा,'गरम म्हणजे अगदी उकळतं' हे ती कधी विसरत नव्हती. मादाम प्रूस्त म्हणे,'पोरीला कमालीचं डोकं आहे, किती सहज तिला गोष्टी कळतात.' पण डायनिंगरूममधील या पोरीचा हसरा चेहरा स्वयंपाकघरात मात्र उग्र बनत असे. तिथल्या तिच्या हाताखाली काम करणाऱ्यांबरोबरची तिची क्रूर वागणूक मार्सेलच्या नजरेनं टिपली होती, संतापानं, कणवेनं. परमीडक वृत्तीची एका मुलाला झालेली ही पहिली ओळख होती. त्यानं पाहिलं, आपल्या जाणीव असो वा नसो, आपल्यासकट समस्त मानवजातीच्या नसानसातून 'इव्हिल' वाहात आहे आणि आपल्या आईवरल्या आपल्या रागानं ते त्याच्यामध्ये कायमचं रुजलं आहे. त्या पोरीच्या बोलण्यात बरेच जुने शब्द येत, भाषेच्या कसरती असत, ज्या त्याला पुढे मोलियरमध्ये आढळून आल्या. तिचा चेहरा भारदस्त होता. त्यावरील धैर्य नजरेत भरे. भोळसटपणा आणि कावेबाजपणा याचंही बेमिसाल मिश्रण तिच्या चेहऱ्यावर आढळले. ही वैशिष्ट्य त्याला पुढं शार्तच्या शिल्पकृतींमध्ये आढळली. त्याच्या लेखी ती गतकालीन फ्रांसचं एक प्रतिक बनलं, 'एक मध्ययुगीन शेतकरीण, जी एकोणिसाव्या शतकात आम्हाला शिजवून जेऊ घालायला हयात राहिली होती.' तिचीही जातकुळी कुठल्याही गुर्मीते एवढीच प्राचीन. पुढं ती साहित्य-सृष्टीत अवतरली फ्रानसॉइज या नावानं आणि तिची धनीण, काहीही फेरबदलन होता, प्रकटली लेओनीआत्या म्हणून.

प्रूस्तची खोलीवरच्या मजल्यावर होती. दुपारचं भोजन आटोपलं की आपल्या खोलीत जायचा. खोली छोटी होती. जुनाट फॅशनची. त्याच्या अंथरुणाभोवती शुभ्र पडदे. बिछान्यावर दिवसाफुलांची नक्षी असलेली रजई. विणकाम केलेला पलंगपोस आणि केम्ब्रिकच्या उश्या. उश्या तिथून उचलून त्याला खुर्चीवर ठेवाव्या लागत,'जिथं रात्र घालवायला त्यांची संमती होती',तो झोपायला जाईस्तोवर. बिछान्याशेजारी एक टेबल. त्यावर एक निळं काचेचं टम्बलर आणि एक साखरेचं तसराळं, त्याला साजेसा एक पाण्याचा खुजा. आत्याचा मोलकरणीला हुकूम सुटलेला असे की ते आल्यानंतर लगेच दुसऱ्या दिवशी तो खाली करायचा 'कारण मुलगा तो उलटून टाकील.' शेकोटीवर एक घड्याळ. एवढं भलंभक्कम, ते बंद पडलं तर चावी देण्यासाठी घड्याळवाल्याला पाचारण करावं लागे. आरामखुर्च्या होत्या. त्यावर नक्षीकाम केलेले गुलाब,'काट्यांवाचून नव्हते',कारण तो बसला की ते त्याला खुपत असत. खिडक्यांना कुचकामी पडद्यांचे तीन संच होते. सर्वांना एकाचवेळी सरकवणं महादुष्कर काम. खोलीभर बऱ्याच गोष्टी 'त्या कुणाला उपयोगी पडतील या अपेक्षेनं त्या तिथं ठेवण्यात

आल्या नव्हत्या हे उघड होतं'; परंतु त्यांचा निरुपयोगीपणानच त्यांना व्यक्तित्व, त्यांचं स्वत:चं असं गूढ जीवन बहाल केलं होतं. भिंतीवर राजकुमार युजिनचं एन्ग्रेव्हिंग आणि बोत्तीसेलीच्या प्रायमावेराचं छायाचित्र. त्याच्या या खोलीतल्या वस्तूंना, सौंदर्याहून अधिक मौल्यवान गुणवैशिष्ट्यं होती, त्याच्या कल्पनाशक्तीकरिता ती कच्ची सामग्री होती. पुढं १८९० मध्ये त्याची अभिरुची चोखंदळ बनली, आयुष्यभर तशी राहिली, तरीसुद्धा तो आपली खोली विद्रूप परंतु पवित्र वस्तूंनी भरून टाकत होता. कारण त्याचे मृत आईवडील, त्याचं बालपण, गमावलेला काळ यांच्याबद्दल त्या त्याच्याशी बोलत असत. तो जगात आला होता तो रेडी-मेड सौंदर्य गोळा करण्यासाठी नव्हे तर ते निर्माण करण्यासाठी. मार्सेल या त्याच्या खोलीच्या या पसाऱ्यात दुपारी वाचत असायचा, इथं तो झोपण्याआधी आई त्याला 'गुड-नाइट' चुंबन देण्यासाठी येईल म्हणून तो वाट पाहात राहायचा; आणि पाहुण्यासमवेत ती नजरेआड व्हायची तेव्हा तिच्या वियोगाच्या धास्तीनं कासावीस व्हायचा, उठायचा, येरझारा घालायचा. चर्चच्या घंटांचे ठोके मोजायचा. ते वाजणे एवढ्या मोठ्यानं वाटायचं की, त्याच्या माथ्यावरल्या छतामधूनच ते निनादत आहेत.

हवामान चांगलं असलं तर मार्सेल आपल्या कुटुंबियांसमवेत गावातून फेरफटका मारत होता, गावालगतच्या खेड्यांमध्ये जात होता. त्यानं बाजारपेठ पाहिली. इथं त्याचे आजोबा एकेकाळी राहात होते आणि आता त्याच्या आत्याच्या यजमानांचं दुकान तिथं होतं. सेंट जॅकचं चर्च आतून बाहेरून चौकसपणे न्याहाळलं. इथंच एकेकाळी त्यांच्या पूर्वजांचे आश्रयदाते, इल्लिअर्सची पूजाअर्चा केली जात होती. इथल्या गावाची विचित्र नावं ऐकून, पाहून त्याला मौज वाटे. बऱ्याचदा भ्रमंती प्रेकाटलाँपर्यंतच असायची. आत्याच्या नवऱ्यानं इथं एक सुरेख पार्क तयार केला होता. इथं होत्या पाऊलवाटा, हिरवीगार कुरणं, मुद्दाम तयार केलेल्या पुष्करणींमध्ये झेपावणारा एक छोटा ओढा, एक चिमुकला पुल आणि उन्हाळ्यात राहाण्यासाठी एक घर. मार्सेल इथं रॉबर्टसंगे खेळे किंवा आपल्या काकांना बागकामात मदत करत असे, किंवा पार्कभर एकटाच हिंडत असे. आमिओत आणि प्रूस्त कुटुंबं, त्याचे मित्र, मुलंबाळं इथं खास पिकनिकला येत असत.

इल्लिअर हे केवळ गमावलं गेलेलं इहलोकीचं नंदनवन नव्हतं, त्याहून अधिक काही होतं. ते निष्पापपणाचं, बाळपणाचं, नैसर्गिक सौंदर्याचं आणि वृद्ध वा मृत प्रिय व्यक्तीं-बद्दलच्या कौटुंबिक जिव्हाळ्याचं एक प्रतीक होतं. या गावानं त्याच्या कादंबरीच्या पहिल्या प्रकरणाची तरतूद केलीच, शिवाय एक तात्विक दृष्टी दिली. इथंच अबोध स्मृतीची पहिली चुणूक त्याला मिळाली. 'आँ सान्तेय' मध्ये नमूद केलं गेलं आहे त्यानुसार, स्मृती अबोध नव्हती तर बोधपूर्व होती. ती आधीच्या वर्षातील एखाद्या दृश्याच्या व भावनेच्या पुनरावृत्तीनं जागी झालेली असते. दरम्यानच्या पॅरीसमधील हिवाळ्यात विसरली गेलेली ही स्मृती तो इल्लिअरला परतल्यानंतर तत्काळ आणि अडथळ्याविना जागी होत असे. अशा प्रकारच्या

आठवणी, पुढं सरकणाऱ्या वर्षांनी, ज्यात त्यांना पुनरावृत्त होण्याची संधी लाभत नाही अशा प्रदीर्घ काळानं, आणि व्यक्तित्वात होणाऱ्या बदलांनी खोलवर दडपल्या जाऊन अबोध बनतात. आणि स्मृती गूढ असते. स्मृती म्हणूनही सुरूवातीला तिची ओळख पटत नाही. केवळ दीर्घ प्रयत्नांनी तिचा मूलस्त्रोत जाणिवेच्या स्तरावर येऊ शकतो. आणि ही धडपड केवळ आनंद आणि यशप्राप्तीतं नव्हे तर ज्याचा शोध लागलेला असतो त्याच्या अंगभूत मूल्यानं फलदायी होतो : शाश्वतामध्ये विस्मयकारकरित्या जतन केलेल्या गतकालाचा एखादा अंश पुन:प्राप्त काळाचा एक पळ. अबोध स्मृतीची सांगड स्पष्ट न करता येणाऱ्या हर्षाच्या अन्य भावनांशी घातली जाते, ज्यामध्ये स्मृतीचा सहभाग नसतो, उदाहरणार्थ, गिरक्या घेणाऱ्या चर्चच्या सुळक्यासारख्या कळसामुळे लागलेली तंद्री. त्याच्यामध्ये कुठंतरी खोलवर एखाद्या प्रदेशाचं अस्तित्व त्या प्रकट करतात, ज्यांच सौंदर्य बावनकशी आणि शाश्वत असतं. नैराश्य, पाप आणि मृत्यू यांनी दूषित झालेलं नसतं. पुढील काळात या भावना त्याच्या लेखी जगातल्या अन्य कुठल्याही गोष्टींपेक्षा अधिक महत्त्वपूर्ण बनल्या, प्रेम आणि 'सोसायटी' यांच्या खोट्या, बेगडी मोहकतेहून अधिक मौल्यवान : त्या होत्या अस्सल वास्तवाप्रत घेऊन जाणाऱ्या मार्गावरील खुणेचे खांब, अनपेक्षितरित्य कमी अंतरानं चिन्हांकित केलेले. त्याच्या हरवलेल्या गावाकडे परत जाण्याचा मार्ग जर का त्याला सापडला तर त्याचं जीवन सार्थकी लागणार होतं आणि त्याच्या पापांना क्षमा केली जाणार होती.

इल्लिअर पुन्हा मिळवायचं असेल तर कालाप्रमाणंच ते आधी हरवलं गेलं पाहिजे. तो तेरा वर्षांचा असताना या नंदनवनाला त्याला जवळजवळ पारखं व्हावं लागलं. एव्हाना वडिलधाऱ्यांनी निर्णय घेतला होता की, त्याच्या प्रकृतीच्या दृष्टीनं इल्लिअर चांगलं नाही. केवळ समुद्र आणि पहाड या ठिकाणीची हवाच त्याला बरी करू शकेल. त्यामुळे पुढील काळात सुट्टीमध्ये तो आजीबरोबर नॉर्मंडीच्या समुद्रकिनारी जात होता किंवा आईबरोबर अन्तर्गत 'हेल्थ-रिझॉर्ट' मध्ये. बहुधा त्याच्या शिक्षणानेही इल्लिअरच्या पूर्वीसारख्या आयत्या वेळीच्या भेटी अवघड केल्या असाव्यात. कारण त्याचं आता शालेय शिक्षण संपलं होतं आणि तो 'लिसे काँदोसे' मध्ये दाखल झाला होता. वयाची तिशी ओलांडेपर्यंत तो अधून-मधून क्वचित इल्लिअरला जात होता. त्या गावानं त्याच्यावर टाकलेली मोहिनी भंग पावली होती. परंतु त्याचं वय वाढत गेलं तसतश्या या गावच्या आठवणी अधिक ठसठशीत आणि अधिक धूसर झाल्या, स्वप्नामधील निसर्गदृश्यागत. भूगोल बदलला, काळानं अवकाशात फेरबद्दल केले. एलिझाबेथआत्याचं घर कुठल्या रस्त्यावर होतं आणि इल्लिअरच्या कुठल्या टोकाला वाहनांना बंदी असणारी दुकानांची गल्ली होती? घरामागील बाग रुंद झाली, विस्तारली, आणि तिच्या खडीच्या मार्गावरून त्याची मृत आजी पावसात फेऱ्या घालत होती. कुटुंबाच्या एका अभ्यागताला चार्ल्स हासचा उदास आणि छद्मी चेहरा होता. त्यानं स्वान आणि गीलबेर्न यांच्यासाठी 'प्रे कातलाँ'मध्ये एक घर बांधलं आणि 'ल रॉशेर द

मिरुग्रेंला’ समलिंगी संभोगवृत्तीची पोरगी आणली.

२

पॅरिसमधील शाँ द लिस्सेजवळ प्रूस्त कुटुंब रहात होतं. दुपारी जवळच्या मैदानात छोट्या मार्सेलला बऱ्याचदा पाठवलं जाई. मैदानी खेळाचं आकर्षण त्याला नव्हतं. तो सशक्तही नव्हता. सवंगडी म्हणून मुलांपेक्षा त्याला मुली पसंत असत. शाळेतील त्याचा मित्र होता जाक बिझे. ‘कारमेन’च्या संगीतकाराचा हा मुलगा. आपापल्या मुलांना त्यांची आई घेऊन शाळेत पोहोचवायला जाई. तसा रिवाज होता. याच काळात मार्सेलनं जॅकची देखणी आणि बुद्धिमान आई पाहिली असावी. ती विधवा होती. १८७५ मध्ये ऑपेराच्या अपयशानं खचून तिचा नवरा मृत्यू पावला होता. ज्यू संगीतकार फ्रॉमेन्टल हालेव्ही याची ती मुलगी आणि गॅर्मांतची भावी यजमानीण. सहा वर्षानंतर मार्सेल तिच्या सॅलाँमध्ये जायला सुरुवात करणार होता, आणि त्याची ती आयुष्यभराची मैत्रीण बनणार होती. परंतु आता ती ‘सोसायटी’पासून दूर राहणारी एक एकाकी विधवा होती.

मार्सेलच्या आईवडिलांनी ‘लिसे काँदोसे’ची निवड केली याचं मुख्य कारण म्हणजे ती शाळा त्यांच्या घरापासून जवळ होती. त्यांची ही निवड मार्सेलच्या दृष्टीनं सुदैवी होती. इथं इतर शाळाप्रमाणं शिस्तीची जाचक बंधनं नव्हती. इथल्या बऱ्याच शिक्षकांना लेखनाची हौस होती. लेखक म्हणून थोडसं नावही ते मिळवून होते. आपल्या विद्यार्थ्यांवर ज्ञानाची जबरदस्ती करण्याचा त्यांचा खाक्या नव्हता. त्यांची वागणूक प्रेमळ होती. विद्यार्थ्यांमध्ये साहित्याची रुची निर्माण करण्याकडे त्यांचा कल होता. शाळेचे हेडमास्तर होते युलीआँ गिरोद (Julien Giraud) परोपकारी माणूस. विद्यार्थ्यांना आपला शिक्षक निवडण्याची मुभा त्यांनी दिलेली होती.

१८८२ च्या ऑक्टोबर मध्ये मार्सेल शाळेत दाखल झाला. १८८७ च्या ऑक्टोबरमध्ये ‘अलंकारशास्त्रा’च्या अभ्यासाला प्रारंभ झाला. या दरम्यानच्या पाच वर्षांच्या काळातील त्याच्या शालेय जीवनाचा लिखित पुरावा फारच अल्प आहे. तो हुशार विद्यार्थी होता आणि बऱ्याचदा उत्तम श्रेणीत यश मिळवत होता. परंतु आजारपणामुळं त्याला इतक्या वेळा घरी राहावं लागे की त्याच्या प्रगतीत काहीसा अनियमितपणा असे. उदाहरणार्थ, १८८४ मध्ये तो मागं पडला होता आणि पुन्हा १८८७ मध्ये तो मागं पडला होता. परंतु आपल्या हुशारीनं फुकट गेलेल्या दिवसांची तो भरपाई करत होता. तो एक विद्यार्थी होता. भरपूर फँटसी असलेला, आत्ममग्न आणि दिवास्वप्नं यांचा एक गोंधळात टाकणारा अप्रेंटिस शिकाऊ उमेदवार होता. पारितोषिकं मिळवून चमकण्याचा महत्त्वाकांक्षेपेक्षा वाचन, चिंतन आणि भावशक्ती यांच्यामध्ये त्याला अधिक आवड होती. त्याला अपयश मिळतं ते त्याच्या आजारपणामुळे, वा सुस्तपणामुळे नसून, त्याच्या ‘आत्मविश्वासाच्या अभावा’मुळे या निर्णयाप्रत त्याचे पालक आले. हा आरोप ते त्याच्यावर वरचेवर करत. त्यामुळे त्यावर अर्धवट का होईना मार्सेलच्या विश्वास बसला आणि आपल्या दोन्ही कादंबऱ्यांच्या नायकांना

ते स्वभाव वैशिष्ट्य त्यानं दिलं; आणि त्याच्या समीक्षकांनी त्याच्या पश्चात त्यावर विश्वास ठेवला.

शक्यता आहे, तिसऱ्या यत्तेत मार्सेलनं अधिक वर्षं घेतली याला त्याचं आजारपण नव्हे तर प्रेमाचं दु:ख कारणीभूत झालं होतं. इल्लिअरयेथील त्याची छोटी सवंगडी गतकाळात हरवली होती, पण १८८६च्या उन्हाळ्यात तिचं प्रतिरूप त्याला गवसलं. त्याच वय होतं तेव्हा पंधरा. तिच्यावर त्याचा पुरता जीव जडावला. ही ओढ आयुष्यभर टिकून राहिली. त्याच्या निधनाआधी काही वर्षं तिच्याबद्दलची भावना त्यानं 'माझ्या आयुष्यातील दोन महान प्रेमांपैकी ती एक' या शब्दात व्यक्त केलेली आहे. या मुलीचं नाव मारी द बनार्डकी. ती त्याला भेटली शाँ द लिसेमध्येच. दुपारी तीन वाजता शाळा सुटल्यानंतर तो दररोज शाळू-सोबत्यांसमवेत, पोरींच्या ताफ्याबरोबर खेळायला जात होता. या ग्रुपमध्ये भावी तत्त्वज्ञ, उद्योगपती, डॉक्टर, इंजिनियर, अर्थशास्त्रज्ञ, राजकारणी, बॅरिस्टर, सेनापती आणि राजदूत होते. मुलीमध्ये होत्या, आन्ताइनेत्त आणि लूसी फोर्व्हं या बहिणी. थोरामोठ्यांच्या घरच्या या लेकी. लूसी मार्सेलहून पाच वर्षांनी मोठी आणि तिची बहीण एका वर्षानं. या धाकट्या बहिणीबरोबरची त्याची मैत्री म्हणजे मारी द बनार्डकीवरील प्रेमाचं एक सौम्य स्वरूप, अठरा महिन्याआधीचं. तिची आई त्याच्या आईला बऱ्याच वर्षांपासून ओळखत होती. 'तो अतिशय बुद्धिमान आहे, परंतु दुर्दैवानं नाजुक प्रकृतीचा आहे' हे तिचं त्याच्याबद्दलचं मत. या काळात त्याचं वाचनही अफाट होतं. त्याला आवडलेल्या कविता तो आन्ताइनेत्तला ऐकवत होता आणि लाजून विचारत होता, 'आवडल्या तुला?' आणि याची भरपाई तिनं त्याला 'कारमेन' शिकवत केली होती. आपल्या एका दृष्टीक्षेपानं ती त्याला स्वत:ला हवं ते करायला लावत होती.

मारी आणि तिची धाकटी बहीण नेल्ली या निकोलस द बर्नाडकी या पोलीश उमरावाच्या मुली. चहाच्या व्यापारावर त्यानं धनसंपत्ती गोळा केली होती असं सागितलं जात होतं. उर्मट माणूस ही त्याची ख्याती तर त्याची पत्नी, शाम्पेन आणि प्रेम यांची प्यासी म्हणून प्रसिद्ध. मार्सेल मारीच्या प्रेमात पडला तेव्हा ती होती पंधरा वर्षाची. त्यांची भेट झाली होती खेळाच्या मैदानावर. तो तिच्या मागंमागं असायचा. ती जे खेळ खेळायची तेच तो खेळायचा. तिच्या गटात सामल होण्याचा तो हरप्रकारे प्रयत्न करायचा. एकदा संभावितपणे नेल्लीच्या गटात सामील होण्याची इच्छा त्यानं व्यक्त केली तेव्हा ती खुद्कन हसून म्हणाली, 'नको, मारीच्या बाजूचा आहेस तू, खूष असतोस तू त्यामुळे.' त्यावर मारी कुत्सितपणे पण लाडीक हसली, आणि त्याला वाटलं, चारचौघात तिनं असं प्रेम व्यक्त केल्यानं तिच्या प्रेमाला त्यानं प्रतिसाद द्यायला हवा. पावसाळ्यात घराच्या खिडकीपाशी उभा राहायचा. पाऊस ओसरण्याची वाट पाहात. पाऊस थांबला, सूर्यकिरणं फाकली की तो मैदानावर धाव घ्यायचा. मारी त्याच्या आधीच तिनं पोहोचलेली असायची. 'लग्गेच खेळायला सुरुवात करू या. माझ्या बाजूला तू'

या शब्दांनी ती त्याचं स्वागत करायची. त्यानंतर डिसेंबरमध्ये हिमवर्षाव सुरू व्हायचा. एक दिवस मादम प्रूस्त म्हणाली, 'मैदानात चिटपाखरूही नसणार. आकाशाकडे असा टक लावून बसला आहेस ! मारी नाही यायची. निश्चित. तिच्या घरची माणसं तिचे सुरेख कपडे खराब करू नाही द्यायचे'. आपल्या भावनाशून्य आईला तडाखा मारण्याची उर्मी दाबून टाकत त्यानं उत्तर दिलं, 'ठाऊक आहे मला, ती नसणार तिथं'. तो बाहेर पडला. मारीला भेटण्यासाठा म्हणून नव्हे तर आपल्या आशांचे धवल भग्नावशेष पाहाण्यासाठी. सुनसान कुरणावर बर्फाचं आच्छादन. कारंज्यावरील बाल देवदूतांच्या नग्न फुगवट्यावरू लोंबकरणारे हिमलोलक आणि अहो आश्चर्यम् ! समोर मारी. तिच्या मागं तिची गव्हर्नेस. हळूहळू एकएक करत मित्र गोळा झाले. बर्फाचे गोळे एकमेकांवर फेकले जाऊ लागले. त्यानं दिलेला बर्फाचा गोळा मारीनं त्याच्याच मानेवर मारला. त्याला वाटलं, तिचं हे कृत्य म्हणजे त्याच्यावरील तिच्या ओढीचं निदर्शक. आपल्या प्रेमाची बव्हंशी घोषणाच. आणि त्यांचे सारे सोबती हे जाणून आहेत.

रोज रात्री झोपी जाण्याआधी तो स्वत:ला सांगायचा, 'उद्या मी तिला भेटणार आहे'; आणि जर का त्याला मध्येच जाग आली तर 'आजच, निश्चित !' असं म्हणून पुन्हा झोपी जायचा. अंथरुणावर पडल्या पडल्या तो ठरवायचा की या प्रेमप्रकरणात उद्या आपण निर्णायक पाऊल उचलायचं, किंवा मारीच्या चेहऱ्यावरचे चकवा देणारे तपशील तरी निदान आठवत राहायचे. परंतु दुसरा दिवस उजाडल्यानंतर मैदानावरील फालतू खेळामध्येच दुपार टळून जायची आणि तिचा चेहरा बहरून गेलेला. पुढं 'आँ सान्तेय' मध्ये त्यानं लिहिलं, 'तिला पाहाण्यामधील सौख्याचं मोजमाप तिला पाहाण्याच्या त्याच्या अमर्याद ओढीनं तो करत होता आणि तिचं जाणं त्याच्या शोकानं; तिची प्रत्यक्ष उपस्थिती त्याला फारशी सुखद वाटत नव्हती'. मैदानामध्ये क्वचित प्रसंगी त्याला वाटायचं, तो प्रेम करत असलेल्या छोट्या मुलीहून तो भेटत होता ती छोटी मुलगी, का कोण जाणे, एक वेगळी व्यक्ती आहे: अशी वैशिष्ट्यपूर्ण लक्षणं असतात रोमँटिक प्रेमाची, अशा वेळी प्रेम केलं जातं ते एका आदर्शावर, ओढीच्या चेतनगुणोक्तीवर, 'स्व'च्या प्रक्षेपणावर, व्यक्तीवर नव्हे.

फेब्रुवारीमध्ये तो इन्फ्ल्युएन्झानं आजारी पडला. मैदानावर जाण्यात खंड पडला. मारीला तो भेटू शकत नव्हता. आपल्याविना ती मैदानावर मौजमजा करत असणार हा विचार त्याला बोचला. परंतु ती सुद्धा आजारी असल्याचं कळून येताच तो सुखवला. तो आजारी असतानाच तिच्याकडून एक चिठ्ठी आली. आईच्या वतीनं तिनं त्याला चहाचं आमंत्रण दिलं होतं. बरं वाटू लागताच तो तिच्या घरी पोहाचेला. ज्या घरात आपण पाऊल टाकू शकू असा विचार स्वप्नातही त्याच्या मनाला स्पर्शून गेला नव्हता त्या घरात त्यानं प्रवेश केला. मारीला भेटला. तिच्या आईवडलांना भेटला. त्यांनी पाहुण्याचं प्रेमानं स्वागत केलं. सांगितलं येतं जा वरचेवर आणि मारीला वाङ्मय समजावून दे. "तिच्यावर त्याचा प्रभाव आहे ही बाब चांगली आहे'." तथापि, या त्यांच्या मैत्रीबाबत ते समाधानी मात्र नव्हते. मार्सेलच्या बुद्धिमत्तेविषयी

त्यांना कौतुक होतं, तरी देखील तो आपल्यासारख्या उच्च वर्गातील नाही .ही बाब ते नजरेआड करू शकत नव्हते.

१८८७ च्या वसंतामध्ये मार्सेल-मारीच्या भेटीगाठी थांबल्या. 'आँ सान्तेय'मध्ये दिलेले कारण : त्याचे आईवडील. विकारावरतेमुळे तो दु:खी होतो, आणि भावनिक संतुलन गमावून बसतो हे लक्षात येताच ते धास्तावले होते आणि त्यानी त्यांच्या भेटींना मज्जाव केला होता. तर आ लोम्ब्र A L'Ombre मध्ये निवेदकाची खातरजमा होते की त्याची मैत्रीण त्याच्या प्रेमाला प्रतिसाद देत नाही, त्यामुळे तो स्वत:च निर्णय घेतो की इत:पर तिला भेटायचं नाही. वास्तव आयुष्यामध्ये ही दोन्ही कथनं कदाचित् खरीही असतील. परंतु काही काळ नैराश्यग्रस्त अवस्थेत असताना घराच्या बाल्कनीतून उडी मारून जीव देण्याचा विचार मार्सेलच्या मनात डोकावला होता. यातून तो सावरला. पण त्याचं आयुष्य पार पालटून गेलं होतं. आपल्या आईव्यतिरिक्त अन्य कुणावर प्रेम करण्याचा आणि प्रेम करून घेण्याचा त्याचा पहिला प्रयत्न– म्हणजेच मातृगमनापासून सुटका करून घेण्याचा– अपेशी ठरला होता विजायतीय आणि समवयस्क व्यक्तीवर प्रेम करण्याचं चातुर्य, हाच कुटुंबाच्या कारावासामधून सुटका करून घेण्याचा एकमेव विधिग्राह्य मार्ग होता; आणि तो आता बंद झाला होता. दुसऱ्या एखाद्या तरुण मुलीवर प्रेम करण्याचा धोका त्यानं पत्करायचं म्हटलं तर त्याचे क्लेश, त्याची मानखंडना आणि त्याच्या आईची अवकृपा यांचीच केवळ पुनरावृत्ती झाली असती. एखाद्या प्रसूतीपूर्व पूर्वकळांनी जरी नसलं, तरी त्याच्या प्रारंभीच्या बाळपणात सतत कार्यरत असलेल्या मानसिक ताणतणावांनी, आजन्म समलिंग संभोगीवृत्तीमध्ये त्याची अखेर व्हायची. मारी द बानार्डकीशी त्याची भेट होण्यापूर्वीच, हे ठरूनच गेलेलं होतं. भावी समलिंगरतीच्या पौगंडावस्थेत कधीमधी घडून येतं, त्यानुसार असेल कदाचित्, आपल्या खऱ्याखुऱ्या कामनांमधून स्वत:ची मोकळीक करून घेण्यासाठी ज्यात अपयश ठरलेलंच असतं असं भिन्नलिंगी आकर्षण त्याच्या अबोध मनानं हेतुपुरस्सर पसंत केलं असावं. शक्यता आहे, प्रत्येक समलिंगरतीमध्ये एक भिन्नलिंगरती 'डबल' असतो, प्रारंभी वरचढ. तो शक्तिमान भाऊ हालचाल करू लागण्याआधीच त्याला कारावासात टाकावंच लागतं, त्याला दुबळा बनवावंच लागतं. मार्सेलनं 'नॉर्मल' बनण्याचा प्रयत्न केला : त्यात तो अपयशी ठरला. त्यात दोष त्याचा नव्हता. असलाच तर थोडाबहुत. दोषी होती मारी. तिनं त्याला अव्हेरलं होतं, आणि त्याच्या आईचीही तीच अपेक्षा होती. म्हणजेच तो दोषमुक्त झाला होता. शिवाय मारीनं त्यानं विश्वास ठेवावा अशी शिकवण दिली होती, बहुधा योग्य अशी, की कुटुंबाबाहेरील प्रेम ही अशी एकमेव भावना आहे तिची परतफेड करता येत नाही.

त्याच्या आयुष्याचा बराचसा काळ असा होता ज्यात तरुण पोरींची भुरळ त्याला अधूनमधून पडत होती. परंतु त्यांच्याविषयीच्या त्याच्या भावना नेहमीच संमिश्र असत. त्यात आकर्षणाच्या जोडीनं तिटकारा असे, आसक्तीबरोबरच भीतीही असे. आणि त्यांच्या छोट्या

गटानं त्याच्या कादंबरीत शिरकाव करून घेतलेला दिसतो. त्याच्या आईच्या मृत्यूनंतर, मध्यम वयाचा होता तो तेव्हा, एकदाच, फक्त एकदाच, लग्न करण्याचा विचार त्याच्या मनात घोळत होता. पण त्यावेळी त्यानं निर्णय घेतला तो कादंबरी लिहिण्याचा. आयुष्यात अखेरपर्यंत, मधून मधून, तो सतत स्त्रियांच्या प्रेमात पडत होता. परंतु त्याची पसंती असे. एखादी आदरणीय विवाहित गृहिणी, त्याच्याहून वीसेक वर्षांनी मोठी; किंवा एखादी उच्च वर्गीय, धोका नसलेली आणि अप्राप्य वारांगना, किंवा त्याच्याच वयाची किंवा त्याच्याहून लहान अविवाहित अशा पोरीवर तो प्रेम करायचा तर ती असायची त्याच्या एखाद्या दोस्ताची वाक्दत्तवधू किंवा 'मिस्ट्रेस'. फ्रॉईडवादी म्हणतील की विवाहित गृहिणी किंवा वारांगना या 'माता-प्रतिकं' असतात. पुढं ते जोड देतात की, पुरुष मित्रांशी आधीच वाङ्-निश्चय झालेल्या स्त्रियांविषयीची पसंती महणजे समलिंग संभोगवृत्तीची खास लक्षण. मार्सेलमध्ये नाकारण्यात आलेला त्याचा असा एक भाग होता, जो वरचढ होऊ न देण्यासाठी त्याहून शक्तीशाली प्रेरणांनी त्याला कायमचा रोखलेला होता, त्या भागाच्या लेखी, तरुण मुलीसुद्धा मारी द बानार्डकीच्या 'बदली' होत्या; आणि त्यानं जेव्हा पॅरिसच्या समाज जीवनात पाऊल टाकलं तेव्हा काळ आणि सवय यांच्या भाराखाली चिरडला गेलेला एक कैदी आपल्या संग तो घेऊन गेला होता, एक गाडला गेलेला भिन्नलिंगरती मुलगा जो गमावलेल्या एका छोट्या मुलीसाठी सतत आक्रोशत होता.

मारीची ओळख होण्याआधी काही दिवस म्हणजे आन्ताइनेत फोर्व्ह हिच्याशी मार्सेलची सलगी होती तो काळ. आनाइनेतपाशी एक 'कन्फेशन' पुस्तिका होती. व्हिक्टोरियन इंग्लंडमधून आंग्लाळलेल्या फ्रांसमध्ये आलेली. त्यात पंचवीस प्रश्न छापलेले होते. प्रश्न इंग्रजीमध्ये होते. आताइनेतच्या मालकीच्या पुस्तिकेतील प्रश्नांपुढे प्रूस्तनं उत्तरं दिली आहेत. अर्थात् फ्रेंचमधून. शक्यता आहे की ते प्रश्न समजून घेण्याइतपत इंग्रजी आपल्या आईकडून तो शिकला असेल किंवा त्याच्या मैत्रिणीनं त्याला ते फ्रेंचमध्ये समजावून दिले असतील. त्याची उत्तरं ओघवती आहेत. मोकळेपणानं लिहिलेली आहेत. त्यात पूर्वपरिणत आत्माविष्कार आणि बुद्धिचातुर्य दिसून येतं. 'बुद्धिमत्ता', 'सहजता', 'सौंदर्य', 'आदर्शाची भूमी' यांसारखे शब्द येतात, पुनःपुन्हा येतात. या कसोटीला उतरतील अशीच उत्तरं साऱ्या प्रश्नांना देण्याइतपत तो सुजाण आहे. वानगीदेखील काही प्रश्नोत्तरं, संक्षेपानं.

तुमचं सर्वात सहजी ध्यानी येणारं स्वभाववैशिष्ट्य?

प्रेम केलं जावं ही आस, किंवा अधिक नेमकं, कौतुक केलं जाण्यापरिस कुरवाळलं जावं, लाडानं बिघडवलं जावं.

पुरुषांमधील तुम्हाला सर्वांत अधिक आवडणारा गुण?

स्त्रियांना साजेशी मोहकता.

स्त्रीमधील तुम्हाला सर्वाधिक आवडणारा गुण?

पुरुषांचे सद्‌गुण आणि मैत्रीमधील मोकळेपणा.

तुमचा मुख्य दोष कोणता?

नासमज, कमकुवत इच्छाशक्ती......

तुमचा आवडता उद्योग कोणता?

प्रेम करणं....

तुमच्या मित्रांमधील कोणती गोष्ट तुम्ही मोलाची मानता?

नाजूकपणा – मात्र हा नाजुकपणा शोभून दिसेल अशी शारीरिक मोहकता त्याच्यापाशी असावी.

असं काय आहे जे तुम्ही सर्वाधिक नापसंत करता?

माझे स्वत:चे वाईट गुण. . . . ज्यांच्यामध्ये चांगुलपणा नाही. आणि मायेचं सुख ज्यांना माहीत नाही अशी माणसं.

ललितकृतीमधील तुमचा आवडता नायक?

हॅम्लेट.....

तुमचा आवडता उद्योग?

वाचन, स्वप्नरंजन, काव्य, थिएटर.

तुमच्या दृष्टीनं आदर्श सुख?

मी ज्यांच्यावर प्रेम करतो त्या साऱ्या माणसांच्या निकट रहाणं, निसर्गाचं सौंदर्य, चिक्कार पुस्तकं आणि संगीत यांची संगत, आणि जवळपास एखादं फ्रेंच थिएटर.

या प्रश्नांची उत्तरं त्याच्या समकालिनां मित्रांनी एवढ्याच सफाईनं दिली असणार. यात भावी राजकारणी, सेनाधिकारी, सोसायटी यजमानीणी इत्यादी मंडळी होती. परंतु मार्सेलची 'ओरिजिनॅलिटी' आहे. त्याच्या इच्छाशक्तीमध्ये, जी चांगुलपणा आणि सौंदर्य याविषयीच्या त्यांच्या 'व्हिजन'चा पाठपुरावा करण्यास त्याला सहाय्यभूत ठरणार होती. पुढील आयुष्यात हे 'व्हिजन' कायम राहिलं, खोलवर रुजलं. जेव्हा त्याच्या इतर स्नेह्यांनी खातरजमा करून घेतली होती की शोध, पाठपुरावा महत्त्वाचा नसतो किंवा ते ज्याच्या शोधात होते ते त्यांना आयुष्यानं दिलेलं आहे. मार्सेलच्या ध्यानी यावयाचं होतं की अवकाश आणि काळ यात बंदिस्त असलेल्या जगात 'आदर्श' सापडणार नाही, आणि त्याचा शोध जारीनं अन्यत्र करावा लागेल, आणि या टप्प्यावर शोधाचं उद्दिष्ट बनलं असेल मुक्ती, सुख नव्हे. तथापि, त्याची सांस्कृतिक अभिरुची अपरिपक्व होती. त्याचे 'आवडते गद्य लेखक' अद्याप जॉर्ज सॅण्ड आणि ऑगस्टिन थिअरी Thierry हेच होते. या दोन्ही लेखकांची पुस्तकं त्याच्या आईनं ओतय्य आणि इल्लिअर येथं रात्री वाचून दाखवली होती. त्या रात्रीच्या आठवणींशी तो अद्याप प्रामाणिक राहिला होता. त्याचे आवडते कवी, चित्रकार, संगीतकार होते अनुक्रमे

आल्फ्रेड द म्यूसे, मइस्सोनिएर व मोझार्त.

१८८७ च्या पूर्वार्धात, मार्सेल पहिल्या प्रेमभंगातून सावरला होता. शाळेतून घरी परतताना वाटेत उगाचच इकडेतिकडे भटकणं, केकच्या दुकानात जाऊन केक खाणं व भोजनाचा विचका करणं, दाखानाशी तास्‌न तास वायफळ गप्पा मारणं यासारख्या त्याच्या वाईट सवयी सुटल्या होत्या. तो मन लावून अभ्यास करत होता. जुलैमध्ये इतिहास आणि भूगोल याविषयांसाठी दुसरं पारितोषिक त्याला मिळालं होतं, लॅटिनसाठी तिसरं,'सर्वसाधारण गुणवत्ते'साठी चौथं. त्याचा कच्चा विषय होता गणित. तो चौफेर वाचत होता, लूर्व्हला भेटी देत होत, बु द बुलोग्नमधून हिंडत होता. आपली प्रकृती ठीक राहावी म्हणून तिच्यावर प्रयोग करत होता.

प्रारंभीचं त्याचं शालेय जीवन सुखद नव्हतं. इतर मुलांबरोबर वागताना तो अवघडून जात होता. त्याला वाटत होतं, ती मुलं संवेदना शून्य आणि उर्मट आहेत. त्यांच्या जवळ जाणं मुष्किल आणि त्याहूनही मुष्किल त्यांना जाणून घेणं. त्यांची स्तुती करून, त्यांच्या सौंदर्यावर सुनीतं रचून वा शाश्वत निष्ठेचं वचन देऊन आपली सदीच्छा तो व्यक्त करायला जायचा, तेव्हा त्यांच्या प्रतिक्रिया त्याच्या बेचैनीला कारणीभूत होत होत्या. आणि मुलांनाही ते स्पष्टपणे सांगता येण्याजोगं नव्हतं. त्यांच्या दृष्टीनं तो अगदीच पोरीसारखा होता. फारच सुशील, फारच नाजूक, फारच भावनाशील आणि फारच लाघवी. दिसायचाही एखाद्या पोरीसारखाच उंचीनं कमी, दुबळा, अशक्तपणामुळे वाकलेले अरुंद खांदे आणि नाजूक देहावयव. तरंगल्यासारखा तो चालायचा आणि शाळेच्या मैदानात पोरांच्या घोळक्यात तो सामील व्हायचा तेव्हा एखाद्या देहहीन जीवागत त्याचा गूढ वावर असल्यागत भासायचं. आपलं मस्तक शामळूपणानं एका बाजूला झुकवायची त्याला विचित्र सवय होती. एव्हाना त्याच्या केसांचा रंग गडद झाला होता आणि त्याचे काळेभोर डोळे अधिक टपोरे बनले होते. ते किंचित खंतावलेले भासत. इतरांपेक्षा वेगळ्या प्रवृत्ती असलेला एक मुलगा असं त्याचं वर्णन एखाद्या वयस्कर माणसानं केलं असतं. शाळकरी मुलांना तो त्यांच्याहून काही बाबतीत वेगळा वाटत होता म्हणूनच आक्षेपही. आपल्याकडे इतरांनी लक्ष दिलं पाहिजे, आपलं कौतुक केलं पाहिजे असा त्याचा अट्टाहास असे. विशेषत: त्याला ते लाभत नसल्यास, इतरांकडे लक्ष दिलेलं त्याला खपत नसे, त्यांची भयंकर असूया वाटे. त्याच्याहून वयानं मोठ्या असलेल्या एका मुलानं 'माझ्या सर्वोत्तम मित्राला,"एक्स" वगळून' असं लिहून त्याला एक छायाचित्र भेट दिलं तेव्हा त्याला अतिशय दुःख झालं. दुसऱ्या क्रमांकाची पसंती त्याला मानवत नव्हती. त्या मुलानं "एक्स" वगळून 'हे शब्द खोडून टाकले तेव्हा कुठं त्याचं समाधान झालं.'

'लिसे काँदोसे' मध्ये ज्यांच्याशी त्याचा परिचय झाला,त्यापैकी बरेचसे गुणवान होते. पुढे त्यांनी नावलौकिकही मिळवला. जाक बिझे, दानिएल हालेव्ही आणि रॉबर्ट ड्रायफस हे







त्यापैकी त्याचे काही जिगरदोस्त. आयुष्यभरात तो केव्हा ना केव्हा तरी त्यांना भेटत होता.

आपल्या शाळूसोबत्यांशी त्याचं नेहमीच चांगलं जुळत नसलं तरी वयस्कर स्त्रियांच्या समाजात प्रूस्तला दिलासा लाभत होता. काहीशा स्मार्ट बाया त्याला एव्हाना पसंत पडू लागल्या होत्या. कौटुंबिक स्नेही आणि शाळूसोबत यांच्यामार्फत त्यांना भेटण्याची संधी तो वाया घालवत नसे : त्यांच्या सदीच्छा संपादन करण्यासाठी आणि त्यांच्याकडून आमंत्रणं मिळवण्यासाठी तो सतत प्रयत्नशील असायचा. त्याचं नशीब फळफळलं वा त्यानं चिकाटीच धरली तर त्याला उत्तम वाटत असलेल्या घरची निमंत्रणं त्याच्या हाती पडत असत. प्रिन्सेस द वाग्रॅम हिचं एखादं आमंत्रण तर ठरलेलं. त्याचे आईवडील त्याच्याशी चांगले वागले तर तर तो दिन सोनियाचा ठरायचा. त्याच्या यशाचं कौतुक त्यांना नव्हतं. कुठं जायचं असलं आणि त्यानं घरची बग्गी मागितली तर त्याला ती मिळत नसे, टॅक्सीसाठी पैसेही दिले जात नसत. मानखंडना झाल्यामुळं तो खिन्न व्हायचा. ओव्हरकोटची कॉलर वर केलेली, 'बटन होल'मध्ये बागेतील एखादं गुलाब खोवलेलं अशा थाटात एखाद्या दरिद्री नातलगागत घरासमोरून जाणाऱ्या बसमध्ये चढायचा, आव्हन्यू द लामावरील हॉटेलात जायचा.

सामाजिक जीवनाबाबत प्रूस्त वयाच्या मानानं प्रौढ होता. इतर मुलं खेळात दंग असत त्या वयात तो शिष्टमान्य होता. 'सेक्स'च्या बाबतीतही तो पूर्वपरिणत: होता. एकदा लॅटिन भागातील एका वेश्यागृहात तो गेला. त्याविषयी पुढं काहीशा अतिरंजितपणे त्यानं म्हटलं की, आपल्या नैतिक व्यक्तित्वाचा भाग सोबत्यांपाशी सोडून दिला होता. पोरी कटवण्याचे त्याचे प्रयत्न बेंगरुळ असत. तरीही तो आपले प्रयत्न जारी ठेवत असे. एकदा दानिएल हालेव्हीनं त्याला सगितलं की मॉमार्तमध्ये एक मस्त दुधवाली आहे. तत्क्षणी प्रूस्तनं आग्रह धरला, तिला भेटायचंच. दोघंही तिच्या 'डेअरी'वर गेले. दारासमोर उभे ठाकले आणि टकमक बघत राहिले. प्रूस्त पुटपुटला 'अती सुंदर. सालांबोएवढी देखणी.' नंतर, क्षणभर थांबून पुस्ती जोडली, 'तिच्याशी शय्यासोबती मी करू शकेन असं वाटतं का तुला?' हालेव्ही गडबडला. असला विचार त्याच्या डोक्यात डोकावलाही नव्हता. तेथून ते निघाले. त्यानं सोबत्याकडे पाहिलं. त्यानं हेरलं, गड्याच्या मनात तोच विचार चालू आहेत. येन केन प्रकारेण तिला वश करायचं. त्यानं प्रूस्तला सुचवलं की तिच्याकडे फुलं घेऊन आपण जायला हवं. त्यानंतर काही दिवस उलटले. ते पुन्हा त्या डेअरीपाशी गेले. गुलाबांचा एक गुच्छ घेऊन बाहेर वाट पाहात उभं राहात हालेव्हीनं पसंत केलं. प्रूस्त एकटाच पुढं सरसावला. डेअरीत शिरला आणि सालांबोएवढ्या देखण्या बाईसमोर उभा राहिला. पुष्पगुच्छ भेट दिला : ती हसली आणि तिनं मान डोलावली. त्यानं आग्रह केला की तिनं पुढं यावं. ती पाऊलभर पुढं सरकली आणि तो पाऊलभर मागं हटला. ती मुद्दामहून पावलं पुढं पुढं टाकू लागली आणि तो मागं मागं हटू लागला. होता होता तो दरवाजात आला. तिथून पुन्हा

रस्त्यावर. ती खिदखिदू लागली. तो आणि त्याचा मित्र नजरेआड झाले तरी ती खिदळतच राहिली.

दुधवालीला वश करण्याच्या प्रयत्नाचा फज्जा उडाला तरी आपली जिज्ञासा काही प्रमाणात तरी भागवणं प्रूस्तला साधत होतं. हटातटानं काही ख्यातनाम वारांगनांशी त्यानं परिचय करून घेतला होता. या बाया दिपवून टाकणाऱ्या, नको तितक्या सजलेल्या. 'आल्ले दे आकसिअस' आणि 'आव्हन्यू द बुआ' येथे दुपारच्या दिसणाऱ्या. त्या काळच्या त्या 'डार्लिंग' होत्या. नखशिखांत मढलेल्या. त्यांच्याविषयी बव्हंशी कौतुकाची भावना असे. मध्यमवर्ग वगळता त्यांच्याबद्दल अनादर व्यक्त केला जात नसे. याकी मादाम लोर हेमान Laure Hayman ही एक. बहुधा त्याचा परिचय झालेली ही पहिली. त्याच्या कुटुंबात ती जवळजवळ एक संस्थाच होती. एके काळी लुईमामाची ती रखेली होती. आणि सांप्रत त्याच्या आईवडलांशी तिचं बऱ्यापैकी सूत जमलेलं आहे अशी वदंता होती. प्रूस्तला तिचं कौतुक वाटे कारण त्याच्या लेखी ती स्मार्ट होती. शिवाय तिची करीयर त्याला रोमॅंटिक वाटत होती. कष्टाचं दिवस तिनं काढले होते. भेदभाव करून का होईना पण मिळालेल्या देणग्या ती मोठ्या प्रमाणात वाटत होती. ग्रीसचा राजा द्यु ड ओरले आँ यांसारख्या युरोप-मधील सर्वोत्तम पुरुषांशी तिनं शय्यासोबत केली होती. अजूनही 'रू ला पेरूझ'मधील तिच्या घरात अशी माणसं येत होती. त्यांच्याशी आपल्या तरुण चाहत्यांशी ती ओळख करून देत होती. तिच्याबद्दल वाटणाऱ्या आकर्षणात ही बाब त्याच्या लेखी महत्त्वाची होती. असं सांगतात की तिनं 'ग्लादी हार्वे' या नावानं पॉल बुरगेत यानं रेखाटलेल्या तिच्या एका व्यक्तिचित्रणाची प्रत तिच्या एका रेशमी पेटिकोटच्या बांधणीत त्याला पाठवून दिली होती. प्रूस्तनं त्यावर स्तुती भरला मजकूर लिहून लेखकाकडे धाडून दिला होता. परंतु ही स्तुती लागलीच ओळखदेख जुळवून आणण्यात अपेशी ठरली होती. लेखकानं पोच देण्याची कृपा केली एवढंच समाधान.

१८८७च्या ऑक्टोबरमध्ये तो 'ऱ्हेटॉरिक'च्या वर्षात दाखल झाला. बाक्कालोरआत (Baccalaureate) होण्याआधीचा दोन वर्षांचा हा कोर्स. पहिली सहामाही म्हणजे प्रूस्तच्या मते 'पेत्रोनियसमार्गे होमर ते आन्द्रेशेनिएर अशी एक वर्तुळाकार यात्रा.' शिक्षक होते एम्. डॉफिन, एम्. च्यूशेवाल, माक्झिम मॉरार. यातील पहिले होते विनम्र. दुसरे उर्मट, रोखठोक, ताठर जंगली. तथापि, तुमच्या तो अंगवळणी पडले की मग धास्ती नाही. ते मूर्खासारखे विनोद करायचे पण ते मूर्ख मात्र नव्हते. इतर 'मूर्खां'सारखा ते तास गुंडाळत नव्हते. आदर्श शिक्षकाचा ते उत्तम आदर्श होते. तिसरे होते साहित्य समीक्षक. 'ला रव्ह्यू'मध्ये त्यांचे टीकालेख प्रसिद्ध होत. त्यांची मोहक बुद्धि निकोप होती, प्रूस्तमधील असाधारण गुण प्रथम त्यांनी हेरले होते. दर आठवड्याला ते त्याचा निबंध मोठ्यानं वर्गात वाचून दाखवायला सांगत, त्यावर टीकाटिप्पणी करत. त्याला प्रोत्साहन देत. त्याचे निबंध एखाद्या शाळकरी

पोरानं लिहिले असतील असं वाटत नव्हतं. त्यातील विचार तर्कशुद्ध विचार आणि भाषा प्रौढ. शंभरएक शब्दांचं लांबलचक वाक्य. परिच्छेद पाडण्याची सवय त्याला नव्हती. एके दिवशी विद्यापिठातील एक इन्स्पेक्टर आले असता प्रूस्तला त्याचा नुकताच लिहिलेली निबंध वाचून दाखवण्यास मॉरारमास्तरांनी सांगितलं. प्रूस्तनं निबंध वाचला. इन्स्पेक्टरनं तो अथपासून इतीपर्यंत ऐकला आणि तो खवळला. मॉररना त्यानं विचारलं, "तुमच्या इथं असा एकही नाही जो याहून अधिक स्वच्छ अति बिनचूक फ्रेंच लिहू शकेल?" त्याला उत्तर मिळालं, 'सर, नियमपुस्तिकेसारखं फ्रेंच लिहायला माझ्या एकाही विद्यार्थ्याला शिकवलं गेलेलं नाही.' त्याच्या निबंधांचं स्वागत संमिश्र असे. काही जण दाद देत तर काहीजण हुर्रे उडवत– 'मॉरार नसते तर त्यांनी माझा चेंदामेंदा केला असता.' दुर्दैवानं १८८८ च्या उन्हाळ्यात मॉरार आजारी पडले, आणि २४ जुलैला त्यांचं निधन झालं.

जुलैमधील परीक्षेचा निकाल लागला. फ्रेंच निबंधासाठीचं पहिलं पारितोषिक, 'प्रमिअर प्रि द नूव्हो' प्रूस्तला मिळालं आणि लॅटिन आणि ग्रीक या विषयात तिसरं पारितोषिक मिळालं.

सप्टेंबरच्या प्रारंभी प्रूस्त ओतय्यमध्ये मागं राहिला आणि त्याची आई रॉबर्टला घेऊन साली-द-बेराला निघून गेली. निरोप घेतेसमयी तो अतिशय भावविवश झाला आणि ते गेल्यानंतर बराच वेळ हमसून हमसून रडत राहिला. लुईमामा म्हणाला की त्याचा शोक म्हणजे 'निव्वळ अहंमन्यता.' 'या किरकोळ मानसशास्त्रीय शोधानं अभिमान आणि आत्म–संतुष्टता यांनी तो एवढा बेहद्द खूष झाला होता की त्यानं मला कठोर प्रवचन सुनावलं होतं.' आजोबा म्हणाले, 'मूर्ख मुलगा.' आजीनं हसत मुंडी हलवली आणि म्हणाली, 'तुझ्या आईवर खरोखरीच प्रेम करतोस हे सिद्ध करण्यासाठी याहून अधिक असं काहीतरी हवं !' परंतु तिसऱ्या दिवशी सकाळी तो बु द बुलोग्नला गेला आणि आनंदानं मोठ्यानं हसला; सूर्य वर सरकला होता. हवा अद्याप गार होती. श्वास घेताना, चालताना तो एवढा सुखावला होता की तसं सौख्य त्यानं यापूर्वी कधीही अनुभवलेलं नव्हतं. छोट्या तलावाच्या काठावरील कुरणात तो बसला आणि 'ल मारीआज द लोटी' वाचू लागला, पाण्यावरील जांभळी छाया न्याहाळीत राहिला. हळूहळू तलावावर पानांवर उन्हं चमकू लागली. दुपारच्या जेवणाच्या वेळी तो शहाण्यासारखा वागला.

प्रूस्तनं आईला लिहिलं की त्याला एक 'छोटी मैत्रीण' भेटली असून तिच्या अनु–पस्थितीत ती त्याचं सांत्वन करील. या सप्टेंबरमध्ये एका सुरेख व्हिएन्नी छोकरीत त्याचा जीव गुंतला होता. पेरी नृत्यशाळेत ती त्याला भेटली होती. ती नृत्यशाळा त्याच्या शाळेपासून फार लांब नव्हती. रॉबर्ट ड्रायफसला त्यानं लिहिलेल्या पत्रात प्रकट झालेली व्यर्थता नि:संशयपणे गृहित धरण्यात आलेली होती, त्यामधून गाढ भावना वा मौजमजा सूचित होत नव्हती : एका अत्यंत सीधासाध्या प्रकरणात मी गुंतलो होतो. अत्यंत कंटाळवाण्यापद्धतीनं ते संपुष्टात आलं, अगदी अटळपणानं यातून जन्माला आला आहे वेधक संबंध. धास्ती

आहे, हा निदान वर्षभर तरी टिकेल. अशा व्यक्तींना जिथं नेलं जात त्या कॅफेंची, ठिकाणांची बरकत.' याच पत्रात उल्लेखिलेल्या 'एका नामवंत वारांगनेबद्दलची भावना' मात्र थोडीफार गाढ होती. तिचं नाव होतं, लेऑनी क्लोस्मेनिल. बुआमधील आव्हन्यू द आकासिआवरून दर दुपारी ती जायची आणि प्रूस्त तिला डोळे भरून पाहायचा. रेंगाळल्यागत पावलं टाकण्याची तिची लकब. रस्त्यावरची खडी झाडत जाणारा तिचा लांबलचक स्कर्ट. भाळावर एक पांढऱ्या केसाची बट. हेतुपुरस्सर शुभ्र केलेली. खाटकीण म्हणून ती ओळखली जात होती. कारण तिचा पहिला यार होता खाटिक. निखळ कलात्मक पातळीवर तो तिचं विश्लेषण करण्याचा प्रयत्न करत होता : (यात वारांगना आणि माता यांच्यामधील फ्रॉईडवादी साधर्म्य ध्यानी यावं) तिची मान आणि खांदे यांच्या गोलाकार रेखा होत्या. एखाद्या एथ्रुस्कन फुलदाणीसारख्या, तिच्या ओठाचा कोपरा होता लुनिनी किंवा बोत्तिसेल्ली यांच्या 'व्हर्जिन'सारखा. तिच्या पोषाखाच्या गुलाबी रंग सायंकाळी सहाच्या सुमाराच्या बुआवरील सप्टेंबरमधल्या आकाशाहून अधिक मनोहारी होता आणि तिच्या हॅटवरील निळा रंग त्याला गहिऱ्या आणि निश्चल पाण्याचं स्मरण करून देत होता. त्यानं तिला पत्र पाठवलं, कळवलं तिचं त्याला कौतुक आहे. आणि तिनं त्याला उत्तर दिलं; नंतर त्यानं एक छायाचित्र पाठवलं,आणि तिनं स्वत:ची बरीचशी पाठवली. आयुष्याच्या अखेरपर्यंत त्यानं ती जतन करून ठेवली होती. पुढं ऑडेट्ट म्हणून त्याच्या कादंबरीत ती अवतीर्ण झाली. तिचं वर्णन करताना स्वान तिची तुलना बोत्तिसेलीच चित्राशी करतो. प्रूस्तनं एका मित्रापाशी उघड केलं होतं की ऑडेट्ट तिचा पायघोळ जांभळा स्कर्ट परिधान करून रस्त्यावरून जात असताना एका सद्गृहस्थाच्या नजरेला ती पडते, तेव्हा तो आपल्या मित्राला म्हणतो, 'मॅकमॅहोननं राजीनामा दिला होता त्या दिवशी मी तिच्याशी शय्यासोबत केली होती', ती आहे लेऑनी क्लोस्मेनिल.

कुटुंबापासून स्वत:ची सुटका करून घेण्याची त्याची एव्हाना धडपड चालू होती. परंतु त्याच्या हृदयाच्या तळाशी जखडण्यात आलेलं बंधन नेहमीच त्याला खेचून मूळ पदावर घेऊन येत होतं. त्याची आईसोबत असती तर सुरेख छोकरी आणि देखणी वारांगना यांच्या नादाला लागण्याची इच्छा त्याला झाली नसती किंवा त्याला तसा धीरही झाला नसता. परंतु त्याच्या धाकट्या भावाला घेऊन ती दूर सुट्टीवर गेली होती. बहुधा याच महिन्यात 'नॉर्मल' प्रेमाच्या निषिद्ध प्रदेशात साहस करण्यास तो प्रवृत्त झाला होता आणि भ्रमनिरास होऊन माघारी वळला होता. एका शाळूसोबत्यानं त्यानं वेश्यागृहात जावं म्हणून त्याचं मन वळवलं. त्याच्या कादंबरीत त्यानं हा प्रसंग घातला आहे. Bloch ब्लोश निवेदकाला माहिती पुरवल्यागत सांगतो की देहसंगाहून स्त्रियांची अधिक काही मागणी नसते. त्याच्या उद्गाराचा त्याला अचंबा वाटतो. निवेदकाला घेऊन तो कुंटणखान्यात जातो. परंतु इथला अनुभव भयानक असतो; मालकिणीचा चेहरा एखाद्या खुनशी बाईसारखा असतो. नंतर आपल्या

मित्रांना तो सांगतो, 'मला वाटलं जणू काही माझ्या नैतिक व्यक्तित्वाचा भाग मी माझ्यामागं सोडून आलो.' त्याचं हे विधान त्यांना भयंकरच 'ॲब्सर्ड' वाटतं.

१८८८च्या ऑक्टोबरमध्ये मारी- आल्फोन्स दार्ल यांच्या हाताखाली प्रूस्तचं तत्वज्ञानाचं वर्ष सुरू झालं. 'ले प्लेझिर ए ले जूर'च्या प्रस्तावनेत त्यानं या गुरुबद्दल म्हटलं आहे : 'एक थोर तत्त्वज्ञ, ज्याचे उत्स्फूर्त शब्द असंख्य ग्रंथानंतरही टिकून राहतील. त्यांनी माझ्यामध्ये आणि अशा अनेकांमध्ये विचार जन्माला घातला होता.' विषय समजावून देण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती. डोक्यावरची हॅट ते समोरच्या डेस्कावर ठेवत आणि ते विशद करत असलेल्या कुठल्याही गूढ सिद्धांताचं मूर्त उदाहरण म्हणून तिचा वापर करत. 'एखाद्या जादूगाराप्रमाणे संपूर्ण तत्त्वज्ञान ते त्या हॅटमधून बाहेर काढत. लईब्नीटझ Leibnitz च्या सिद्धांताचं त्याचं स्पष्टीकरण प्रूस्त नेहमी आठवणीनं सांगत असे', समजा माझी हॅट हा एक पूर्णेक आहे', मोनॅड' आहे; ठीक, मी माझा हातरुमाल हॅटमध्ये टाकतो. . .' परंतु हातरुमाल कशाचं प्रतिनिधित्व करतो हे मात्र ते विद्यार्थ्यांना सांगत नसत. ते धक्कातंत्राचा अवलंब करत, उपरोधिक शैलीचा वापर करत, जेणेकरून त्यांचे विद्यार्थी स्वतःहून विचार करण्यास प्रवृत्त व्हावेत. ते केवळ पोपटपंची करणारे होऊ नयेत यावर त्यांचा कटाक्ष असे. त्यांच्या विघातक आणि विधायक टीका पद्धतीचा लाभ प्रूस्तला झाला. त्याच्या निबंधांमधील असंबंद्धता आणि विक्षिप्रता याविषयी नाराजी व्यक्त केली नाही तर उच्छिष्टत्व आणि स्वैर रूपकं वापरण्याच्या त्याच्या प्रवृत्तीवर त्यानं बोट ठेवलं- 'मासिकं आणि परीक्षणं यामधून या साऱ्या घाणेरड्या सवयी तू उचलल्या आहेस.' हे लिखाण म्हणजे आडगावच्या एखाद्या वृत्तपत्रात शोभूत जाण्याजोगं. कारण एखादा लेखक जेव्हा चकित करण्याचा प्रयत्न करतो. तेव्हा तो केवळ एक पिष्ठोक्ती उच्चारण्याचा संभव असतो. एखाद्या वैश्विक सत्याचा जेव्हा तो कष्टानं शोध घेतो तेव्हाच तो अगदी 'ओरिजिनल' लेखक होऊ शकतो आणि या सत्याला व्यापक वैश्विकता जेव्हा लाभेल ते अत्यंत व्यक्तिगत असेल. प्रूस्तवरील त्यांचा प्रभाव निर्णायक ठरला. हा प्रभाव 'आ ला रशार्श द्युताँ पेर्दू' मध्ये आढळून येतो. त्यानं रेखाटलेल्य बेरगोटच्या व्यक्तिमत्त्वाच्या चित्रणामध्येच केवळ नव्हे तर कादंबरीच्या प्रत्यक्ष गाभ्यामध्येही. वैज्ञानिक शोधाचं महत्त्व किंवा 'ऐन्द्रिय जगाची अवास्तवता' यासारखे गुरुचे परस्परविरोधी सिद्धांत अंगीकारण्यापुरताच हा प्रभाव सीमित नव्हता तर प्रूस्त त्याही पलीकडे पोहाचला होता. काव्यात्मता किंवा नैतिकता, श्रेष्ठ कलाकृतीला पुरेशा नाहीत, ती 'मेटॅफिजिकल' अतिभौतिकही असायला हवी, भौतिकतेच्या ती पुढं जाणारी हवी, हे तो शिकला; आणि 'आ ला रशार्श'चा विषयच मुळी आहे, अव्वल 'मेटॅफिजिकल' अतिभौतिक सत्याचा साक्षात्कार. संदिग्ध संवेदनांचं अप्रूप त्याला उरलं नव्हतं, तर त्यांचा अर्थ शोधणं आणि तो व्यक्त करणं हे त्यानं आपलं कर्तव्य मानलं होतं. मार्टिनव्हिलेच्या सुळक्यासारख्या कळसामध्ये किंवा 'मॅडेलिन'सारख्या पदार्थांच्या चवीमध्ये निवेदकाला गूढ आनंद होतो पण

त्यावरच समाधान मानणं त्याला नामंजूर असतं, आणि म्हणूनच त्यांचं गुह्य आत्मसात होईस्तोवर तो हट्टाला पेटल्यागत प्रश्नांची उकल निष्ठेनं करतं राहतो, याचं श्रेय दार्लूंच्या शिकवणीला द्यायला पाहिजे. हे गुण त्यांच्या या विद्यार्थ्यामध्ये होते, सुप्तावस्थेत होते, मुक्त होण्याची वाट पाहात होते; गुरुनं त्यांना वाट खुली करून, दिली होती. पण त्यांचा सूर विनम्र होता : 'हा सारा सल्ला देण्यासाठी मी इथं नाही आहे, माझं काम आहे तुम्हाला तत्त्वज्ञान शिकवण्याचं.'

दरम्यानच्या काळात काँदोसेच्या विद्यार्थ्यांनी हस्तलिखित मासिकं काढायला सुरुवात केली होती. संपादक : ईनिएल हालेव्ही आणि जाक बिझे. अधूनमधून प्रूस्तचं नावही संपादक मंडळात झळकत असे. पहिलं मासिक लुन्दी LUNDI सोमवार – 'एक कलात्मक आणि साहित्यिक रिव्ह्यू'– १८८७ मध्ये निघालं. त्यानंतरचं 'रव्ह्यू द सेकॉन्द' १८८८ मध्ये निघालं. मार्चपर्यंत तेरा अंक निघाले आणि ते बंद पडलं. त्याच्या राखेतू जन्माला आलं 'रव्ह्यू व्हेर्त.' सेक्रेटरी या नात्यानं प्रूस्तनं हालेव्ही आणि बिझे या संपादकद्वयांच्या विनंतीला घेतलेला आक्षेप तेवढा आज उपलब्ध आहे. पुढील पिढीसाठी काही विवक्षित लेखांच्या नकला करण्याची परवानगी संपादकांनी मागितली होती. त्यांच्या या मागणीत विरोध करताना प्रूस्तनं लिहिलं की 'तथाकथित सार्वजनिक वृत्तपत्रा'प्रमाणं 'रव्ह्यू व्हेर्त' आर्थिक लाभासाठी प्रकाशित केलं जात नाही वा त्याच्या बऱ्याच प्रती निघाव्यात अशीही अपेक्षा नाही (यात अतिशयोक्ती नव्हती, कारण एकच प्रत निघत होती, तीही विनामूल्य), ते प्रकाशित केलं जातं ते 'अत्यंत मर्यादित आणि निवडक ग्रुपच्या रंजनासाठी.' आत्मरत कल्पनाशक्तीची ही मुक्त चिंतनं वाचकांच्या टीकेपासून वाचवायला हवीत, ती त्यांच्यासाठी लिहिली गेलेली नाहीत. आपलं म्हणणं मान्य नसल्यास सेक्रेटरीच्या जबाबदारीमधून मोकळं होण्याची इच्छा त्यानं व्यक्त केली होती. १८९० मध्ये मासिक बंद पडलं होतं. या छोट्या हस्तलिखित मासिकांमधलं शेवटलं आणि महत्त्वाचं मासिक 'ला रव्ह्यू लिला.' यात मार्टिनव्हिलेच्या कळसावरील प्रूस्तचा निबंध आला होता असं सांगितलं जातं. परंतु यातील त्याचं एक स्फुट लिखाण उपलब्ध आहे. ते अर्पण केलेलं आहे : 'माझा प्रिय मित्र जाक बिझे यास', शिरोभागी लिहिलं होतं 'रव्ह्यू लिला'साठी, प्रसिद्धीनंतर नष्ट करून टाकणं.' यात वयाच्या पंधराव्या वर्षी आपल्या बेडरुममध्ये असल्याचं कल्पनाचित्र तो रंगवतो. 'नित्याच्या गोष्टींची भेसूरता', दिव्याचा क्षीण उजेड, शेजारच्या खोलीतील काच सामानांचे आवाज, चंद्रप्रकाश

आणि तारे यांच्या प्रकाशरेखांनी डागळलेलं गडद जांभळं आकाश, यांनी तो दडपला गेला होता. नंतर तो आहे सतरा वर्षांचा. काल:वर्तमान. सारं काही पालटून गेलेलं : 'चेस्टनट वृक्षांमधून ओघळणाऱ्या निळ्या चंद्रकिरणांनी', आणि 'समस्त निद्रिस्त वस्तूंच्या टवटवीत, बोचऱ्या श्वासोच्छ्वासांनी' त्याच्या खिडकीखालील बुलव्हार्द मालशेर्बचं परिवर्तन घडून आलं आहे. कॉम्ब्रेच्या चंद्रप्रकाशित बागेएवढंच हे रात्रीचं दृश्य मनोहारी बनतं आणि 'नित्याच्या

गोष्टी' भेसूर भासेनाश्या होतात. 'मी त्यांना पुनीत केलं आणि निसर्गालाही, कारण मला त्यांच्यावर विजय मिळवता येईना. माझ्या आत्म्याची, प्रतिकांच्या अंतस्थ ऐश्वर्याची वस्त्रं मी त्यांच्यावर चढवली. एका भपकेदार सोहळ्यानं वेढलेल्या एका पवित्रस्थळी मी रहात आहे. सर्व गोष्टींच्या केंद्रस्थानी मी आहे आणि त्यातील प्रत्येक गोष्ट माझ्या खुशीखातीर आणतात. संवेदना आणि भावना, ज्या असतात अतिशय सुंदर किंवा उदास. माझ्या दृष्टीसमोर आहे एक वैभवशाली "व्हिजन".' हे स्फुट लिखाण प्रूस्तच्या प्रमुख विषयांपैकी एका विषयाला स्पर्श करते : इट इज ऑलरेडी 'टाइम रीगेन्ड' इन मिनिएचर.

तथापि, त्याचं लिखाण त्याला जेवढं समाधान देत होतं तेवढं त्याच्या शाळूसोबत्यांच्या मैत्रीमधून मिळत नव्हतं. त्याच्या निधनानंतर बऱ्याच वर्षांनी डॅनिएल हालेव्हीनं शालेय जीवनासंबंधीच्या आठवणी लिहिताना म्हटलं आहे : 'त्याच्यापाशी असं काहीतरी होतं जे आम्हाला आवडायचं नाही. त्याचा कनवाळूपणा आणि त्याचं हळूवार वागणं निव्वळ लकबी ढोंग वाटायचं, आणि संधी मिळताच आम्ही त्याला तसं त्याच्या तोंडावर सांगत होतो. बिचारा, दुःखी पोरगा, आम्ही त्याच्याशी निष्ठूरपणे वागलो होतो.' 'आँ सान्तेय'मध्ये एक छोटासा प्रसंग आहे. ज्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल नायकाला कौतुक आहे असे तीन मुलगे खेळाच्या मैदानावर त्याला धक्काबुक्की करतात आणि तो त्यांना 'एवढी सुंदर, सटळ आणि रसाळ पत्र लिहितो की ते लिहित असताना त्याच्या डोळ्यात अश्रू उभे राहतात' पण ते त्यावरून त्यांची खिल्ली उडवतात. आँच्या ध्यानी येत नाही की सहानुभूतीसाठीचा त्याचा सोस, त्याची विकारी आणि अति-सुसंस्कृत संवेदनशीलता, जी साध्या प्रेमळ कृतीनंही जिव्हाळ्याचा बांध फोडते, तिची ढोंग म्हणून संभावना व्हावी आणि या तरुण मंडळींना त्यामुळे धक्का बसावा आणि चिडचिड करावं ! तारुण्याच्या निष्ठूरतेनं त्याच्या थंड्या वृत्तीच्या बेपर्वाईला खतपाणी घातलेलं होतं.' वस्तुस्थिती अशी होती : त्याच्या आईशी त्याचे जे संबंध होतं, नातं होतं, तसेच संबंध, तसंच नातं त्याच्या शाळूसोबत्यांशी असावं ही त्याची अपेक्षा होती, गरज होती. ती पुरी झाली असती तर त्याला समाधान वाटलं असतं. पण ते अशक्य होतं. एकदा एका मुलाचा हात त्यानं अनिवार उर्मीनं गच्च दाबून धरला होता. तेव्हा तो दचकून दूर सरकला होता. हालेव्ही त्याच्यापासून चार हात लांबच राहात होता. बिझेचं वागणंही अंतर राहवूनच. 'माझा तो मित्र आहे असं तो का म्हणतो आणि नंतर माझ्याकडे पूर्णपणे दुलक्ष करतो? त्यांना काय पाहिजे? – त्यांना मला टाळायचंय, मला चिडवायचंय, कोड्यात टाकायचंय, की आणखीन काही? आणि मला वाटत होतं की ते किती चांगले आहेत !'.

बाळपण आणि शाळा यांच्या छोट्या आणि कृत्रिम जगात प्रेम आणि मैत्री न लाभल्यानं तो निरोश झाला होता; परंतु त्याबाहेर अफाट, खरंखुरं जग होतं, ज्यात लवकरच तो पाऊल टाकणार होता, तिथं कदाचित प्रेम आणि मैत्री अफाट आणि खरीखुरी असू शकेल.

मानवी नातेसंबंधाचं तिसरं आणि अंतिम मृगजळ त्याच्या दृष्टीपथात येऊ लागलं होतं. त्याला वाटत होतं, उच्च वर्गीयांच्या राज्यात ते नातेसंबंध एक कलाकृती म्हणून विचारात घेता येतील आणि त्यातून मजाही लुटता येईल. १८८८च्या शरदामध्ये त्यानं 'गॅर्मातमार्गा'च्या दिशेनं चाचपडत पहिलंवहिलं पाऊल टाकलं.

डॉ. प्रूस्त यांच्या अशा उच्च 'सोसायटी'मध्ये बऱ्यापैकी ओळखी होत्या. त्यांच्यामार्फत, त्याची इच्छा असती तर, तिथं तो प्रवेश मिळवू शकला असता. परंतु हा मार्ग बराच वेळ-खाऊ होता. शिवाय लाजिरवाणा आणि डागळणारादेखील. पॅरीसमधील उच्चभ्रू सोसायटी कधीच विशिष्ट वर्गापुरती मर्यादित नव्हती. राजकीय, वैज्ञानिक वा साहित्यिक ख्यात बुद्धिमत्ता आणि आकर्षक व्यक्तिमत्त्व, या गोष्टी सॅलाँसाठी भक्कम पासपोर्ट होते आणि गुणवंतासाठी सोसायटी ही एक खुली 'करीयर' होती. परंतु प्रूस्तला ही सोसायटी प्रत्यक्षात होती त्याहून अधिक 'एक्सक्लूझिव्ह', वेचक अशी असायला हवी होती. तिचं ग्लॅमर वृद्धिंगत करण्यासाठी आणि तिथं प्रवेश केल्यानं स्वत:चा गुणवत्ता वाढवण्यासाठी. म्हणून त्याची इच्छा होती, तिथं आकस्मिकरित्या प्रवेश करायचा, अद्भुतरम्य वाटेल अशा थाटात, आणि तत्काळ तिथं मान्यता मिळवायची. त्याच्या कादंबरीच्या निवेदकाप्रमाणंच प्रत्यक्षात प्रूस्तच्या दुसऱ्या इच्छेची पूर्ती झाली होती. परंतु लवकरच त्याला शोध लागावयाचा होता की या आयुष्यात आपल्या साऱ्या इच्छा फलद्रूप होतात, एका अटीवर, त्यांच्यापासून अपेक्षित असलेलं सुख त्या आणत नाहीत.

प्रूस्तच्या मनाजोगतं घडून आलं. उच्चभ्रू 'सोसायटी'मध्ये त्याचा शिरकाव झाला. ही वार्ता त्याच्या शाळूसोबत्यांच्या कानी आली. त्याचा संचार पंडितसभेत असतो, ड्यूकांच्या तो पक्षपाती आहे या गोष्टी त्यांना रुचल्या नाहीत. त्यांच्या मते 'रव्ह्यू लिला'च्या उच्च आदर्शांशी त्यानं गद्दारी केली होती. ते त्याच्या तोंडावर त्याची खिल्ली उडवू लागले. त्याच्या भावना ते दुखवू शकले, पण त्या बदलू शकले नाहीत किंवा ज्या शक्तीनं त्याला 'गॅर्मात मार्गा'प्रत नेलं त्यात शिष्टपणा वा भंपकपणा नाही तर प्रतिभावंताचं लक्षण आहे हा त्याचा समज दूर करू शकले नाहीत. प्रूस्त हा एक 'सोसायटी'– लेखक आणि एक शिष्टमन्य आहे हा प्रवाद रुजला गेला आणि तीस वर्षांनंतर त्याच्या आयुष्याच्या अखेरच्या तीन वर्षांत त्याच्या श्रेष्ठत्वाचा प्रत्यय आल्यानंतर हा प्रवाद नष्ट होणार होता. एवम् शाळेतील त्यांच्या अखेरच्या वर्षाची सांगता असंतुष्ट आणि कुप्रसिद्धी यांच्यात झाली. आनंदाची बाब एवढीच, शाळेच्या अंतिम परीक्षेत त्यानं फ्रेंच निबंधासाठी 'ले प्रि हॉनर द दिस्सरताशियां' फ्रान्सेज (Francaise) हेमानाचं पारितोषिक पटकावलं होतं. आता सुंदर सुंदर गळपट्टे निवडायला त्यानं सुरुवात केली होती. आता तो शाळकरी राहिला नव्हता, अठरा वर्षांचा मिशीवाला बाप्या बनला होता. साहित्याची जाण आतापासून समृद्ध होऊ लागणार होती.





साहित्य क्षेत्रात पदार्पण करायचं हे प्रूस्तनं मनाशी पक्कं केलं होतं. पण इथं एक मेख होती. आपल्या मध्यमवर्गीय व्यवहारी आईवडीलांचं समाधान करणं भाग होतं आणि त्यासाठी एखादी नोकरी करणं आवश्यक होतं. त्याला त्याची ना अर्थातच नव्हती. त्यानं ठरवलं की, जी नोकरी त्याच्या लेखनात गंभीरपणे व्यत्यय आणणार नाही, डोक्याला फारसा ताप देणार नाही अशीच नोकरी पत्करायची आणि त्याच्या जोडीनं शिक्षण चालू ठेवायचं. तथापि, सांप्रत, त्याला लष्कराचं समाधान करणं प्राप्त होतं. लष्करी सेवा फ्रेंचाना सक्तीची होती. १८७२ पासून या सेवेची कालमर्यादा पाच वर्षाची करण्यात आली होती आणि व्हालंटिअरांसाठी एक वर्षाची. प्रत्यक्षात, पाच वर्षांचा आग्रह धरला जात नसे, कारण त्यासाठीचा आर्थिक बोजा राष्ट्राला परवडण्याजोगा नव्हता, शिवाय मनुष्यबळावरही ताण पडत होता. तथापि, एक वर्षाचीच सेवा करण्याची तरतूद होती. अर्थात् श्रीमंत पालकांनाच हे शक्य असे. आपल्या पाल्याचा गणवेष आणि राहाणीखर्च वगैरे यासाठी त्यांना १,५०० फ्रँक्स मोजावे लागत शिवाय लष्करानं घातलेली शिक्षणाची अटही विचारात घेतलेली जाई.

१५ नोव्हेंबर १८८९ रोजी प्रूस्त ओरल आँ येथील ७६व्या पायदळाच्या तुकडीत दाखल झाला. दर्जा : व्हॉलंटिअर. खानदानी तरुण आणि उच्च वर्गीय बुर्झ्वांची मुलं यांना लष्करी अधिकाऱ्यांकडून चांगली वागणूक दिली जात असे. प्रूस्तलाही खास सवलती मिळत होत्या. सुदैवानं त्याचा वरिष्ठ डॉ. प्रूस्त यांच्या ओळखीचा होता. व्हॉलंटिअरांना गावात राहाण्यासाठी जागा घेण्यास सक्त मनाई होती, परंतु प्रत्यक्षात खाजगी खोली ते भांड्यानं घेत असत. प्रूस्तनंही अशी जागा घेतलेली होती. लष्करी जीवनात तो खूष होता. पंधरा वर्षानंतर एका मित्राला पाठवलेल्या पत्रात त्यानं लिहिलं होतं, 'आश्चर्य आहे, तू समजतोस लष्कर हा एक तुरुंग आहे आणि मी एक 'नंदनवन.' तो पोहत होता, घोड्यावरून रपेट करता होता, कवाईतीत भाग घेत होता. संपूर्ण वर्ष आपण नॉर्मल आहोत, आपल्याला सहकाऱ्यांकडून स्वीकारण्यात आलेलं आहे हा सुखद अनुभव तो घेत होता. इथलं गावरान वातावरण आल्हांददायी होतं. 'ले प्लेझिर ए ले जूर'मध्ये तो लिहितो, 'तत्पूर्वी वा तदनंतर मी ओळखत असलेल्या तरुणांहून माझ्या काही सीध्यासाध्या शेतकरी-मित्रांचे देह अधिक सुंदर आणि चपल होते, त्यांची मनं अधिक ओरिजिनल होती, व्यक्तिमत्त्वं अधिक नैसर्गिक होती. अन्य कुठंही आढळणार नाही अशा इथल्या शांत जीवनात व्यवसाय अधिक नियमित असतात आणि कल्पनाशक्ती जखडून टाकलेली नसते. इथं सुख सतत आजच्या सोबत असतं.' त्याच्या आयुष्यातील हा काळ म्हणजे सुखद आणि मोहक अशा छोट्या छोट्या चित्रांची एक मालिका होती.

दरम्यान त्याच्या आईकडून त्याला पत्रं येत होती. तो आईला पत्रं लिहित होता. दोघांचाही हा पत्रव्यवहार रोजचा. आईची पत्र घराकडील 'गॉसिप'नं भरलेली असत. २ जानेवारी

१८९० रोजी त्याची नानी-आईची आई वारली. १९ मार्च १८९० रोजी त्याच्या वडलांची आई मृत्यू पावली होती. त्यानंतरचा हा आघात. हा आघात विशेषत्वानं जाणवला कारण त्याच्या आईच्या दु:खाची पुरेपूर कल्पना होती. तिचं सांत्वन कसं करायचं, तिची खिन्नता कशी दूर करायची त्याला कळत नव्हतं, कारण आई दु:खी असल्यामुळे तोही दु:खी होता; आसवं ढाळत होता, आणि त्याला धीर देण्याची पाळी मादाम प्रूस्तवर आली होती. आपल्या लाडक्या आईच्या स्मरणार्थ ती 'सो दॉम ए गॉमॉर' मधल्या निवेदकाच्या आईप्रमाणं मादाम द सेव्हिग्न वाचत होती. त्यातील सुयोग्य उतारे मुलाच्या पत्रात उद्धृत करत होती, ओतय्य येथील फुलांच्या बहरांचे वृत्त देत होती, हद्दपारीचे फार महिने राहिले नाहीत म्हणून दिलासा देत होती. लिहिलं होतं,'आणखीन एक आई मी ओळखते, तिला स्वत:ची काळजी नाही, तिचं अवघं जीवन आहे ते आपल्या मुलांकरता. तुझ्या अगदी आजीसारखं आहे नाही हे? तिनं त्याचा उच्चार केला नसता एवढंच.' पाठीवरून हात फिरवल्यागत उपदेश केला होता, 'तिचा विचार कर, जरूर कर, आणि मी करते तशीच तिच्या स्मृतीची निगराणी कर, पण त्यात वाहात जाऊ नकोस, आणि आसवं ढाळात दिवस काढू नकोस, कारण तुझ्या विकल नसांना ते हानीकारक आहे, आणि तिला ते आवडलं नसतं. नाही, तिचा तू अधिकाधिक विचार करशील तेवढी अधिकाधिक जबाबदारी वाढेल, तू कोण बनलास तर तिला आवडलं असतं, तसं बनणं, तू कसं वागावंस असं तिला वाटतं असतं तसं वागणं, हे तुझं कर्तव्य आहे.' परंतु 'ल कोते द् गर्मांत' मधील आजीच्या अखेरच्या दिवसांचे चित्रण करण्यात आलं आहे ते मादाम प्रूस्तच्या अखेरच्या आजाराच्या आधारे.

जवळजवळ प्रत्येक वीक-एन्डला तो पॅरीसला येत असे, घरच्या मंडळींना भेटत असे. ऑरला आँ ते पॅरीस दोन तासांचा ट्रेनचा प्रवास. अशाच एका प्रारंभीच्या भेटीत मादम आरमाँच्या सॅलाँमध्ये त्यानं पाऊल टाकलं होतं. तिथंच तिचा मुलगा गास्ताँ याची जान–पहेचान झाली होती. घनिष्ट मैत्रीही पट्कन जुळून आली होती. शक्य होईल तेव्हा मादाम आरमाँच्या सॅलाँमध्ये तो दर रविवारी हजेरी लावत होता. अंगावर गबाळा गणवेश, लष्करी रूबाबीचा अभाव, चेहरा शिणलेला, आठवड्याभराच्या श्रमानं देह थकलेला. मादम आरमाँच्या दिवाणखान्यातील एखाद्या उत्कृष्ट आरामखुर्चीवर नीट न बसता आरामात कलत होता. एका हातानं तो आपल्या माथ्याला आधार देत असे तर दुसऱ्यानं फुटलेल्या मिशीला पीळ भरत असे. खिन्न नजर मात्र खोलीभर भिरभिरायची. त्यांच्या नजरेतून काही निसटत नसे. त्याचं संभाषण सदैव रंगतदार असे. खदखदून हसायला त्याला क्षुल्लक निमित्तही पुरेसं होत असे. त्याचं विमनस्क हास्य संसर्गजन्य असायचं. हसताना त्याचा फिकुटलेल्या चेहरा त्याच्या पांढऱ्याशुभ्र दंतपंक्तीनं उजळला जायचा. सहा वाजता यजमानीण त्याला भरपूर केक आणि सँडविच देई, तिथं खाण्यासाठी आणि घेऊन जाण्यासाठी. रेल्वे स्टेशनवर पोहोचवण्यासाठी

गास्ताँ जायचा.

मादम आरमाँच्या घरी गास्ताँची वाग्दत्त वधू जांत्र पूक्ये हिची ओळख झाली आणि प्रूस्त तिच्या देखण्या रूपावर पाघळला. तिच्या लावण्याची त्यानं भरभरून स्तुती केली. ती लाजली, घाबरली आणि तडक बाहेर जाण्यासाठी वळली. प्रूस्तनं विचारलं,'तुझा सुंदर केशकलाप माझ्या नजरेला पडणार नाही अशी भीती तुला वाटल्यामुळं तू माझ्याकडे पाठ वळवलीयस की काय? त्याच्या वागण्याची तक्रार तिनं गास्ताँपाशी केली. पण त्यानं तिची समजूत काढली म्हणाला,'अग तो मस्त माणूस आहे. तुला सांगण्याआधीच तो माझ्यापाशी बोलला होता की तू सुंदर आहेस.' पण लवकरच जांत्रप्रमाणंच गास्ताँही प्रूस्तवर भडकला. त्याचा वाङ्निश्चय मोडावा अशी प्रूस्तची अर्थात् इच्छा नव्हती, तसा इरादाही नव्हता, पण तिच्याबद्दल त्याला भारी आकर्षण होतं हे नि:संशय. ओरल आँ ला येऊन तिनं आपल्याला भेटावं असं सुचवण्याइतपत त्यानं मजल गाठली. एवढंच नव्हेतर आपण भाड्यानं एक घर घेतो, तिनं आईबरोबर तिथं येऊन राहावं असा प्रस्तावही त्यानं मांडला. गास्ताँ पुन्हा खवळला पण पुन्हा निवळला. प्रूस्त पूर्वीप्रमाणंच रविवारी दुपारी त्याच्या घरी जात राहिला, बऱ्याच उशिरापर्यंत थांबत राहिला. गास्ताँ नर्व्हस होई अशा वेळी घड्याळाकडे बघत असे आणि प्रूस्त निरोप घेणं लांबवत असे, ७.४० ची ट्रेन सुटण्याच्या ऐन क्षणी रेल्वे स्टेशन गाठत असे.

लष्करी सेवेतील त्याची प्रगती यथातथाच होती. उन्हाळ्यामध्ये विभागीय प्रमुख कार्यालयात त्याला कारकुनी काम देण्यात आलं. परंतु त्याचं हस्ताक्षर एवढं खराब होतं की त्याला तिथून हलवण्यात आलं. सेवेची वर्षे संपतासंपता त्याला 'इन्स्ट्रक्शन स्क्वॅड'मध्ये नियुक्त करण्यात आलं. अधिकाऱ्याचा दर्जा त्याला प्राप्त व्हावा या उद्देशानं. परंतु आपल्या कामावर लक्ष केंद्रित करणं, ते मन लावून शिकणं त्याच्या स्वभावधर्माला मानवणारं नव्हतं. साहजिकच त्याच्या लेखी ते अवघड बनलं. आणि ६४ जणांच्या या स्क्वॅडमध्ये त्याचा नंबर आला ६३वा. 'कारण माझी खराब प्रकृती, मी एवढा सामान्य सोल्जर होतो की केवळ 'प्रायव्हेट'च राहिलो होतो.' तीस वर्षानंतर आपल्या सेवेचा त्यानं घेतलेला हा आढावा. लष्करामधील त्याच्या आयुष्यातला अखेरची असंगत घटना म्हणजे आणखीन काही महिने त्याला सेवेत राहू द्यावे ही त्यानं केलेली विनंती. ही विनंती मान्य करण्यात आली नाही. 'सोसायटी'मध्ये स्वत:ची उन्नती करून घेण्यासाठी आणि जाँत्र पूक्वेची मनधरणी करण्यासाठी आता तो मोकळा झाला होता, परंतु त्याची ही मुक्तता म्हणजे आणखीन एका नंदनवनामधून झालेली हकालपट्टी ठरली होती. आता त्याला पितासदृश कर्नलचं समाधान करण्यासाठी धडपडावं लागणार नव्हतं तर प्रत्यक्ष पित्याचं. त्यानं बजावलं, तो कर्तासवरता झालेला आहे आणि कमाई करता येण्याजोगी आता त्यानं करीयर निवडावी.

३

लष्करी सेवेचं प्रूस्तचं वर्ष पूर्ण झालं. एव्हाना, लेखक व्हायचं त्यानं मनाशी निश्चित केलं होतं. परंतु, आईवडलांची मार्जी राखण्यासाठी नोकरी धंद्याखातीर, शिक्षणाचा गाडा त्याला हाकणे जरूरीचं होतं. सॉरबॉन येथील 'फाकुल्ते द ट्रोई' मध्ये २० नोव्हेंबर १८९० रोजी त्यानं नाव नोंदवलं. पुढं 'लेकॉल सिऑन्सॅ'मध्येही त्यानं प्रवेश घेतला. कायदा आणि राज्यशास्त्र हे विषय त्यानं निवडल्यानं व्यवसायासाठी त्याच्यापुढं दोन पर्याय होते. वकिली वा राजनैतिक आदर्श परंतु सांप्रत त्यासंबंधी विचार करण्याची काही त्याला आवश्यकता नव्हती. किंबहुना, अंतिम निर्णय जेवढा लांबणीवर टाकता येईल तेवढं त्याच्या दृष्टीनं सोयीचं होते. त्याच्या इच्छेनुसार त्याच्या आईवडलांनी त्याला हवं ते करण्यास मुभा दिली होती आणि त्यामुळं प्रसन्न चित्तानं भरकटणं त्याला शक्य झालं होतं. तो लेक्चरांना हजर राहत होता, त्यातील काही लक्षपूर्वक ऐकत होता. आनातोल लरॉय– बोलीअ आणि आल्बेर सोरेल यासारखे नामवंत इतिहासकार, पॉल देजारदीं आणि आंरी बर्गसाँ यासारखे तत्वज्ञ त्याचे गुरू होते. बर्गसाँ १८९२ मध्ये मादम प्रूस्तच्या एका भाचीशी विवाहबद्ध झाल्यानं त्याचा सगा बनला होता. काळ या त्याच्या संकल्पनेचा प्रूस्तवर प्रभावही पडला होता. परंतु त्याच्या खऱ्याखुऱ्या आस्थेचे विषय होते : साहित्य आणि सोसायटी.

इतर बऱ्याच समकालिन तरुणांप्रमाणं, प्रूस्तच्या लेखी साहित्य हाच एकमात्र सामाजिक उद्योग होता. 'लिसे कॉन्दोसे' मध्ये असताना त्यानं कविता, कथा यासारखे स्फुट लेखन केले होते. तसंच लिखाण आताही लिहावं म्हणून आपल्या खोलीत एकट्यानंच राहाणं त्याला पसंत असे. कैकदा, जे लिहायचं त्याच्या मनात घोळत असायचं त्यावर मित्रपरिवारात चर्चा करण्यास तो सदैव तत्पर असे. ज्या विषयांत त्याला गाडी होती, आस्था होती तशीच गोडी आणि आस्था असणाऱ्या तरुणांना भेटणं त्याला आवडायचं. रॉबर्ट द बिल्ली, गाब्रिएल त्रारीएझ (भावी प्रतीकवादी कवी), झाँ बॉइस्सानास (भावी राजदूत) हे त्यांचे वर्गमित्र होते. साहित्यातील घाट आणि शैली, चळवळी आणि संप्रदाय, मेटॅफिजिक्स, रशियन कादंबरी, इब्सेन यासारख्या विषयांवर मित्रमंडळींमध्ये चर्चा होत. तासन्‌तास बोलण्याचा, ऐकण्याचा प्रूस्तला कधी कंटाळा येत नसे. सकाळी सॉरबॉनमध्ये, दुपारी गॅलरी किंवा बुआमध्ये संध्याकाळी सॅलाँमध्ये, थिएटरात किंवा संगीत मैफलीमध्ये त्याच्या बैठका रंगत असत. तो घराबाहेर क्वचितच एकटा असायचा. काही वेळेला मध्यरात्री मित्राला संगे घेऊन तो कॅबमधून आपल्या घराच्या दारात उतरायचा, मित्रालाही उतरण्याचा आग्रह करायचा. तो उतरला की घराबाहेरील बाकड्यावर बसून त्याच्याबरोबर बोलण्यात रंगून जायचा, अगदी उजाडेपर्यंत.

या तरुण मंडळींमध्ये तो बव्हंशी प्रिय होता. एव्हाना, त्यांच्या ध्यानी आलं होतं की तो काहीसा बायल्या आहे. पण ही गोष्ट त्यांनी फारशी मनावर घेतली नव्हती, त्या वस्तुस्थितीचा त्यांनी स्वीकार केलेला होता. त्यांना हेही कळून चुकल होतं की तो त्यांची अवास्तव स्तुती

करतो. त्याच्या या वागण्याला ते 'प्रूस्तीफ्राईंग' म्हणत. पण त्यांच्या लेखी त्यात नेकी होती. लबाडी नव्हती. वाटायचं, तो त्यांच्याशी एक खेळ खेळत आहे, खेळ मस्त होता आणि त्यात तो प्रविण होता. तो त्यांची तोंड फाटेस्तोवर स्तुती करत असे, कारण, निदान त्या क्षणाला त्याला त्यांच्याविषयी खरोखरीच भारी कौतुक वाटत असे; शक्यता आहे, कमालीच्या सौजन्यानं त्यांच्याशी वागत असे कारण आपण त्यांना आवडायला हवं ही त्याच्या अंतरीची इच्छा असे, तत्त्वविषयीची चिंता त्याच्या मनात कायम वास करत असे. मित्रांनी कधी अपेक्षाही केली नसेल असे 'फेव्हर्स' तो त्यांना करत होता. एखाद्या बालकागत तो त्यांच्यावर माया करत होता. त्यात जिव्हाळा होता, मनमोकळेपणा होता. बिल्ली सांगतो, प्रश्न तो चतुराईनं करायचा, सॉक्रेटिस पद्धतीनं. ती त्यानं दार्लूकडून उचललेली होती. तो मित्रांना गोडी कशात आहे हे शोधून काढायचा, त्यांना बोलतं करायचा, आणि त्यांच्या हालअपेष्टांनी स्वत: व्यथित व्हायचा, जणू काही त्या त्याच्या स्वत:च्या होत्या. त्याला स्वत:ला पैशाची चणचण असूनही मित्रांना आर्थिक मदत करण्यात तो कधी हात आखडता घेत नव्हता, ऐपत नसतानाही त्यांच्यासाठी भेटवस्तू खरेदी करत होता. वस्तुत: त्यांच्या वर्तुळात, त्याचा चांगलुपणा, दिलदारपणा दंतकथांचे विषय बनले होते : रेस्टॉरंटमध्ये तो कशी भरभसाट टिप देतो, पुन्हा कधीही भेटणाची शक्यता नसणाऱ्या गोरगरिबांशी तो किती आस्थेने वागतो, एकदा पुस्तकांचा भारी खोका उचलून नेण्यासाठी धडपडणाऱ्या त्याच्या मित्राच्या नोकराला मदत करावी म्हणून तो कसा पुढं सरसावला होता इत्यादी.

प्रूस्तच्या चांगुलपणाचा त्यांच्या मित्रावर प्रभाव पडला होता. हे खरं पण त्यांना प्रभावित करणारा तो एकमेव गुण मात्र नव्हता. त्यांना भावला होता त्याचा अमर्याद उत्साह, निर्मळ बालकसदृश आनंद आणि त्या आनंदाचा खुला उद्रेक. दुसऱ्यांची हुबेहुब नक्कल करण्यात तो पटाईत होता. अनैसर्गिक वागणुकीची खिल्ली उडवण्यात त्याचा हातखंडा होता. एखाद्या पोरीगत खदखदून तो हसायचा आणि इतरांची हसता हसता मुरकुंडी वळायचा. त्याच्या अभिरूचीमधील वैविध्य आणि तीव्रता त्यांना आवडत असे. मानवी अनुभूतीच्या हरएक पैलूवर इतरांना सांगण्यासाठी तो उत्सुक असलेला दिसायचा. दूरदूरच्या प्रातांतील सामाजिक जीवनाविषयी त्याला जेवढी जिज्ञासा होती, तेवढीच पॅरिसमधल्या नोकरचाकरांच्या सवयी विषयीही होती. दिवाणखाण्यात चाललेल्या प्रत्येकाच्या संभाषणात आपण एकाच वेळी सहभागी होऊ शकत नाही याची खंत त्याला असे. प्रत्येकाच्या मेंदूच्या अंदाज घेण्याची, कोण काय विचार करत आहे याचा नेमका शोध घेण्याची त्याची अनिवार इच्छा असे. एकदा, बसमधून जात असताना, उतरण्यापूर्वी एका देखण्या बाईनं कंडक्टरला काहीतरी विचारल्याचं त्याच्या चौकस नजरेनं टिपल. आपल्या जिज्ञसेला तो आवर घालू शकला नाही. तो आपल्या जागेवरून उठला, कंडक्टरपाशी गेला, त्याच्या हातात एक नाणं त्यानं सरकवलं आणि विचारलं, त्या बाईनं काय विचारलं होतं? त्याची लक्षणीय निरीक्षणशक्ती

त्याच्या मित्रांना भावत असे. त्यातून तो प्रतिभावंत असल्याची ओळख त्यांना पटली होती. आपण जे पाहतो त्याहून तो अधिक पाहू शकत होता हे त्यांना जाणवलं होतं. एखाद्या गोष्टीकडे तो एकाग्रतेने आणि दीर्घकाळ पाहत राहायचा. एकदा गावातील एका घराच्या बागेतून जात असता गुलाबाचं एक झुडूप त्याच्या दृष्टीला पडलं. तो थबकला. त्या झुडूपाकडे एकटक बघत उभा राहिला. वेळ असा वाया दवडणं उचित नव्हे असं वाटल्यानं त्याचा मित्र पुढं आपल्या कामाला निघून गेला तो फिरून पुन्हा परतला तेव्हा त्याला आढळून आलं की प्रूस्त मघाच्याच जागेवर अद्याप उभा आहे, त्याची मान पुढं झुकलेली होती, त्याचे भाव गंभीर होते, त्यानं आपली नजर खिळवलेली होती. आणि जणूकाही उत्कट एकाग्रतेचा प्रयत्न करत असल्यामुळं भाळावर किंचितशा आठ्या पडलेल्या होत्या. डाव्या हातानं आपल्या छोट्या मिशीचं टोक आपल्या ओठात ढकलत होता आणि ते चघळत होता. तो गुलाबांचा अभ्यास करत होता, असा अभ्यास करण्याचा प्रयत्न फारच थोड्या लोकांनी तोवर केला असेल.

प्रूस्तचे 'टॅलेंट' ज्यांनी हेरले होते आणि त्याच्या मोहक व्यक्तिमत्वाची ज्यांना जाणीव झाली होती ते तरुण स्वत: गुणवंत होते, त्यांनीही कलांसाठी स्वत:ला समर्पित केलं होतं. प्रूस्तला ते सर्वजण आवडत होते, त्यांच्याविषयी त्याला कौतुक होतं. त्यात भेदभाव नव्हता. तो त्यांना जेवढा आवडत असे तेवढेच ते त्याला आवडत असत. त्यांचा अनुभव जोवर टवटवीत असे आणि त्यांची मनं स्वारस्यपूर्ण असत, निदान त्या काळापुरते तरी ते त्याला प्रिय असत. त्याच्या मनातून एखादा उतरला की तो त्याला तडकाफडकी सोडून असे. मैत्री असेपर्यंत त्याला जी माया, जो जिव्हाळा वाटत असे ती भावनाचं मुळी अस्थिर होती. असं सांगितलं जात असे की ज्यांना तो ओळखत होता त्यातील प्रत्येकजण केव्हाना केव्हा त्याचा मित्र होता. तरीही असा एखादा मित्र असे ज्याला भेटता आलं नाही तर तो अस्वस्थ व्हायचा. हरवल्यागत त्याची अवस्था व्हायची. या खास स्नेह्यापासून फार काळ दूर राहणं त्याला शक्य होत नसे. या खास मित्रावर त्याचं जिवापाड प्रेम असायचं आणि त्या ऋणानुबंधात तो मस्त खुषी अनुभवाचा. हिवाळ्यात ते दोघं तरुण सतत एकमेकांना भेटायचे– घरी, वर्गात आणि सोसायटीमध्ये. उन्हाळ्यात ते एकत्र प्रवास करायचे, गिर्यारोहणासाठी जायचे, समुद्रकिनारी सहली काढायचे, कुठंकुठं भटकायचे, एकमेकांच्या सहवासातील सुख आकंठ उपभोगायचे. समान अनुभवांवर पोसलेली ही मैत्री अतिशय घनिष्ट भासायची आणि नंतर अचानक प्रूस्तच्या व्यक्तित्वाचा दुसरा पैलू उघड व्हायचा. आपल्या मित्राच्या वृत्तीमधील थंडपणा त्याला जाणवू लागला की संशयाचा समंध त्याच्या मानगुटीवर सवार व्हायचा. आपल्या या मित्राची तो कानउघाडणी करायचा, त्याला समजुतीच्या चार गोष्टी सुनवायचा आणि चिडचिड्या पत्रांमधून आपला दर्द भरभरून ओतायचा. उघड होतं की, जिथं त्याचा प्रत्यक्ष संबंध असे, तिथं मानवी स्वभवाधर्मावर त्याचा फारसा भरवसा नसे आणि मानवी

करतो. त्याच्या या वागण्याला ते 'प्रूस्तीफ्राईंग' म्हणत. पण त्यांच्या लेखी त्यात नेकी होती. लबाडी नव्हती. वाटायचं, तो त्यांच्याशी एक खेळ खेळत आहे, खेळ मस्त होता आणि त्यात तो प्रविण होता. तो त्यांची तोंड फाटेस्तोवर स्तुती करत असे, कारण, निदान त्या क्षणाला त्याला त्यांच्याविषयी खरोखरीच भारी कौतुक वाटत असे; शक्यता आहे, कमालीच्या सौजन्यानं त्यांच्याशी वागत असे कारण आपण त्यांना आवडायला हवं ही त्याच्या अंतरीची इच्छा असे, तत्त्वविषयीची चिंता त्याच्या मनात कायम वास करत असे. मित्रांनी कधी अपेक्षाही केली नसेल असे 'फेव्हर्स' तो त्यांना करत होता. एखाद्या बालकागत तो त्यांच्यावर माया करत होता. त्यात जिव्हाळा होता, मनमोकळेपणा होता. बिल्ली सांगतो, प्रश्न तो चतुराईनं करायचा, सॉक्रेटिस पद्धतीनं. ती त्यानं दार्लूकडून उचललेली होती. तो मित्रांना गोडी कशात आहे हे शोधून काढायचा, त्यांना बोलतं करायचा, आणि त्यांच्या हालअपेष्टांनी स्वतः व्यथित व्हायचा, जणू काही त्या त्याच्या स्वतःच्या होत्या. त्याला स्वतःला पैशाची चणचण असूनही मित्रांना आर्थिक मदत करण्यात तो कधी हात आखडता घेत नव्हता, ऐपत नसतानाही त्यांच्यासाठी भेटवस्तू खरेदी करत होता. वस्तुतः त्यांच्या वर्तुळात, त्याचा चांगलुपणा, दिलदारपणा दंतकथांचे विषय बनले होते : रेस्टॉरंटमध्ये तो कशी भरभसाट टिप देतो, पुन्हा कधीही भेटणाची शक्यता नसणाऱ्या गोरगरिबांशी तो किती आस्थेने वागतो, एकदा पुस्तकांचा भारी खोका उचलून नेण्यासाठी धडपडणाऱ्या त्याच्या मित्राच्या नोकराला मदत करावी म्हणून तो कसा पुढं सरसावला होता इत्यादी.

प्रूस्तच्या चांगुलपणाचा त्यांच्या मित्रावर प्रभाव पडला होता. हे खरं पण त्यांना प्रभावित करणारा तो एकमेव गुण मात्र नव्हता. त्यांना भावला होता त्याचा अमर्याद उत्साह, निर्मळ बालकसदृश आनंद आणि त्या आनंदाचा खुला उद्रेक. दुसऱ्यांची हुबेहुब नक्कल करण्यात तो पटाईत होता. अनैसर्गिक वागणुकीची खिल्ली उडवण्यात त्याचा हातखंडा होता. एखाद्या पोरीगत खदखदून तो हसायचा आणि इतरांची हसता हसता मुरकुंडी वळायचा. त्याच्या अभिरूचीमधील वैविध्य आणि तीव्रता त्यांना आवडत असे. मानवी अनुभूतीच्या हरएक पैलूवर इतरांना सांगण्यासाठी तो उत्सुक असलेला दिसायचा. दूरदूरच्या प्रातांतील सामाजिक जीवनाविषयी त्याला जेवढी जिज्ञासा होती, तेवढीच पॅरिसमधल्या नोकरचाकरांच्या सवयी विषयीही होती. दिवाणखाण्यात चाललेल्या प्रत्येकाच्या संभाषणात आपण एकाच वेळी सहभागी होऊ शकत नाही याची खंत त्याला असे. प्रत्येकाच्या मेंदूच्या अंदाज घेण्याची, कोण काय विचार करत आहे याचा नेमका शोध घेण्याची त्याची अनिवार इच्छा असे. एकदा, बसमधून जात असताना, उतरण्यापूर्वी एका देखण्या बाईनं कंडक्टरला काहीतरी विचारल्याचं त्याच्या चौकस नजरेनं टिपल. आपल्या जिज्ञसेला तो आवर घालू शकला नाही. तो आपल्या जागेवरून उठला, कंडक्टरपाशी गेला, त्याच्या हातात एक नाणं त्यानं सरकवलं आणि विचारलं, त्या बाईनं काय विचारलं होतं? त्याची लक्षणीय निरीक्षणशक्ती

त्याच्या मित्रांना भावत असे. त्यातून तो प्रतिभावंत असल्याची ओळख त्यांना पटली होती. आपण जे पाहतो त्याहून तो अधिक पाहू शकत होता हे त्यांना जाणवलं होतं. एखाद्या गोष्टीकडे तो एकाग्रतेने आणि दीर्घकाळ पाहत राहायचा. एकदा गावातील एका घराच्या बागेतून जात असता गुलाबाचं एक झुडूप त्याच्या दृष्टीला पडलं. तो थबकला. त्या झुडूपाकडे एकटक बघत उभा राहिला. वेळ असा वाया दवडणं उचित नव्हे असं वाटल्यानं त्याचा मित्र पुढं आपल्या कामाला निघून गेला तो फिरून पुन्हा परतला तेव्हा त्याला आढळून आलं की प्रूस्त मघाच्याच जागेवर अद्याप उभा आहे, त्याची मान पुढं झुकलेली होती, त्याचे भाव गंभीर होते, त्यानं आपली नजर खिळवलेली होती. आणि जणूकाही उत्कट एकाग्रतेचा प्रयत्न करत असल्यामुळं भाळावर किंचितशा आठ्या पडलेल्या होत्या. डाव्या हातानं आपल्या छोट्या मिशीचं टोक आपल्या ओठात ढकलत होता आणि ते चघळत होता. तो गुलाबांचा अभ्यास करत होता, असा अभ्यास करण्याचा प्रयत्न फारच थोड्या लोकांनी तोवर केला असेल.

प्रूस्तचे 'टॅलेंट' ज्यांनी हेरले होते आणि त्याच्या मोहक व्यक्तिमत्वाची ज्यांना जाणीव झाली होती ते तरुण स्वतः गुणवंत होते, त्यांनीही कलांसाठी स्वतःला समर्पित केलं होतं. प्रूस्तला ते सर्वजण आवडत होते, त्यांच्याविषयी त्याला कौतुक होतं. त्यात भेदभाव नव्हता. तो त्यांना जेवढा आवडत असे तेवढेच ते त्याला आवडत असत. त्यांचा अनुभव जोवर टवटवीत असे आणि त्यांची मनं स्वारस्यपूर्ण असत, निदान त्या काळापुरते तरी ते त्याला प्रिय असत. त्याच्या मनातून एखादा उतरला की तो त्याला तडकाफडकी सोडून असे. मैत्री असेपर्यंत त्याला जी माया, जो जिव्हाळा वाटत असे ती भावनाचं मुळी अस्थिर होती. असं सांगितलं जात असे की ज्यांना तो ओळखत होता त्यातील प्रत्येकजण केव्हाना केव्हा त्याचा मित्र होता. तरीही असा एखादा मित्र असे ज्याला भेटता आलं नाही तर तो अस्वस्थ व्हायचा. हरवल्यागत त्याची अवस्था व्हायची. या खास स्नेह्यापासून फार काळ दूर राहणं त्याला शक्य होत नसे. या खास मित्रावर त्याचं जिवापाड प्रेम असायचं आणि त्या ऋणानुबंधात तो मस्त खुषी अनुभवाचा. हिवाळ्यात ते दोघं तरुण सतत एकमेकांना भेटायचे– घरी, वर्गात आणि सोसायटीमध्ये. उन्हाळ्यात ते एकत्र प्रवास करायचे, गिर्यारोहणासाठी जायचे, समुद्रकिनारी सहली काढायचे, कुठंकुठं भटकायचे, एकमेकांच्या सहवासातील सुख आकंठ उपभोगायचे. समान अनुभवांवर पोसलेली ही मैत्री अतिशय घनिष्ट भासायची आणि नंतर अचानक प्रूस्तच्या व्यक्तित्वाचा दुसरा पैलू उघड व्हायचा. आपल्या मित्राच्या वृत्तीमधील थंडपणा त्याला जाणवू लागला की संशयाचा समंध त्याच्या मानगुटीवर सवार व्हायचा. आपल्या या मित्राची तो कानउघाडणी करायचा, त्याला समजुतीच्या चार गोष्टी सुनवायचा आणि चिडचिड्या पत्रांमधून आपला दर्द भरभरून ओतायचा. उघड होतं की, जिथं त्याचा प्रत्यक्ष संबंध असे, तिथं मानवी स्वभवाधर्मावर त्याचा फारसा भरवसा नसे आणि मानवी

हेतूविषयीची त्याची समजही अद्याप प्रगल्भ झालेली नव्हती. परंतु तो अशा प्रसंगी जसा सहजासहजी अस्वस्थ व्हायचा तसा सहजासहजी पुनश्च निर्धास्तही व्हायचा. तुफान उठते न उठते तोच ते शांत होत असे आणि त्या दोघ मित्रांमध्ये मैत्री पुन्हा जुळून येत असे. पुन्हा ते एकत्र प्रवास करत, पुन्हा गावात एकमेकांना भेटत, पुन्हा रात्रौ उशीरा कॅबमधून घरासमोर उतरण आणि तिथल्या बागेतला काळोख लपेटून अखंड बोलत बसत.

या मैत्रीच्या मूळाशी समलिंग संभोगवृत्ती होती हे निश्चितच कारण प्रूस्त एव्हाना अशा प्रेमामध्ये आकंठ बुडालेला होता आणि स्त्रित्वाचा अंश असलेल्या तरुण पुरुषाशी प्रेमाशी सांगड घालण्याकडे त्याचा कल होता. वस्तुत: 'कन्फेशन आल्बम' मध्ये त्यानं पूर्वीच स्पष्टपणे नोंदवलं होतं की पुरुषांमध्ये त्याला आवडत होतं ती त्याच्यातील स्त्रीसदृश मोहकता आणि त्यांच्याकडून त्याला हवं होतं – अर्थात् ते देखणे असले तर – अलवारपणा. पुरुषीपणा असलेल्या स्त्रिया त्याला आवडत. कारण त्यांची सोबत सुखावह असे. उलटपक्षी, आपल्या आईवर आणि आजीच्या स्मृतीवर त्याची अलोट भक्ती होती. त्यावाचून जीवन जगणं म्हणजे घोर दुर्भाग्य अशी त्यांची भावना होती.

तरुण पुरुषांबरोबरच्या प्रूस्तच्या संबंधांमध्ये अशा रीतीनं फार मोठं परिवर्तन घडून येत असलं तरी तो ते उघड करू धजत नव्हता. नाईलाज झाला तरच वाच्यता करत होता. अजूनही पोरींशी तो 'फ्लर्टिंग' करत होता. उदाहरणार्थ, जाँत्र पूक्वे. ज्यांच्या मार्फत भक्कम सामाजिक पत लाभू शकेल असं त्याला वाटत होत अशा वयस्कर स्त्रियांशीही तो संधान जुळवत होता. त्याच्या या स्त्रीदाक्षिण्यांमध्ये तुच्छतेचा बराचसा अंश होता हे निश्चितच, तरीदेखील त्यात इतर गोष्टीही होत्या – कौतुक आणि स्नेह कारण, मादम स्ट्रॉस, मादम द रोव्हीग्न आणि त्यांच्यासारख्या अन्य जणीवर त्याची नितांत श्रद्धा होती आणि त्यांच्यावर आपलं गाढ प्रेम आहे अशी स्वत:ची खात्री तो बहुधा पटवू शकत होता.

मादम स्ट्रॉस ही एक लक्षणीय स्त्री होती, पॅरीशियन सोसायटीतील अत्यंत सुसंस्कृत आणि अत्यंत बुद्धीमान यजमानीण अशी तिची ख्याती होती. फ्रॉमाँताल हालेव्हीच्या या मुलीनं मिळवलेली सामाजिक प्रतिष्ठेची चढती कमान थक्क करणारी होती. परंतु संगीताचं वातावरण असलेल्या आपल्या मध्यमवर्गीय पार्श्वभूमीचं तिनं कधी स्वत:ला विसर पडू दिला नव्हता. एकदा एका उच्चभ्रू बाईनं तिला विचारलं की तिला संगीताची आवड आहे का? त्यावर ती उत्तरली, 'माझ्या माहेरी मी ते बरंच ऐकलं आहे.' विधवेच्या पोषाखातील द लॉनेनं चितारलेला तिचा पोर्ट्रेट १८७८ च्या सॅलॉमध्ये कौतुकाचा विषय झाला होता. देगासारख्या नामवंत चित्रकारानं ती केस विचरत असताना तिला पाहण्याची इच्छा व्यक्त केली होती. वयाच्या १९ व्या वर्षी आपल्या वडलांचा बुद्धिमान विद्यार्थी जॉर्ज बिझे याच्याशी तिनं लग्न केलं आणि त्याच्या अल्प कारकिर्दीमधील अपेक्षाभंगांमध्ये त्याच्या संगे वाटा उचलला. असं म्हटलं जात असे की त्यात फारसा उत्साह नसे. 'लार्सेसिएन्न'चं अपयश आणि 'कारमेन'चं

थंड स्वागत यांना ती साक्षी होती. त्यांच्या वैवाहिक जीवनाच्या सहाव्या वर्षी तिच्या नवऱ्याचं आकस्मिक आणि अकली निधन झालं. तिच्यावर आकाशीची कुऱ्हाड कोसळली. आता, वयाच्या चाळिसाव्या वर्षी ती एमिल स्ट्रॉस या सधन वकिलाशी विवाहबद्ध झाली. एमिलला उंची नव्हती. त्याचा बांधा सडसडीत चेहरपट्टी ओबडधोबड. टक्कल पडत चाललेलं केस पिकलेले. फ्रँको-प्रशियन युद्धात झालेल्या जखमेमुळे अर्धवट मिटलेले डोळे. आपल्या बायकोचे पोषाख आणि तिची सामाजिक करीयर यांच्या खातीर त्यानं स्वानप्रमाणं आपलं आयुष्य आणि आपली धनदौलत समर्पित केली होती. 'आ लाँब्र दे जन फीय आं फ्लर' मधील ऑडेट्टच्या पाहुण्यांकडे पडद्याआडून बघत असलेला स्वान त्याच्या मित्रांनी पाहिला आणि त्यांना तत्काल एमिल आठवला होता. तो प्रेमळ नवरा होता पण असूयाग्रस्त.

१८८६ मध्ये मादम स्ट्रॉस लग्न होऊन बुलवहार्द हाऊसमानमधील प्रशस्त आणि ऐषआरामी अपार्टमेंटमध्ये राहायला आली. इथं स्वत:च्या प्रकृतीची काळजी ती घेत असे. कारण 'नर्व्हस डिसऑर्डर्स'. इथं वाऱ्याच्या झुळुका आणि उघड्या खिडक्या यांच्यापासून ती स्वत:चं रक्षण करत असे कारण तिला वाटत असे की कडेकोट बंद केलेल्या खोलीतच तिला श्वास घेता येतो आणि इथंच आपल्या अस्तित्वाला भेडसावणाऱ्या रुक्ष रिकामपणापासून सुटका करून घेण्यासाठी निवडक मित्रांना घरी निमंत्रित करून त्यांच्या संगतीत मन रिझवत होती. या मित्रांपैकी तिच्या खास मर्जीतले होते ते ज्यू बुद्धिवंत. उदाहरणार्थ, मेईलहाए. आता तो संधीविकारी होता, तशात गलेलठ्ठ. त्यामुळं स्वत:च्या बुटाच्या वाद्याही त्याला नीट बांधता येत नसत. दुसरा आर्थर मेयर 'ल गोलेइस'चा संपादक आणि टक्कल, फिक्कट चेहरा आणि चिंतातूर नजर असलेला एक कट्टर राजनिष्ठ. शिवाय आणखीनही तिच्या मर्जीतली माणसं होती – हेरव्हिएसारखे लेखक, रॉथशिल्ड्ससारखे आर्थिक जगतातील जानेमाने सदस्य, काँप्त द अस्फोनव्हिलसारखे उमराव घराण्यातील सदस्य आणि ब्रिटिश राजदूत. तथापि, सॅलॉंचे मुख्य आकर्षण मेईलहाए नव्हता वा मेयर वा ब्रिटिश राजदूत. तर ते होतं स्वत: मादम स्ट्रॉस. तारुण्यातलं तिचं देखणेपण आता निश्चितच राहिलेलं नव्हत. परंतु व्यक्तिमत्व मोहक होतं. खुसखुशीत विनोदबुद्धीची देणगी तिला लाभली होती. त्यायोगे आपल्या चाहत्यांना ती खदखदून हसवत होती. एका तरुणानं तिच्या एका मित्राबद्दल अपशब्द वापरले आणि तिला सांगितलं की त्याच्या मित्राबद्दल तिनं अपशब्द उच्चारण्यास त्याची बिलकुल हरकत नाही. त्यावर तिनं केवळ पृच्छा केली, 'म्हणजे तुला मित्र आहेत तर?' गलेलठ्ठ होत चालेलल्या एका बाईबद्दल ती म्हणाली होती, 'मादम एक्स' हे एक शिल्प नाही, शिल्पांचा ग्रुप आहे. तिची विनोदबुद्धी दिवाणखान्यातील वातावरणात प्रसन्नतेचा शिडकावा करत असे. ख्यातनाम 'गॅर्मांत कोटी' प्रूस्तनं तिच्याकडूनच उचललेली होती. तिच्या दरबारात साहित्य आणि राजकारण यावर क्वचितच चर्चा होई. कुणी पत्ते कुटत, कुणी कुटाळक्यात दंग असत, एखादा कुणी एखादा मॉसिअ स्ट्रॉस डोळे मिटून समाधानी

चेहऱ्यानं बोलत असे ते कान टक्कारून ऐकत असे. वस्तूत: स्ट्रॉस हे ला त्रेमोइल्ला आणि ला रोश- फुकोल्ड यासारख्या उमरावाच्या खानदानीपणापासून कित्येक योजने दूर होते तरीही इथलं वातावरण, वागणं खानदानी वर्तुळात असल्यागत तंतोतंत.

प्रूस्त मादम स्ट्रॉसला बरीच वर्षं ओळखत असावा. तिचा मुलगा जाक बिझे याच्या मार्फत शाळेत असताना तो तिला भेटला असणार. आता तिच्या दिवाणखान्यात स्वत:चं बस्तान प्रस्थापित करण्यासाठी तो प्रयत्नशील होता. या यजमानीणीबद्दल आपल्याला नितांत आदर आहे आणि आपण तिची पूजा करतो हे त्यानं अगदी स्वच्छपणे उघड केलं होतं. आपल्या मुलाच्या काही शाळूसोबत्यांसाठी एक गाणं ती एकदा गाईली होती आणि प्रूस्तनं ते देहभान हरपून ऐकलं होतं. तिच्या हाताचं त्याला चुंबन घ्यायचं होतं. दोन महिने त्याचं काचकुच चाललं होतं आणि नंतर अखेरीस त्यानं ते घेतलं असावं. ती त्याच्या दुप्पट वयाची होती तरी स्त्रीदाक्षिण्याचं बेफाम प्रदर्शन तो करत होता. आता, त्यानंतर बरीच वर्षं उलटून गेली असली तरी त्याचा नूर तोच होता. त्याचं त्यालाच नीट कळत नसावं की मादम स्ट्रॉसशी तो कोणतं नातं जुळवत होता. एक यजमानीण म्हणून की मेहरबान म्हणून की अशरीरी नातेसंबंधाच्या एखाद्या प्रदेशात जाण्यास त्याला सहाय्यभूत ठरू शकेल अशी रक्षी. त्याच्या वागण्यानं मादम स्ट्रॉम कैकदा बेचैन होत असे. चारचौघात त्याचं हसं होऊ देण्याचा धोका टाळण्यासाठी तिनं या तरुण चाहत्याला पुढं पुढं करण्यास सक्त मनाई केली होती, त्याला चार हात दूर रोखला होता. असं असलं तरी आपल्या वर्तुळातील एक सदस्य म्हणून तिनं त्याचा स्वीकार केलेला होता.

प्रूस्त आणि त्याची कादंबरी यांच्या संदर्भातील अत्यंत महत्त्वाच्या व्यक्ती तिच्या या दरबारातील गोतावळ्यात होत्या : काँप्तेस्स द शेव्हीग्न, काँप्तेस्स ग्राफ्फूह (Graffuhe) आणि चार्लस हास. पहिली बनली ड्यूचेस्स द गॅर्मांत, दुसरीने ड्युचेस्स आणि प्रिन्सेस्स द गॅर्मांत यांच्यासाठी योगदान केलं आणि तिसरा बनला चार्ल्स स्वान. तथापि पहिल्या दोन रईस बाईसाहेबांचं प्रूस्त सांप्रत दूरूनच कौतुक करत होता. चार्लस हास यांच्याबरोबर त्याचा स्नहे कधीच दाट झाला नसला तरी त्याच्या कादंबरीतील आणि त्याच्या जीवनातील त्याचं योगदान लक्षणीय आहे.

चार्लस हास हा त्याच्याच शब्दात सांगायचं तर 'गढगंज संपत्ती नसतानाही पॅरिशियन सोसायटीनं स्वीकारलेला एकमेव ज्यू' होता. अर्थात् त्याचं हे विधान अतिशयोक्त होतं. स्टॉकब्रोकर असलेल्या त्याच्या वडलांनी पुरेशी धनदौलत त्याला ठेवलेली होती. फ्रँको–प्रशियन युद्धात त्यानं गाजवलेल्या मर्दुमकीमुळं त्याला खास श्रीमंतांच्या 'जॉकी क्लब'मध्ये प्रवेश मिळालेला होता. असा प्रवेश मिळालेला त्याच्या वंशातला दुसरा सदस्य म्हणजे रॉथशिल्ड्स. तत्पूर्वी दुसऱ्या साम्राज्याच्या दरबारीही त्याचा वावर होता. 'तो आहे उंच, सडसडीत, शहाणासुरता, दु:खी आणि उर्मट, त्याची छडी तो त्याच्या उजव्या खांद्यावर

ठेवतो; बाल्कनीच्या फ्रेंच खिडकीवर पाय फाकवून तो आराम करतो; राखाडी हॅट आणि पट्ट्यांची विजार यांमधील त्याचं देखणं रूप शब्दातीत आहे. त्याचे केस कुरळे आणि तांबुस, चकित झाल्यागत कमानदार भिवया, वर वळवलेल्या मिशा, ओठावर अस्फुट स्मित आणि बाक नसलेलं नाक. १९०२ च्या जुलैमध्ये त्याचं निधन झालं. १८८० ची अखेर आणि १८९० चा प्रारंभ या काळात हासचं मादम स्ट्रॉसच्या सँलॉंमध्ये येणंजाणं होतं. प्रूस्त त्याला बहुधा इथंच भेटला असावा. शिवाय, शक्यता आहे, अन्य यजमानीणींच्या सँलॉंमध्ये त्यानं त्याला पाहिला असावा. त्याला स्वारस्य होतं दोन गोष्टींमध्ये. स्त्रिया आणि पेंटिंग्ज या दोन्हीमधला दर्दी अशी त्याची ख्याती होती. एकदा सॉं-मॉरिसनं आपल्या संग्रहात नव्यानं समाविष्ट केलेलं एक भयानक, इटालियन चित्र त्याला दाखवलं आणि अभिमानानं त्याला विचारलं, "काय आहे ते असं वाटतं तुला?" हास उत्तरला, "हलक्या अभिरूचीतील एक विनोद." ड्यूक द गॅर्मांत आपला नवा व्हेलास्क्वेझ दाखवतो तेव्हा स्वानही असंच उत्तर देतो. 'आ ला रशार्श' मधील बऱ्याच लोकांना ओळखू येण्याजोगी वैशिष्ट्यं, त्यांचीच अशी, दिलेली आहेत. हासच्या बाबतीत तसेच 'क्ल्यू' प्रूस्तनं दिले आहेत. तो सांगतो, स्वानच्या माथी राखाडी हॅट असते आणि अशी हॅट दलीऑं (Delion) केवळ त्याच्यासाठी व हाससाठी बनवतो. हासला ओळखणाऱ्यांनी स्वानमधला हास तत्काळ ओळखला. मादम स्ट्रॉस तर म्हणायची 'स्वान हास'. प्रारंभीच्या काळात हास त्याचा हिरो होता, आदर्श होता, त्याचं प्रतिरूप होता. त्याच्या प्रमाणंच हास एक ज्यू होता, एक तुच्छ म्हणून जन्माला येऊनही बुद्धिमत्ता आणि मोहकता या स्वत:च्या गुणांवर त्यानं गुणवतांनाच केवळ प्रवेश असलेल्या सोसायटीत प्रवेश मिळवला होता, करीयर केली होती. हासकडून स्फूर्ती घेऊन असेल वा नसेल, प्रूस्तनं त्याचाच मार्ग चोखाळला होता.

याच मार्गे त्यानं राजकन्या माथिल्ड हिच्या सँलॉंनमध्ये प्रवेश केला होता. सत्तरीची ही राजकन्या नेपोलियनची पुतणी होती. फ्लॉबेर, रेनान, सॉं बव्ह, तेन, ड्यूमा, मेरीयेअ, आणि एडमंड द गॉंकूर यांसारख्या मान्यवरांची ती एकेकाळी यजमानीण होती. तिचे मित्र तिला 'नोत्र दाम डेआर्ट' या नावानं संबोधत; सांप्रत गॉंकूर आणि तेन वगळता सारे निधन पावले होते. १८८७ मध्ये तेननं तिच्या काकाबद्दल परखड लेख लिहिल्यामुळे त्याच्याशी भांडून तिनं त्याच्याबरोबरचे संबंध तोडून टाकले होते. राजकन्या ठेंगणी ठुसकी होती. तिचा आणि तिच्या काकाचा चेहरा यात बरंच साम्य होते. बोनापार्टींना साजेशा कोरड्या लष्करी आवाजात ती म्हणे, "तो नसता तर मी बाजारात मोसंबी विकताना दिसले असते." गळ्यात काळ्या मोत्यांची माळ घालून साध्या आरामखुर्चीवर बसत असे आणि त्या खुर्चीला सिंहासनाची शान लाभत असे. शिष्टाचारांना तिच्या लेखी महत्त्व नव्हतं. एखाद्या नवागतानं अदबीनं विचारलं, "महाराणी साहेबा, आपली तबियत कशी आहे?" त्यावर ती गुरगुरायची, "एवढी काही खराब नाही ! तुझी कशी आहे?" तिचे प्रेमिक असंख्य. त्यातील शेवटचा

क्लॉडियस पॉपेलिन हा चित्रकार दगाबाज निघाल्याचं आढळून येताच तिनं त्याला हाकलून दिलं होतं. प्रूस्तवर तिची खास मर्जी होती त्यामुळे त्याचा उल्लेख इतरेजन खाजगीत 'धाकटा पॉपेलिन' असा करत आपल्या एका उंची रेशमी पोषाखाचा तुकडा, काढून तो तिनं गळपट्टा म्हणून त्याला भेट दिला होता. 'आ ला रशार्श' मध्ये ती आपल्या गुणवैशिष्ट्यांसह राजकुमारी म्हणूनच आली आहे.

प्रूस्तच्या यजमानीणींमध्ये मादम ओबेरनॉन द नेरव्हील हे आणखीन एक मानाचं नाव. १८६७ मध्ये ती नवऱ्यापासून विभक्त झाली होती. १८८० पर्यंत आपलं सँलॉ ती आपल्या आईच्या मदतीनं चालवत होती. तिच्या दरबारात नामवंत पाव्हण्यांबरोबर गूढ भासणाऱ्या वयस्कस्त्रियाही असत. ती लठ्ठ होती, ठेंगू होती. पण प्रसन्न व्यक्तिमत्वाची बाई होती. मॉन्तेस्क्यूइड म्हणायचा, "शौचालयाच्या आसनावरील पामारेराणीसारखी ती दिसते." १८९२ मध्ये तिचं वय होतं सदुसष्ट आणि आपला देखणेपणा ओसरल्याचं भान तिला होतं. ती म्हणायची, 'पुरुष जेव्हा माझ्या मुखड्याचं गुणगान न करता मी किती बुद्धिमान आहे असं मला ऐकवू लागले, तेव्हाच माझ्या ती गोष्ट लक्षात आली होती.' बुधवार आणि शनिवार हे तिचे 'रिसेप्शन'चे दिवस. बारा जणानाच निमंत्रित केलं जाई. एक कमी नाही वा एक जास्त. प्रथम भोजन. त्यानंतर चर्चा. विषय आगाऊ जाहीर केलेला असे. गांभिर्यानं चर्चेत सहभागी व्हावी ही तिची इच्छा कुणी फारशी मनावर घेत नसे. एका आठवड्यासाठी विषय देण्यात आला होता 'व्यभिचार' यजमानीणींनं मादम स्ट्रॉसला विचारलं, "तुझं काय मत आहे व्यभिचारावर?" त्यावर मादम स्ट्रॉस म्हणाली, "माफ कर हं, मी त्याऐवजी निषिद्ध लैंगिक संबंधावर तयारी करून आले." अशीच काही पुढील प्रश्नोत्तरे. "शेक्सपीअरबद्दलचं तुझं काय मत?" "का, आमच्या माहितीतल्यापैकी कुणाशी तो लग्न करतोय?"; "प्रेमासंबंधी तुझं काय मत?" "मी 'ते' कैकदा करते, पण त्यासंबंधी मी कधीही, कधीही बोलत नाही." पाव्हणे खाजगी संभाषणात गुंतले असल्याचं लक्षात येताच यजमानीण तिची सुप्रसिद्ध घंटी वाजवत असे जेणेकरून वक्त्याकडे त्यांनी लक्ष द्यावं.

मादम ओबेरनॉन मादक लमेर Lemaire च्या बरोबरीनं 'आ ला रशार्श' मध्ये मादम व्हेर ड्यूरीन म्हणून आपल्याला भेटते. मादम व्हेरड्यूरीन प्रमाणेच तिच्याही सँलाँमध्ये देखण्या स्त्रिया आढळत नाहीत. ती म्हणते, "मी चर्चा घडवून आणते, प्रेम नाही", किंवा "स्त्रिया हा असा एक विषय आहे ज्यावर बऱ्याचदा वर्चस्व गाजवणं पुरुषांना आवडतं." मादम व्हेरड्युरीन प्रमाणंच, ती ज्याच्या हातून अपराध घडलेला आहे अशा व्यक्तींवर अधूनमधून जाहीर कारवाई करत होती. अशा कारवाईचा शेवट अश्रुपातात व्हायचा. कधी अपराध्याच्या कधी शिक्षेची अंमलबजावणी करणाऱ्याच्या. मादम ओबरनॉन रागानं भडकत होती हे खरं पण मादम व्हेरड्युरीन च्या रागासारखा तो खुनशी नव्हता. तिचा राग फार काळ टिकत नव्हता. काही महिन्यांनी अपराध्यांना क्षमा केली जात होती आणि 'माफीच्या भोजना'ला ते

आवर्जून हजर रहात होते. तोंड मिटून गप्प बसणं आणि 'बोअर' असणं हे तिच्या लेखी अक्षम्य गुन्हे होते. मादम व्हेरड्युरीनप्रमाणं तिला संगीत व राजकारण या विषयात रस नव्हता, पण तिच्यासारखी ती शिष्टमन्य नव्हती. मादम व्हेरड्युरीनला विनोदबुद्ध नव्हती, मादम ओबेरनॉनला होती. परंतु तिचे 'जोक्स' नेहमी तिचीच खिल्ली उडवण्याला कारणीभूत होतं हे तिच्या कधी ध्यानी येत नसे.

प्रूस्तची आणखीन एक नामांकित यजमानीण होती, मादम आर्मां द कोईल्लावेट. तिच्या सँलाँमध्ये आपल्याला प्रथम कुणी नेलं होतं हे प्रूस्तला कधीच आठवत नसे. १८८९ च्या उन्हाळ्यात बहुधा तो तिच्या वर्तुळात दाखल झाला होता आणि नवागताचं ती जसं नित्य स्वागत करत असे तसंच तिनं त्याचं स्वागत केलं होतं, "इथं तुला शिकायला मिळेल त्याचबरोबर मौजमजा करायलाही." आनातोल फ्रांसशी तिनं त्याचा परिचय करून दिला होता. पंचेचाळीस वर्षाच्या या लेखकाचं त्यानं कल्पनेत जे चित्र रंगवलं होतं त्याहून प्रत्यक्षात तो अगदी सामान्य निघाल्यानं त्याची घोर निराशा झाली होती. कल्पना आणि वास्तव यांच्यामधील त्या विभिन्नतेमधून बेरगोट्टची व्यक्तिरेखा जन्माला यावयाची होती.

प्रूस्तची ही यजमानीण १८८९ मध्ये बेचाळीस वर्षांची होती. तिचा पत्ता होता : १२ आव्हन्यू होश : तिच्या बरोबरचा स्नेह तो काळजीपूर्वक वाढवत होता. तिच्या बरोबरचं त्याचं वागणं वेगळं होतं. कारण त्या बाईसाहेब आगळ्यावेगळ्या होत्या. धाक वाटावा अशी ती होती हे निर्विवाद. तिनं यश संपादन केलं होतं ते मोहकतेनं नव्हे वा विनोदबुद्धीनं तर जबर आत्मविश्वासात, कठोरपणानं, अमर्याद जोमानं आणि पोलादी इच्छाशक्तीनं. आयुष्यभर तिनं ही गुणवैशिष्ट्यं जोपासली होती. तिच्या बालपणी म्हणे तिचा धाकटा भाऊ भयंकर रडतो म्हणून त्याला खिडकीबाहेर फेकण्याचा तिनं प्रयत्न केला होता. आपल्या या कृत्याचं समर्थन करताना ती रोखठोकपणे म्हणाली होती, "तो नसता उपद्रव आहे." आपल्या नवऱ्याबरोबरचं तिचं वागणं याच पठडीला साजेसं होतं. ती मूळची ले ऑन्तीन लिप्पमान. १८६८ मध्ये सधन आल्बेर आर्माशी तिचं लग्न झालं होतं. आल्बेर उंचापुरा होता. घुमणाऱ्या आवाजातील त्याचं बोलणं, दंतविहीन हसणं आणि नासाग्रावरील चामखीळ ही त्याची व्यक्तिवैशिष्ट्य. त्याच्याबद्दल तिला कृतज्ञता वाटत असे, कारण त्याची खानदानी किताबत. लग्न झालं तेव्हा ती नुसती मादम आर्मा होती. त्यानंतर काही वर्षांनी तिच्या नवऱ्यानं आपल्या घराण्याच्या आडनावाची कायदेशीर जोड दिली होती आणि ती मादम आर्मा द कोईल्लावेट म्हणून ओळखली जाऊ लागली होती. जुगार खेळणं आणि विहार नौकांवरील सदरं लिहिण यांसारख्या आपल्या नवऱ्याच्या लहानसहान छंदांना प्रोत्साहन देण्याची तिची तयारी होती. परंतु स्वत:चं सामाजिक जीवन व स्वत:ची प्रेम प्रकरणं यात त्यानं नाक खुपसणं तिला नामंजूर होतं. त्याची दखल न घेताच तिची प्रेम प्रकरणं चालू होती. सर्वसाधारणपणे तो सोशिक होता. तथापि, एखाद्या वेळी त्यानं यदाकदाचित आवाज चढवला वा तमाशा केला

तर त्याला आज्ञाधारक कसं बनवायचं हेही ती जाणून होती. आपला मुलगा गास्ताँ याच्याशी ती वागत होती ती याच गुणवैशिष्ट्यांनी. त्याच्या शिक्षणावर तिची बारीक नजर होती. इथं दयामाया नव्हती. त्याला क्षणभराची उसंतही ती त्याला घेऊ देत नव्हती. आपलं उच्च उद्दिष्ट आणि सर्व गोष्टींमध्ये श्रेष्ठत्व संपादन करणं यांचा विसर तिनं त्याला कधी पडू दिला नव्हता. सुट्टीमध्ये तो तिच्यापासून दूर गेलेला असला, तिथून त्याची पत्रं आली की माँसाहेब ती पत्र लक्षपूर्वक वाचत होती, जणू काही ती पत्रं म्हणजे शैलीसंबंधीचे पाठ होते. एकदा तिनं लिहिलं होतं की त्याचं अलिकडचं पत्र कौतुकास्पद आहे. पण निर्दोष नाही. काही प्रमाणात ते एकसुरी आहे. 'शैलीबाबत सांगायचं त्यात थोडा रंग आलेला मला आवडेल. आपली अभिव्यक्ती सुगम करण्यासाठी आणि अलंकरणापासून तिला मोकळी करण्यासाठी आपल्यापाशी अजून बराच अवधी आहे. अलंकार शास्त्राचा सोस तारुण्यात शोभून दिसतो. थोडासा शातोब्रिआं वाचण्याचा प्रयत्न कर.' या धाकात मुलगा वाढला होता, तगला होता, कसं लिहावं हे शिकला होता, आपल्या आईच्या दिवाणखान्यातील प्रेक्षक खूष होण्याइतपत रंगतदार नाटकं लिहिण्यात त्यानं प्राविण्य मिळवलं होतं.

प्रत्येक मध्यमवर्गीय यजमानीणीला एक सुप्त आकांक्षा असते आणि त्या आकांक्षेची पूर्ती करण्याइतपत खंबीर व्यक्तिमत्वही त्यांच्यापाशी असतं. मादम द केइल्लावेट ही अशी बाई होती म्हणूनच एका साहित्यसिंहाला बंदिस्त करून तो स्वत:साठीच बाळगण्याचा किमया ती साध्य करू शकली होती. प्रत्यक्ष श्वापदांच्या राजा, अतुलनीय आनातोल फ्रांस तिच्या कब्जात सुखासुखी आला नव्हता. आपली प्रतिस्पर्धी यजमानीण मादम ओबेरनॉन द नेरव्हील हिच्यापासून १८८६ मध्ये तिनं त्यांला हासील केलं होतं. या दोघीजणी प्रथम भेटल्या होत्या १८७६ मध्ये. परिचय वाढत गेला होता, घनिष्ट मैत्री जुळून आली होता मादम ओबेरनॉन आपल्या या देखण्या मैत्रिणींची भलामण करताना म्हणायची, "हां, माझा स्वत:चा शोध आहे तो." परंतु मादम केईल्लावेटनं स्वत:चं सँलाँ सुरू करण्याचा निर्णय घेतल्यापासून या दोन मैत्रिणींमध्ये वितुष्ट आलं होतं. फ्रांसबरोबरच तिनं नाटककार तरुण धुआ, सॉरबॉनचा प्राध्यापक ब्रोचार्ड, समीक्षक ज्युले लमेय आणि नाटककार पेल्लराँ यांना आपल्या सँलाँमध्ये तिनं आणलं होतं फ्रांस वगळता इतर दोन्ही सँलाँमध्ये जात होतं. परंतु फ्रांसनं मात्र पुन्हा मादम ओबेरनॉनच्या सँलाँमध्ये कधीही पाऊल टाकलं नव्हतं.

मादम फ्रांस मादम केईल्लावेटच्या घरी काही वर्षं येत होती. तिचं येणं मादम केईल्लावेटनं सहन केलं होतं. मादम फ्रांस मूळची देखणी 'ब्लाँड'. काहीजण तर तिला फ्रांसची मुलगी समजत. पुढं ती अंगानं सुटली होती, घृणा येण्याइतपत तिचे दात वाकडेतिकडे झाले होते. आणि तिची उपस्थिती दहशत वाटावी अशी होती. ती जवळपास असली की फ्रांसचा थरकाप उडत होता, त्याचं तोवर बोलणं अधिकच तोतरं होत होतं. १८९२ च्या जूनमध्ये एक दिवस ती त्याच्या अभ्यासिकेत घुसली होती. तो 'युनिव्हेरसेल'

साठी लेख लिहित होता. त्याला उद्देशून तिनं एक शब्द उच्चारला होता. त्याला तो 'अर्वाच्य, अनुचित आणि निंदाव्यंजक, अपमानास्पद' वाटला होता. काहींच्या म्हणण्यानुसार तो शब्द होता; 'कॉक्यू' (Cocu). थोड्या वेळानं घराचा मुख्य दरवाजा बंद झाल्याचा आवाज कानी पडताच ती धावत खिडकीपाशी गेली होती. फ्रांस हातात शाईची दौत, लेखणी आणि अपूर्ण लेख घेऊन रूचालग्रिनच्या दिशेनं निघाला होता. २ ऑगस्ट १८९३ रोजी दोघांनी घटस्फोट घेतला होता. यात फ्रांसचा सर्वस्वी दोष नव्हता हे निर्विवाद, परंतु बेरगोट्टच्या संदर्भात प्रूस्तनं लिहिलं आहे की 'त्याच्या बायकोशी तो निदर्यपणे वागला होता.' इत:पर फ्रांस मादम केईल्लावेटच्या घरी जेवत होता, दिवस घालवत होता. रोज सकाळी त्याच्या ब्रह्मचारी मठीत दोघंही रतीसुख उपभोगत होते आणि लंचसाठी तिच्या घरी येत होते. चहापानाच्या समयी तो दिवाणखान्यात प्रवेश करत होता आणि म्हणत होता, "तुझ्या दारावरून चाललो होतो आणि तुझ्या चरणी माझी आनंददायी आदरांजली वाहाण्याचं सुख मिळावं या इच्छेला मी आवर घालू शकलो नाही." परंतु, प्रत्येकाला ठाऊक असायचं की दुपारभर तो लायब्ररीतच लिहित बसलेला होता. प्रूस्तच्या कादंबरीत हा प्रसंग मॉँसिअ द नोवपेस (Novpais) आणि मादम द व्हीलपारीसिस यांच्या संदर्भात वर्णिलेला आहे.

आनातोल फ्रांस भेदरट होता, आळशी होता, महत्वाकांक्षी तर अजिबात नव्हता. परंतु त्याला थोर लेखक करण्याच्या इर्षेनं मादम केईल्लावेटनं चंगच बांधला होता. तिनं त्याचा आत्मविश्वास जागवला, त्याला कष्टाळू बनवला आणि ख्यातनाम बनवला. पण तिनं त्याला थोर केलं? अठराशे नव्वदमधील एक दुय्यम दर्जाचा कादंबरीकार म्हणूनच तो गणला जात होता. प्रूस्तत आपल्या कादंबरीत बेरगोट्टचं पालकत्व मादाम केईल्लावेटला नव्हे तर स्वानची पत्नी ऑडेट्ट हिला बहाल केलं आहे. बेरगोट्ट प्रत्येक दिवस मादाम स्वानच्या घरी घालवत असतो. आणि तिचं सॅलॉँ त्याच्या भोवतीच उभारलेलं आहे. एका मातबर पाव्हण्याच्या कानात ती कुजबुजते, 'मी बोलेन त्याच्याशी, एखादा लेख लिहिल तो तुझ्यासाठी.' असा प्रवाद होता को त्याच्या कामात तिच्या सहभाग असतो; आणि निवेदक सांगतो आपल्याला की 'मादाम स्वानच्या सॅलॉँचे लावण्य आणि बेरगोट्टच्या कामाचा एक संपूर्ण पैलू यांच्यात एवढं निकट साहचर्य आहे की त्यातील एक आळीपाळीनं दुसऱ्यावरील भाष्य बनू शकेल.' अर्थात् हे लिहताना प्रूस्तच्या नजरेसमोर फ्रांस व मादाम केईल्लावेट होती हे नि:संशय.

मादाम केईल्लावेटच्या रविवार-दुपारचा दरबार खास असे. भोजनानंतर फ्रान्सचे राजकारणी, वृत्तपत्रकार, लेखक, प्रकाशक, बुद्धिवादी पुढारी यासारखे बुजुर्ग एकत्र जमत. ही मंडळी जमू लागेस्तोवर फ्रांस डुलकी घेत असे. यजमानीणीचा नवरा अशोभनीय लांबीरुंदीचा विचित्र गळपट्टा घालून दिवाणखान्यात वावरत असे. दंतहीन हास्य करत, गडगडत अभिवादन करत. आपल्या बायकोच्या पाव्हण्यांमध्ये एखादा नवा चेहरा त्याला आढळला तर, त्याच्यापाशी

जाऊन म्हणे, "मी आनातोल फ्रांस नाहीये हां" किंवा स्वत:ची ओळख करून देई, "मी मालक, म्हणजे मला म्हणायचंच, या घराचा." त्याची पत्नी मात्र छानछोकी पोषाखात अलंकारांनी नटलेली एका प्रशस्त खुर्चीत बसून ती पाव्हण्यांचं स्वागत करत असे. डुलक्या घेणारा थोर माणूस ठरल्या वेळी जागा व्हायचा, जिने उतरून खाली दालनात प्रवेश करायचा आणि जमलेल्या मंडळीचं बोलणं बंद व्हायचं. खूर्च्या आदरानं मागं सरकवल्या जायच्या. तो मादमपाशी जाई. हातातील पाच फ्रँकचा जांभळ्या रंगाच्या सुवासिक फुलांचा गुच्छ उंचावून त्याचं चुंबन घेई आणि स्वत:च्या हृदयावर ठेवून नंतर माथा झुकवून तो गुच्छ तिला नजर करत असे. ती म्हणे, "शेकोटी लगतच्या तुझ्या जागेवर जाऊन बैस, म्हणजे प्रत्येकाला ऐकू जाईल." तिच्या सूचनेबरहुकूम तो आसनस्थ होई, संगमरवरी दर्शनी चूल-फळीवर वाके आणि एखादं स्वगत चालू करी. त्यादिवशी सकाळी बाईसाहेबांसमोर रिहर्सल केलेल्या स्वागतांपैकी एखादं. त्याच्या हालचाली औपचारिक आणि त्याचा आवाज स्निग्ध. त्याचं स्वगत अविश्रांत, अखंड चालू. अधूनमधून दाढी कुरवाळणं किंवा बोटांनी पाव कुस्करल्यागत डाव्या हाताच्या हालचाली. अतिशय भारावला की रूमाल काढून नाक शिंकरणं. प्रसंगोपात्त यजमानीण दाद देण्यासाठी नेत्रसंकेत करी, वेळप्रसंगी त्यानं थांबू नये म्हणून सुचवे, सांगे, "ती गोष्ट सांगना आम्हाला, काल ती मी किती एन्जॉय केली होती." तो 'क्यू' घेऊन तो पूर्वीप्रमाणं, पूर्वीच्याच आवाजात कथेला प्रारंभ करी. यजमानीणीला वाटलं का, बस्स, झालं तेवढं पुरे, की मग अनौपचारिक संभाषणाला ती अनुमती देई. वातावरण मोकळं, सैल होई. आपल्या कामगिरीतून मुक्त झाल्यावर तो थोर माणूस फ्रांस नामवंत पाव्हण्यांबरोबर गप्पागोष्टी करत बसे किंवा देखण्या बायांच्या मागून दालनभर हिंडे. अशा प्रसंगी औपचारिकपणा बाजूला सारी, यजमानीणीच्या रागीट नेत्रकटाक्षाकडे दुर्लक्ष करी आणि पुन्हा एकवार तो जसा होता तसा होई – सौहार्द्र पूर्ण माणूस, पवित्र गोष्टींची खिल्ली उडवणारा आणि चावट.

लंच आणि डिनरच्या वेळी दरबार छोटासा, आटोपशीर असे. साहजिकच स्वगतं काहीशी प्रभावी होत. नामवंताचा आणि प्रूस्तसारख्या कौटुंबिक स्नेह्यांचा फ्रांसभोवती गराडा पडे. त्याच्या मिस्ट्रेसला त्याच्या वागणुकीतील जी न्यूनं घालवण्यात अपयश आलं होतं तिचा शोध प्रत्येकाची नजर घेत असे. प्रश्न विचारण्याची या समयी मुभा असे. प्रूस्तनं एकदा विचारलं, "मॉसिअ फ्रांस, तुम्हाला केवढी तरी माहिती आहे, कशी जमवता तुम्ही ती?" तो थोर माणूस उद्गारला, "फार सोपं आहे ते मार्सेल, माझ्या लाडक्या. मी तुझ्या वयाचा होतो तेव्हा तुझ्यासारखा सुंदर नव्हतो, सामाजिक प्रतिष्ठाही नव्हती, समाजात जाण्याऐवजी मी घरी वाचत बसायचो वाचन मी कधीच थांबवलं नाही." बेरगोट्टचे हे प्रसिद्ध उद्गार फ्रांसच्या मुखावाटे बाहेर पडले होते हे नि:संशय, त्यायोगे मनाचं सुख प्रूस्तच्या

आजारपणाची भरपाई करणार होतं, "सामान्य माणसाचा आनंदी आचरटपणा आणि पोकळ अनुभव यांच्या खातीर बुद्धीमत्तेच्या पीडादायक सुखांचा विनिमय मी करणार नाही." परंतु मादाम केईस्लावेटच्या घरी फ्रांस प्रूस्तला म्हणाला होता, "मार्सेल, बुद्धीमत्तेवर तुझं फार प्रेम दिसतं?" त्याला अडवून तरुण मित्र म्हणाला होता, 'बौद्धिक गोष्टींवर माझं अजिबात प्रेम नाही; माझं प्रेम आहे फक्त जीवनावर आणि गतीवर."

बेरगोट्टचा निवेदकावर प्रभाव आहे तसाच फ्रांसचा प्रभाव प्रूस्तवर होता का? फ्रांसचे बरेच विषय– गोचर जगाची अवास्तवता, ज्यात केवळ अस्सल वास्तव दडलेलं असतं अशी गतकाळाची काव्यात्मक प्रवृत्ती, दुसरी व्यक्ती जाणून घेण्यातील अशक्यता, स्व, भावना आणि स्मृती यात सतत होणारे बदल – 'आ ला रशार्श'– मध्ये आढळून येणार होते. त्याच्या शैलीचा प्रभाव प्रूस्तच्या प्रारंभीच्या कथांवर दिसतोच पण 'आँ सान्तेय'वरही दिसतो. बेरगोट्टच्या कृतीमध्ये 'पुनप्राप्त काळा'ची झलक निवेदकाला मिळाली होती. त्यातून त्याला आनंद लाभला होता." मला वाटलं, माझ्या स्वत:च्या एका गहन, विशाल, अधिक एकात्म अशा प्रदेशामधून सारे अडथळे आणि विलगता दूर करण्यात आली आहे." एखाद् दुसरं वर्ष समकालीन कादंबरीकरांमध्ये. त्याचे आवडते दोन कादंबरीकार होते : फ्रांस आणि लोटी. फ्रांसविषयीचा त्याचा आदर कधी ओसरला नव्हता आणि त्याच्या जागी त्यानं दुसऱ्या कुणाची स्थापनाही केली नव्हती. परंतु फ्रांसच्या प्रभावाबाहेर तो पडला तेव्हा तो वळला पूर्वीच्या श्रेष्ठ लेखकांकडे : बाल्झाक, स्तांधाल, फ्लॉबेर, टॉलस्टॉय, डोस्टेएवस्की, जॉर्ज इलियट, हार्डी यांच्याकडे आणि सर्वात शेवटी स्वत:कडे, कारण तोवरं बेरगोट्टचं अस्तित्व नुरल्यामुळे अखेरचा आसरा म्हणून त्याला स्वत: बनणं भाग होतं. फ्रांस हा केवळ एक हयात कादंबरीकार होता, ज्याला तो भेटला होता आणि ऐन तारुण्यात ज्याच्याविषयी त्याला अत्यादर होता आणि कृतज्ञता. म्हणून बेरगोट्टचं स्वभावचित्र त्यानं रेखाटलं होतं. परंतु बेरगोट्टची महात्मता त्याला शोधून काढावी लागली होती. त्यासाठी फ्रांस किंवा त्याच्या काळातील अन्य फ्रेंच कादंबरीकर यांच्याहून उच्च श्रेणीची वाङ्मयीन महात्मता त्याला संपादन करावी लागली होती.*

सांप्रत, फ्रांसबद्दलचा प्रूस्तचा आदर पराकोटीचा होता आणि कालांतरानं त्याचं इनाम त्याला मिळालं होतं – 'ला एतुई द नाक्र' – मधील अर्पणपत्रिका आणि तो लिहीत असलेल्या 'ला लिस रुज' या कादंबरीच्या प्रगतीबद्दल त्याच्याकडून वेळोवेळी मिळणारे वृत्त. हा लाभ प्रूस्तच्या लेखी अभिमानास्पद होता. 'ला लिस रुज' ही कादंबरी हा मादाम केईल्लावेटच्या संकल्प होता. तिनं ठरवलं होतं की व्यभिचाराची चटकदार कहाणी लिहून फ्रांसनं आता उच्चभ्रू समाजाबद्दलचं ज्ञान लोकांपुढं प्रदर्शित करायला हवं. 'मला त्या समाजातील माणसांविषयी काहीही माहीती नाही." ही सबब पुढं करून फ्रांसनं तिला वाटाण्याच्या अक्षता लावण्याचा प्रयत्न केला होता. परंतु आपल्या निश्चयाशी ती ठाम

राहिल्यामुळं फ्रांसचा निरुपाय झाला होता. त्यानं तिला विनंती केली होती की या कामी तिला शक्य होईल तेवढी मदत तिनं करावी. हे काम तिनं एवढं मनावर घेतलं होतं की ती सामग्री जमवत होती, त्यानं 'मॉडेल' म्हणून वापर करावा अशी माणसं निवडून काढली होती, उचित असं वातावरण, परिसर निवडून काढला होता. त्यातील मुख्य प्रसंग तिनंच ठरवला होता : ऑपेरा. कारण, तिला वाटत होतं की प्रेम जाहिररित्या व्यक्त करण्यासाठी 'बॉक्स' सारखं उत्कृष्ट स्थळ अन्य नाही आणि त्याला संगीताची साथ म्हणजे दुग्धशर्करा योग. फ्रांस म्हणाला होता, 'पण मी ऑपेरा कधी पाहिलेला नाही.' त्यावर खांदे उडवून तिनं विचारलं होत, "वाळवंटातील धार्मिक स्थळी कधी तरी गेला आहेस का तू?" नायिकेच्या बाबतीतही बहुधा अडचण उद्‌भवली होती पण फ्रांसनं ती समस्या मादाम द केईल्लावेट हिला समोर ठेवून स्वत:च सोडवली होती. त्यासाठी तिचे गाऊन आणि जडजवाहीर त्यानं नायिकेच्या अंगावर चढवले होते. ती केशभूषेत वापरत असलेला बाणही त्यानं नायिकेच्या केसात खोवला होता. धीमेधीमे कथानक साकारत होतं आणि प्रूस्त भोजनाला आला असता मादाम नेहमीच त्याला सांगत होती. 'कादंबरी पुढं सरकत आहे.' भोजनानंतर ती त्या थोर माणसाला त्याच्या कादंबरीमधील उतारे वाचून दाखवण्याचे आदेश देत होती आणि यशोचित जागा देण्यासाठी श्रोत्याला नेत्रसंकेत करत होती.

'ला लिस रुज' पूर्ण होण्या आधीच, जिच्यामध्ये प्रूस्तला गाढ आस्था होती त्या व्यक्तीशी पुन्हा संबंध जोडले गेले. ती व्यक्ती म्हणजे जान्नपूक्वे. तिचा गास्तांशी विवाह झाला होता. आपल्या दिलाचे हजार तुकडे झाल्याचा बहाणा करत त्यांच्या विवाहाला हजर राहण्याचं त्यानं टाळलं होतं. त्यानंतर ते तरुण जोडपं फ्रांस आणि मादाम द केईल्लवेट इटालीच्या सहलीला निघाली असताना तिच्यात सामील झाली. इटालीला मादाम कादंबरीसाठी लेखनसामग्री जमवणार होती. या सफरीचा इत्थंभूत वृत्तांत पुढं प्रूस्तच्या कानावर वेळोवेळी येत राहिला:- मादाम न थकता प्रेक्षणीय स्थळांना कशी भेटी देत होती, त्या थोर माणसाच्या भोजनाची पर्वा न करता प्रत्येक ठिकाणी ती सर्वांना कशी ओढून नेत होती, कागदांच्या चिठोऱ्यांवर नोंदी करून ती आपल्या बॅगेत कशी कोंबत होती; तरुण मादाम गास्ताँ द केईल्लावेटच्या सहवासात फ्रांस कसा खुलत होता, तिच्या कशा खोड्या काढत होता, तिला मादमोझेल कसा म्हणत होता; फ्लॉरेन्समध्ये एका बुटांच्या दुकानासमोर ते कसे थांबले होते, तिथं तिला आणि चांभाराला कादंबरीत घालायचं आश्वासन त्यानं कसं दिलं होतं, वगैरे वगैरे. अखेर कादंबरी पूर्ण झाली. ती वाचून झाल्यानंतर प्रूस्तला आढळून आलं की तिनं स्मृतींना जाग आणली होती, फ्रांस आणि मादाम द केईल्लावेट यांच्याच केवळ त्या स्मृती नव्हत्या, तर त्या देखण्या मुलीच्या, मादामच्या सूनेच्याही, जिच्या प्रेमात आपण अद्यापिही आकंठ बुडालेले आहोत असा विचार अधूनमधून मनात घोळवणं त्याला आवडत होतं.

आपलं लिखाण प्रसिद्ध करणं शक्य व्हावं यासाठी एक नियतकालिक सुरू करण्याचा निर्णय प्रूस्त आणि त्याचे काही मित्र यांनी १८९२ च्या प्रारंभी घेतला. प्लेटाचे स्मरण म्हणून त्यांनी त्याचं नाव ठेवलं. 'ल बानक्वेत'. त्याच्या मुखपृष्ठासाठी निळा आणि 'टायटल' साठी जांभळा हे रंग त्यांनी निवडले. या उपक्रमासाठी प्रत्येकानं दरमहा दहा फ्रँक द्यायचे असं ठरलं. या ग्रुपमध्ये फेरनांद ग्रेग, दानिएल हालेव्ही, जाक बिझे, रॉबटे ड्रायफस, लुई द ला साल आणि प्रूस्त एवढे जण होते. यातील बरेचसे ज्यू होते, 'लिसे कॉंदोसे'चे पदवीधर होते, मादाम स्ट्रॉसचे नातेवाईक वा 'प्रोटझ' होते. परंतु या व्यतिरिक्त त्यांच्यात समान असं काही फारसं नव्हतं. प्रतिकवादाचा अस्फूट तिरस्कार हा बहुधा अपवाद. एखादी चळवळ सुरू करावी वा एखादा संप्रदाय प्रस्थापित करावा यात यापैकी कुणालाही स्वारस्य नव्हतं. रॉथशिल्ड या बिझेच्या मित्रामार्फत 'पासाज चॉईसल' मधील रॉक्वेट्ट या पुस्तक-विक्रेत्याच्या दुकानावरील एक खोली मिळवली. इथं ते एकत्र जमत. प्रूस्त, हालेव्ही आणि ड्रायफस यांची संपादक म्हणून निवड झाली. परंतु या संपादक– मंडळाकडून काही प्रगती होत नाहीसे पाहून संपादनाची सूत्रं ग्रेगनं स्वत:च्या हातात घेतली. नियतकालिकाला अमाप यश लाभलं नाही– त्याचं सर्क्युलेशन ४०० प्रतीपुरतं मर्यादित होतं– परंतु अल्पकाळात त्याचा चांगलाच गाजावाजा झाला. आणखीन काही उत्साही तरुण त्यात सामील झाले. त्यापैकी एक होता भावी नाटककार रॉबर्ट द फ्लेर, 'ल फ'चा भावी लेखक आंरी बारब्यूस, आणखीनही एक होता लेऑं ब्लम, फ्रांसचा भावी पंतप्रधान.

'ल बानक्वेत'मधील प्रूस्तचं वाङ्मयीन योगदान फारसं लक्षात राहण्याजोगं नव्हत त्यातलं बरचसं फुटकळ होतं – छोट्या आख्यायिका अगर निबंध किंवा परीक्षण थोडक्यात, नियतकालिकासाठी मजकूर पुरवण्यासाठी लेखकानं झरलेली लेखणी. शिवाय, ते सारं अशा शैलीमध्ये लिहिलं होतं, जणू काही लेखक तूर्त स्वत:च्या उपजत वाङ्मयीन कमकुवत-पणाला वाट मोकळी करून देत होता. याचं उत्तम उदाहरण म्हणजे सिदालीसची व्यक्तीरेखा, एका पार्टीनंतर रेखाटण्यात आलेली. या पार्टीत एक प्रख्यात लावण्यवती प्रूस्तच्या नजरेला पडते. तिचं नाव कॉंप्लेस्स द मेल्ली नसले. (पुढं ती जॉं द रसझ्के बनली) प्रूस्तची सिदालीस काहीशी भ्रमनिरास झालेली रूपवती आहे. परिणामी तिच्या हरेक गोष्टींवरील, अगदी तिनं घातलेल्या पोषाखावरीलही दिमाख विटलेला दिसत असे. तथापि, ती अत्यंत देखणी आहे. तिचे पिंगट सोनेरी केस एखाद्या नाजूक सोनेरी शिरस्त्राणासारखे आहेत. वाटतं, तिच्या डोळ्यांनी 'प्रभातीची आणि वसंतातील प्रारंभीच्या दिवसातील खळाळत्या पाण्याची शुभ्रता' शोषून घेतलेली आहे. प्रूस्त सांगतो, 'मला तुला बघायला आवडेल, तुझ्या हाती एखादं प्राचीन काचपात्र किंवा घमंडी आणि खिन्न घाट असलेलं एखादं चंचूपात्र, तूर्त आमच्या म्यूझिमयमध्ये कुचकामी दिमाखात रिक्त असलेलं कोरडं ठणठणीत बाउल.' सांप्रत यांची

शान गेलेली असली तरी कोण्या एके काळी तिच्यासारखेच तेही व्हेनेशियन सणासुदीला टवटवीत हर्षागत असत. 'त्याच्या फेसाळल्या आणि अभ्राच्छादित ग्लासांच्या नितळ धारात व्हायोलेट आणि गुलाबं तरंगत असल्यासारखं अजूनही वाटतं.'

या उताऱ्यात व्यक्तिवैशिष्टय अल्प आहे, निवेदनामध्ये स्वास्थ्य असल्याचंही जाणवत नाही. एकच गोष्ट त्याच्या लिखाणात ठळकपणे दृष्टोत्पत्तीस येते आणि ती म्हणजे तो अद्याप तत्वज्ञ दार्लूचा कडवा शिष्य आहे. तो सदैव विचारवंताची, भाष्यकाराची भूमिका घेताना दिसतो. त्याचा मतलब असतो विचाराशी किंवा ज्याचं वर्तन विचार स्पष्ट करण्यास कारणीभूत होतात अशा व्यक्तींशी. एका स्फुटात एका मासलेवाईक सोसायटी - महिलेचं त्यानं विश्लेषण केलं आहे. आपल्याहून थोडेसे 'स्मार्ट' असलेली लोकं तिला आवडतात व तेवढे 'स्मार्ट' नसलेल्यांविषयी तिला तिटकारा असतो. आपल्या बरोबरीच्या किंवा आपल्याहून बऱ्याच खालच्या थरातील लोकांशी तिची मैत्री जुळते. तिची सामाजिक जाणीव कार्यरत नसते. दुसऱ्या एका स्फुटात लेखक एक छोटी आख्यायिका सांगतो, केवळ सर्व साधारण विधानांचे दाखले देण्यासाठी. तो म्हणतो, 'महत्वाकांक्षेची नशा प्रसिद्धीहून अधिक असते. आकांक्षा सर्व गोष्टींची भरभराट करते, स्वामीत्व त्यांना कोमेजून टाकते, जीवनाचं स्वप्न रंगवणं हे जगण्याहून अधिक चांगलं.... जीवन हे छोट्या 'स्वीट हार्ट' सारखं असतं. आपण स्वप्न रंगवतो आणि त्याच रंगवण्यात आपण त्यावर प्रेम करतो. परंतु, ते जगण्याचा प्रयत्न आपण करता कामा नये. Violante ou La mondonite या आपल्या दीर्घ आणि महत्वाकांक्षी स्फुटामध्ये त्यानं सामाजिक जीवन आणि एकांतवास यातील भेद स्पष्ट केला आहे. तो म्हणतो की सामाजिक जीवन असतं क्षुल्लक, नीरस आणि कालांतरानं कंटाळवाणं, एकांतवास हाच फलदायी आणि समाधान करणारा असतो. यात सामाजिक जीवनाच्या वांझपणाबद्दल व्यक्त केलेली खंत ग्रेग आणि इतर सदस्य यांना मान्य होती परंतु त्याच्या काही इतर विवक्षित लिखाणबाबत मात्र ते फारसे उत्साही नव्हतं, त्यांना ते पसंत नसे. या लिखाणाबाबत प्रूस्तनं एक वेगळा दृष्टिकोण स्वीकारलेला होता आणि त्याच्या सहकाऱ्यांना वाटत होतं की त्यात आपली स्वतःची सामाजिक महत्त्वाकांक्षा फलद्रूप होण्यासाठी तो नियतकालिकाचा वापर करत आहे. उदाहरणार्थ, एका स्फुटात त्यानं कॉंप्तेस्स आधेयूम शेव्हीग्न हिचं वर्णन केलेलं होतं. या काळात मादाम स्ट्रॉस आदी यजमानीणींप्रमाणंच या कॉंप्तेस्सशीही सलगी वाढवण्याचे त्याचे प्रयत्न जारी होते, अगदी पूर्वीच्या मार्गांनीच. ही यजमानीण सुंदर होती, मोहक होती. या लावण्यवतीचा संचार अगदी निवडक वर्तुळात होता. हे जग होतं बड्या अमीरउमरावांचं आणि या जगाचा परिचय प्रूस्तला अद्याप व्हायचा होता. तिचा कृपालोभ संपादन करण्यात यश लाभलं तर त्या जगाचं दर्शन घडणं त्याला शक्य होणार होतं; थोरामोठ्यांशी जामपछान जुळून येणार होती. ते खानदानी विश्वच रोमहर्षक होतं.

पण प्रूस्तच्या दुर्दैवानं ही यजमानीण चाणाक्ष निघाली. तिच्याबद्दलची खडान्‌खडा माहिती मिळवूनही, तिच्या कृपाप्रसादासाठी तिच्या पायांवर लोटांगण घालण्याची तयारी असूनही, तिच्या घराच्या दारात प्रतीक्षा करूनही तिची गाठभेट होत नव्हती.

'ला बानक्वेत'मधील प्रस्तुत शब्दचित्र तिचं लक्ष वेधून घेण्याचा आणखीन एक उघडउघड प्रयत्न होता, हेतुपुरस्सर केलेली ती प्रशस्ती होती. एखाद्या प्रख्यात सोसायटी–पेंटरच्या कुशलतेनं तिची गूढरम्य मोहिनी शब्दबद्ध करण्याचं आव्हानं प्रूस्तनं पेललं होतं. त्यानं मान्य केलं होतं की तिचं लावण्य आदर्श सौंदर्याचा नमुना नाही, तिचं नाक नको तितकं लांब आणि अतिशय बाकदार आहे, तिची त्वचा फारच नाजूक आहे आणि तिचा वरचा ओठ अतिशय पातळ आहे. परंतु तिच्या माथ्याच्या आकारात, तिच्या नेत्रकटाक्षातील ठामपणात आणि तिच्या नाकाच्या रेखेत, त्यानं पाहिली होती एक नाजूक नजाकत, इतर कुठल्याही सोसायटी– लावण्यवतींमध्ये न आढळून येणारी. तिचा दिमाख एखाद्या रुबाबदार पक्ष्यागत होता. थिएटरमधील आपल्या 'बॉक्स'मध्ये बसल्याचं वर्णन करताना तो सांगतो : तलम 'शुभ्र पोषाख, लांब शुभ्र हातमोजे. एका हातावर मस्तक रेललेलं. दुसरा हात 'बॉक्स'च्या कठड्यावर विसावलेला आणि नाजूक शुभ्र पिसांगत तिच्यासमोर झुळणारा पिसापिसांचा पंखा. तिची मुलं आणि तिचे पुतणे यांच्यामध्येही तिच्याच सारखी पक्ष्यागत ठेवण असल्याचं त्याला जाणवलं होतं : त्याला वाटल होतं, देवता आणि पक्षी यांच्या संयोगातून हे घराणं निर्माण झालं असावे.

हे स्फूट काही वर्षानंतर ऑपेरा पाहात असलेल्या डचेस द गॅर्मांत हिच्या सुप्रसिद्ध वर्णनात जडवण्यात येणार आहे हे मादम द शेव्हीग्न या वेळीच पाहू शकती तर कदाचित ती खूष झाली असती. परंतु आता या शब्दचित्राचं तिनं थंड स्वागत केलं होतं. कारण, शक्यता आहे, एका अप्रसिद्ध नगण्य मासिकात सामाजिक प्रतिष्ठेसाठी हपापलेल्या कुण्या एकानं आपल्याविषयी लिहिलं आहे याची पर्वा तिला नसावी. शक्यता आहे, आपल्या कुळाच्या मूळासंबंधी देण्यात आलेल्या संदर्भानं ती व्यथित झाली असावी. कारण, ती जन्मानं साद होती. या कुळात पेट्रार्कची लॉराच जन्मली नव्हती तर अलीकडच्या काळात नावही घेऊ नये असा मार्क्विस द सादही जन्माला आला होता. त्याची खळबळजनक करीयर आणि अनैसर्गिक संभोगाबद्दलची त्याची कुप्रसिद्ध आवड लक्षात घेता, प्रूस्तचं मतप्रदर्शन, त्यातील संदिग्धपणा आणि बटबटितपणा यामुळे ते बाईसाहेबांना अप्रस्तूत वाटले असण्याची शक्यता आहे. त्या बाईसाहेबांना काय वाटले असेल ते असो, ग्रेग मात्र चिडला होता. 'ला बानक्वेत' हे सोसायटी जर्नल नव्हतं. सुंदर स्त्रियांची खुषामतपर स्फुटं छापण्यास त्याचा विरोध होता. मात्र यावेळी स्वत:च्या मतांना मुरड घालून त्यानं हे स्फूट स्वीकारलं होतं. परंतु प्रूस्तनं तसंच एक स्फुट जेव्हा पुन्हा एकवार प्रसिद्धीसाठी पाठवली तेव्हा ग्रेगनं त्याला एक खरमरीत चिठी जोडली होती : 'ला बानक्वेत' मध्ये व्यक्त झालेल्या मताशी

माझा संबंध नाही.'

तथापि, अशा प्रकारची खुषामत करणारी स्फुटं प्रूस्त बहुधा लिहीत असावा वा तशीच आणखीन लिहिण्याचा त्याचा मानस असावा. मादाम स्ट्रॉसचा रोष ओढवून घेण्याची धास्ती नसती तर तिचंही तपशीलवार शब्दचित्र त्यानं निश्चितच रेखाटलं असतं. ते मासिकात रेखाटलं गेलं नसलं तरी त्यानं तिला लिहिलेल्या पत्रांमधून मात्र ते आपल्यासमोर ठसठशीपणे उभं राहातं. आपलं तिच्यावरील प्रेम यत्किंचितही ओसरलेचं नाही हे पुनः पुन्हा तिच्या निदर्शनास आणून देणं हा त्याचा अंतस्थ हेतू होता. एका पत्रात त्यानं लिहिलं होतं, "सुरूवातीला मला वाटलं होतं की तुम्हाला फक्त सुंदर गोष्टी आवडतात आणि तुम्हाला त्यांच्याबद्दल खरोखरीच आस्था आहे – आणि नंतर माझ्या लक्षात आलं की तुम्हाला त्याबद्दल यत्किंचितही फिकीर नसते आणि आता तर मी बघतो की लोकांबद्दलही तुम्ही बेपर्वा आहात: माझी खातरजमा झालेली आहे की जीवनाचा एक विवक्षित प्रकार तुम्हाला आवडतो ज्यात तुमच्या कोटीबाजाहून तुमची बुद्धिमत्ता, तुमच्या चातुर्याहून तुमचा कोटीबाजपणा आणि तुमच्या बुद्धिमत्तेहून, तुमच्या चातुर्याहून तुमचा कोटीबाजपणा आणि तुमच्या पेहरावातून तुमचं चातुर्य कमी प्रमाणात निदर्शनास येतं." दुसऱ्या एका पत्रात त्यानं लिहिलं होतं,"तुम्हाला वाटतं, घनिष्ठ मैत्रीमुळं आपल्यातील गोडव्याची उधळपट्टी केली जाते, आणि माझा विश्वास आहे, तुमचं बरोबर आहे. परंतु तुमच्याबाबतीत काय घडतं ते मी तुम्हाला सांगणार आहे.... एखादी व्यक्ती तुमच्याशी पुस्तकांविषयी बोलते तेव्हा तुम्हाला ते पुस्तकी पांडित्य वाटतं, तुमच्याशी ती लोकांविषयी बोलते जर का त्यात गप्पा असतील तुम्हाला तो विवेकशून्य वाटतो. आणि चौकस (जर का तो प्रश्न विचारत असेल); तो तुमच्याविषयी बोलतो तेव्हा तुम्हाला तो हास्यास्पद वाटतो. असं शेकडो वेळा घडल्यानंतर तुमच्यात गोडवा नाही या निष्कर्षाप्रतत तो पोचणार तोचं अचानक त्याच्यावर छोटीशी मेहरबानी करता, मासवता तुम्हाला तो थोडाफार आवडतो आणि तो पुन्हा तुमच्या भजनी लागतो. परंतु *"प्लॅटॉनिक प्रेमात बऱ्याच सवलती द्याव्या लागतात."* या सत्याचं तुम्हाला पुरेसं भान नाही. (एखाद्या तरी सत्याचं भान तुम्हाला आहे याविषयी मी साशंक आहे) अगदी संवेदना शून्य असलेली व्यक्ती प्लॅटॉनिक प्रेमात पडताच आश्चर्यकारकरित्या संवेदनाशील बनते." वगैर वगैरे.

खुषामतपर लिखाण चालू असतानाच प्रूस्त एका पत्रात्मक कादंबरीवर काम करत होता. यात त्याच्या तीन सहकाऱ्यांचाही सहभाग होता. प्रत्येकावर वेगळ्या वेगळ्या पात्राची जबाबदारी सोपवण्यात आली होती. ग्रेगच्या वाट्याला एक कवी, हालेव्हीच्या एक मठाधिपती, ला सालच्या ऐहिक माणूस आणि प्रूस्तच्या एक तरुण स्त्री या अफलातून प्रयोगाचा एकही भाग आज उपलब्ध नाही. शक्यता आहे, त्यात फारशी प्रगती झालीही नसेल !

साहित्याच्या ओढीहून उच्चभ्रूंच्या दिवाणखान्यात प्रवेश मिळवण्याची चिंताच प्रूस्तला अधिक होती या त्याच्या मित्रांच्या आक्षेपात तथ्य असलं, त्याच्या लिखाणात वाङ्मयीन गुणवत्ता फारशी आढळत नाही हे विधान वावगं नसलं तरीसुद्धा त्यात 'आ ला रशार्श' ची बीजे आढळून येतात, भले ती बीजे भावी वृक्षाहून भिन्न असतीलही. एव्हाना, प्रूस्त जीवनाविषयीचा त्याचा अनुभव वैश्विक सत्याचं एक लक्षणार्थी दर्शन म्हणून वापर करण्याचा प्रयत्न करत होता. इथं मादाम हेमन हेल्डेमॉन ही वारांगना आहे, मादाम स्ट्रॉसही अशी बाईसाहेब आहे जिची बुद्धिमत्ता अस्फुट दिमाखानं प्रकटते, मादाम द रोव्हीग्न पक्षी-देवता आहे. इथं लष्करी जीवनाचं ओझरतं दर्शन आहे, एका छोट्या छोकरीच्या प्रेमासाठी खिडकीमधून उडी घेणारं एक मूल आहे, नॉर्मंडीचे समुद्रकिनारे आहेत. शेवटच्या दोन आठवणी १८९२ च्या ऑगस्टमधील आहेत. या काळात तो सुट्टीवर बाल्बेकला गेला होता. इथंच आल्बेरतीनशी त्याची भेट झाली होती. आल्बेरतीन म्हणजे 'ला बानक्वेत' मधील प्रूस्तचा सहकारी होरेस फिनल याची बहीण मारी हिच्यावर बेतलेलं कादंबरीमधील एक पात्र. मारीचे वडील ह्युगो फिनले, एक धनिक बँकर. फिनले पिता-पुत्र कादंबरीमध्ये ब्लोख पितापुत्र म्हणून आलेले आहेत. फेरनांद ग्रेगनं या पिता-पुत्राची तुलना हॅम्लेट आणि पोलिनियसशी केली होती आणि मारीला ऑफेलिया बनवली होती. मारी दिसायला सुंदर होती. चेहरा काहीसा निस्तेज घडीत आनंदी तर घडीत गंभीर ग्रेग सांगतो, 'आम्ही सारेच मारीच्या कमी अधिक प्रेमात होतो' आणि तो (प्रूस्त) आणि लोभस मेरी याचं एकमेकांवर बालकांगत प्रेम होतं. स्त्रीकडून प्रेमात प्रतिसाद मिळण्याचे प्रसंग प्रूस्तच्या आयुष्यात दुर्मिळ. हा त्यापैकीच एक दुर्मिळ योग. 'ले प्लेझिर ए ले जूर' मधील 'मूनलाइट सोनॅटा' या कथेमध्ये मारी फिनलेविषयीचं त्याचं चुटपुटतं प्रेम सूचित करण्यात आलं आहे. तिचं प्रेम हे त्याच्या जीवनातील महत्त्वाची बाब निश्चितच नव्हती तरी त्या प्रेमाचा 'आ ला रशार्श' वरील प्रभाव लक्षणीय आहे. त्याच्या जीवनातील स्थळकाळामधील तिचं स्थान त्याच्या कादंबरीतील आल्बेरतिनच्या स्थळकाळाशी मिळतं जुळतं आहे. मारीबरोबरच्या प्रेमसंबंधानं त्याच्या आयुष्याला एक नवीन वळण दिलं होतं. मादम द रोव्हीग्नच्या बाबतीत आलेल्या अपयशानंतर तो पुन्हा कधीही वयस्कर स्त्रीच्या प्रेमात पडला नाही. १८९३ च्या वसंतात सुटकेचा श्वास सोडत आणि आनंदित होत्साता, त्याच्यासमोर आता उघडा झालेल्या एकमेव मार्गाची वाट त्यानं धरली होती. मारी द बेनार्डकीपासून मारी फिनलेपर्यंतच्या आयुष्याचा वाटचालीत हा मार्ग तो आतापावेतो धुंडाळत होता. तो मार्ग Cities of the plain च्या खोल दरीप्रत घेऊन गेला होता. जी हिरवीगार आणि सुपिक होती, स्वर्गीय अग्नीनं अद्याप तिला स्पर्श केलेला नव्हता.

---

'मैत्रीचे रूपांतर प्रेमात होते, पण प्रेमाचे रूपांतर मैत्रीत कधीही होत नाही.

**–कोस्टन**

# स. न. वि. वि.

## पुन्हा एकदा लॉर्का

- जयश्री जुन्नरकर

संपादक तपशील यांस

स. न. वि. वि.

तपशीलच्या बाराव्या अंकात आपण अनवधानाने एक चूक केली आहे वा ती 'संपादकीय डुलकी' असावी. 'रात्र व धुके' हा लेख मी लिहलेला आहे. आपण तो डॉ. मंगला सरदेशपांडे यांच्या नांवावर दाखविला आहे. ही चूक होण्याचे कारणही माझ्या ध्यानात आलेले आहे. याच्या अगोदरच याच लेखकावरचे दोन लेख डॉ. मंगला सरदेशपांडे यांचे होते, त्यामुळे हे घडले असावे. तथापी हे पत्र त्या चुकीचा निर्देष करण्याकरता लिहलेले नाही.

तपशीलच्या अकराव्या अंकात फ्रेडरिको गार्सिआ लॉर्का यांच्यावर जो लेख आहे, त्यात आपण लॉर्काचे चित्र फारच 'गुलाबी' करण्याचा प्रयत्न केला आहे. लॉर्कांच्या शताव्दी निमित्त आपण लिहीत होता म्हणून तसे घडले असावे. संशयाचा फायदा प्रत्येकाला घ्यायलाच हवा. असो. मुद्दा हा आहे की लॉर्का यांचे दोष दाखवताना, आपण ते खालच्या पट्टीत जाऊन दाखविले आहेत. अशा प्रकारे की ते कोणाला बोचू नयेत, तसे झाले म्हणजे त्याकडे दुर्लक्ष होण्याचा संभव अधिक. त्यांचे गुण उठावदार करून सांगण्याचा प्रयत्न आहे. मुद्दा स्पष्ट करण्याकरता एक उदाहरण - गुण उठावदार करून दाखविण्याच्या संदर्भात.

(१) आपण लिहीले आहे 'लॉर्का स्पेनमधील अत्यंत लोकप्रिय कवी होते.' 'कसल्याही प्रकारची समीक्षा केल्याशिवाय त्यांना डोक्यावर घेतले जाते.' 'याची प्रतिक्रिया म्हणून अधिक जण त्यांच्या काव्याकडे साफ दुर्लक्ष करतात.' आपल्या लेखातील या विधानाबद्दल अर्थातच काहीही आक्षेप घेता येणार नाही. परंतु लॉर्का हे अत्यंत **'महान'** लोककवी होते का? स्पॅनिश साहित्याच्या अभ्यासकांच्या मते या प्रश्नाचे उत्तर लॉर्का नव्हते हेच आहे. ANTONIO MACHADO आनटोनिओ माचाडो हा त्या पिढीतला सर्वात महान कवी असे स्पेनमध्ये मानले जाते. तसेच MIGUEL HERNANDEZ मिग्युएल हरनानडेझ हा तरुण गुराखी देखील लॉर्का इतकाच महान कवी समजला जातो. थोडक्यात लॉर्का हे एकमेव महान कवी नव्हते. ते अत्यंत लोकप्रिय होते हे सर्वांनाच मान्य आहे. पण ते महान ठरले ते ब्रिटीश व अमेरीकन प्रकाशकामुळे. लॉर्का यांची पुस्तके, त्यांची चरित्रे ही इंग्रजी भाषेत जितकी प्रसिद्ध झाली आहेत, तितकी दुसऱ्या कोणत्याही स्पॅनिश लेखकाची झालेली नाहीत. ही वस्तुस्थिती लक्षात घेतली म्हणजे मग जगातील लॉर्का महतीचे रहस्य स्पष्ट होते.



अनुक्रमणिका

(२) "लॉर्काची लोकप्रियता हेच त्यांचा खून होण्याचे कारण होते." हा मुद्दा क्षणभर मान्य करू या. परंतु लॉर्काचा खून झाल्याकारणाने त्यांच्या लोकप्रियतेत भर पडली हे नाकारता येणार नाही. माचाडो आणि हरनानडेझ हे दोघेही कवी रिपब्लिकन पक्षात सक्रीय होते, आणि स्पॅनिश यादवी युद्धाने त्यांचा बळी घेतला होता. यादवी युद्धाचा शेवट झाला तेव्हा नैराश्यग्रस्तता आणि विपन्नाव्यस्था अशा परिस्थितीत माचाडोना स्पेन सोडून परगंदा व्हावे लागले होते. परदेशातच त्यांना मृत्यू आला. हरनानडेझ यांना फाशीची शिक्षा झाली होती. शिक्षेची 'प्रतिक्षा' करीत तुरुंगात क्षय रोगाने खितपत पडले होते. त्याच अवस्थेत त्यांना तीन वर्षांनी मृत्यू आला. या दोन कवींचा लॉर्काप्रमाणे खून झाला असता तर?

(३) माचाडो आणि हरनानडेझ हे उघड उघड फ्रँको विरोधी पक्षात सक्रीय होते. पण त्यांचा खून झाला नाही. मग लॉर्काचा का झाला? याचे एक कारण असे सांगण्यात येते की, समाजातील खुले वातावरण, बुद्धी, औदार्य, आणि स्पेनमधील जनतेच्या ज्या आकांक्षांचा सरकारने जो विश्वासघात केला होता, त्याला असणारा विरोध, याचे प्रतिक लॉर्का, असे समजले जात होते. त्यांच्या एका चरित्रकाराने आणखी एक वेगळेच कारण सांगितले आहे. जनरल फ्रँकोने उभारलेल्या विश्वासघातकी बंडातील मूर्खपणा, कर्मठ धर्मांधता, राजकीय असहिष्णुता हे त्यांचे 'खूनी' होते. लॉर्कांच्या एका खून्याने अशी बढाई मारली होती की "he fired two bullets into his (LORCA'S) arse for being a queer' तपशीलाच्या लेखात या संभाव्य कारणांचा उल्लेख नाही.

(४) "लॉर्का स्वत: समलिंगी-संभोगी" या एका वाक्याने आपल्या लेखात हा विषय हातावेगळा करण्यात आला आहे. वास्तविक लॉर्कांच्या या प्रवृत्तीमुळे त्यांचे मन सतत धास्तावलेल्या अवस्थेत असे. लॉर्कांचे निकटवर्ती या विषयावर बोलण्याचे नाकारीत; अशी त्यांच्या चरित्रकारांची तक्रार आहे. लॉर्काच्या या मनस्थितीची कल्पना, त्यांच्या अगदी जवळच्या मित्रानाच होती. लॉर्काची वरवरची प्रसन्नता, आणि चेष्टा-मस्करी, विनोद करण्याचा त्यांचा स्वभाव, याला दुसरी एक काळी-गंभीर-गडद अशी बाजू आहे, याचा शोध त्यांना लागलेला होता. आपल्याला लवकरच मृत्यू येणार आणि आपली समलिंगी प्रवृत्ती या दोन कारणांनी त्यांचे मन वाढत्या धास्तीने ग्रस्त होते. आपल्या मृत्यूचे नाट्य उभे करण्याचा, त्याला साजेल असा पोषाक करण्यात त्यांना आनंद वाटे. अतियर्थार्थवादी चित्रकार डाली व लॉर्का यांचे समलिंगी संबंध त्या काळात चांगलेच गाजले होते. परंतु डाली यांनी हे संबंध संभोग ही क्रिया प्रत्यक्षात येण्यापर्यंत कधीच पोचले नाहीत असे अगदी स्पष्ट शब्दात जाहीर केले होते. पण हे विधान विश्वसनीय नाही असे अनेक लॉर्का चरीत्रकारांचे मत आहे. चित्रकार डाली यांना शरीरापासून अलग झालेले अवयव व मुंडकी या विषयी जबरदस्ती आकर्षण होते. तसेच लॉर्का यांनाही होते. हे त्यांच्या रेखाटनातून स्पष्ट झालेले आहे. परंतु आपल्याला मृत्यू खरोखरीच लवकरच येणार आहे या विचाराने लॉर्काना पक्षघाताचा झटका आल्यासारखे होई. विशेषत: आपल्याला पाण्यात बुडून मृत्यू येणार आहे असे त्यांना नेहमीच

वाटे. ही धास्ती त्यांच्या काव्यातूनही आविष्कृत झालेली आहे. लॉर्का एकदा म्हणाले होते की "मी गवतात चमकणाऱ्या काजव्यासारखा आहे. कोणीतरी मला पायाखाली चिरडणार आहे याची मला भिती वाटते."

त्यांचे कुटुंबिय, त्यांचे अगदी जवळचे मित्र, लॉर्काच्या या समलिंगी प्रवृत्तीची चर्चा करीतच नसत. एवढेच नव्हे तर ती ते मान्यही करीत नसत. लॉर्काच्या भावाच्या आठवणी या त्यां भावाच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाल्या. त्यांतही या प्रवृत्तीचा उल्लेख नाही. या आठवणींचा यासंबंधीत आणखीही एक विशेष आहे. लॉर्कांनी Public या नांवाचे एक नाटक लिहीले होते. त्यातील आशय हा समलिंगी प्रवृत्ती दर्शविणारा असल्याने, ते लॉर्कांनी प्रसिद्ध केले नाही. लॉर्काच्या भावाच्या आठवणीत याचा उल्लेख नाही. आपल्या माता-पित्यांना आपली ही प्रवृत्ती ज्ञात होईल याची चिंता लॉर्कांना सदैव होती. आपण एक स्त्रैण समलिंगी-संभोगी आहोत असे लोकांना वाटेल या धास्तीखाली ते सदैव वावरत असत. आपल्या मनातील ही बैचेनी त्यांना सतत लपवावी लागत होती. थोडक्यात एक प्रकारचे दुहेरी आयुष्य जगणे, त्यांच्या नशिबी होते. त्यांनी आपली खरी प्रकृती लोकांपासून लपविली आणि तिला आपल्या लिखाणात वाट करून दिली असावी. त्यांच्या नाटकातल्या सर्व नायिका कसल्याना कसल्या प्रकारचा छळ सोसत असतात. आपली सहज प्रवृत्ती नाकारणे आणि समाजाला जे आवडेल, रुचेल व त्यात शिष्टसंमत ठरेल तेच करण्याची सक्ती व त्यामुळे प्रेमाची पूर्तता न होणे ही त्यांच्या नाटकातील अत्यंत शक्तीशाली व सातत्याने आढळणारी गोष्ट आहे. सेंट सबास्टीअन नांवाचा एक संत ख्रिश्चन धर्मात होऊन गेला. धार्मिक छळाला बळी पडून इ. स. २८८ च्या सुमारास त्यास हौतात्म्य पत्करावे लागले होते. त्याला एका झाडाला बांधून, त्याच्यावर बाणांचा वर्षाव करून त्याला प्रथम जखमी करण्यात आले आणि सरतेशेवटी त्याला बदडून ठार मारण्यात आले होते. एखाद्या पिनकुशनमध्ये जश्या टाचण्या खोचण्यात येतात, तशा प्रकारे बाण त्याच्या शरीरात घुसविण्यात आले होते. यामुळे तो, धनुर्धारी लोक, टाचण्या तयार करणारे लोक या दोघांचा 'पालक संत' समजण्यात येतो. तसाच तो शरीर रक्षकांच्या पथकाचा प्रमुख होता, म्हणून सैनिकही त्याला 'पालक संत' मानतात. २० जानेवारी हा दिवस त्या संताच्या स्मरणासाठी राखून ठेवलेला आहे. डाली आणि लॉर्का हे दोघेही या संताच्या व्यक्तित्वाने अगदी भारून गेलेले होते. त्याच्या शरीरात घुसलेले बाण त्याने त्याला होणाऱ्या वेदना आणि तो सोसत असलेले दुःख या सगळ्याचेच लॉर्का व डाली यांना आकर्षण होते.

लॉर्का यांच्या मनोवृत्तीत न्यूयॉर्क भेटीनंतर थोडा फरक झाला. आपल्या समलिंगी प्रवृत्तीबद्दल ते काहीसे मोकळे ठाकळे झाले होते. त्याच्या चरीत्रकाराने या संबंधात लिहिताना म्हटले आहे; "लॉर्कांनी आपली समलिंगी प्रवृत्ती खुल्या दिलाने पत्करावी, यासाठी न्यूयॉर्क शहराने त्या रोखाने त्यांना लकटले असले तर क्यूबा या देशाने ती आपली प्रवृत्ती आहे हे

लॉर्कांनी मोठ्या गौरवाने (CELEBRATE) सांगावे या करता त्यांना परवानगी दिली होती.'' तीन वर्षानंतरची त्यांची अर्जेटीना या देशाची भेट त्यांना मुक्त करणारी ठरली. त्या ठिकाणी अनेक खलाशांच्या सहवासात त्यांना हवे असलेले 'सुख' अगदी उघडपणे त्यांनी घेतले होते.

(५) LAMENT FOR MEJAS हे त्यांचे काव्य उत्कृष्ट आहे याबद्दल एकमत आहे. ते काव्य रचताना त्यांची वृत्ती फार दोलायमान होती. लॉर्कांना रक्त सांडलेले पहावत नसे, कोणत्याही मैदानी खेळाबद्दल त्यांना दिलचस्पी नव्हती. असे असल्याकारणाने bull ring (वृषभ रिंगण मनुष्य आणि बैल या दोघांच्यात या रिंगणात झुंज होते. स्पेनमध्ये या झुंजी फार लोकप्रिय आहेत) बद्दल घृणा असावयास हवी होती. परंतु वृषभ-झुंजीचे Bull Fights त्यांना जबरदस्त आकर्षण होते. काहीसा गोंधळही मनात होता. मानव व बैल यांच्यातील ही लढत, ते एकीकडे "पशूंच्या सहजप्रवृत्तीवर, मानवी सद्‌गुणांनी केलेली मात आहे'' असे म्हणत. पण त्याजबरोबर "ते एक खरेखुरे असे धार्मिक नाट्य आहे की त्यातील MASS चा धार्मिक विधीत प्रथम ईश्वराची पूजा होते आणि त्यानंतर त्याला बळी देण्यात येते.'' त्यांचा मजास (MEJAS) हा मित्र या वृषभ झुंजी व्यवसायातून निवृत्त झालेला होता. पण वयाच्या बेचाळीसाव्या वर्षी पुन्हा एकदा तो रिंगणात उतरला आणि बैलाशी झालेला लढतीत त्या बैलाने त्यांना जवळ जवळ ठारच मारले होते.

लॉर्कांनी ही लढत पाहिलेली नव्हती. परंतु आपल्या मित्राला मृत्यू कसा आला हे त्यांना कळले होते. मृत्यूपूर्वी मजासने आपला बिछाना इतक्या जोराने गदगदा हलविला होती की तो बिछाना खोलीत गरगरा फिरला होता.

लॉर्कांनी लिहले

A coffin with wheels in his bed
at five in the afternoon
Bones are flutes resound in his ears
at five in the afternoon

लॉर्कांनी आपल्या मित्राच्या मोठेपणाला सलाम केला आणि त्याच्या मृत्यूचाही स्विकार केला.

The bull does not know you nor the fig tree
nor horses nor the ants on your floors
The child does not know you nor the evening
because your death is forever

लॉर्कांनी त्याचे स्मरण शब्दबद्ध करताना म्हटले आहे.

I sing his elegance with words that moon

and remember a sad breeze in the olive grove

(६) लॉर्कांचे व्यक्तिमत्व प्रसन्न होते, अवगुण ठरावा इतके औदार्य त्यांचेकडे होते, उत्साही होते आणि त्यांच्याकडे करिष्मा होता. परंतु तितकेचे ते दांभिक आणि दाखवेगिरी करणारे, थापाडे, बढाई खोर, नेहमी एकदा पवित्रा घेऊन वावरणारे. सदैव स्वत:च्या प्रेमात असणारे, (narcissist) विशेषत: स्वत:वर खूष असूनही या प्रवृत्तीत भर कशी पडेल याचाच पाठपुरावा ते करीत. आपणाकडे लोकांनी सदैव लक्ष द्यावे असा त्यांचा आग्रह व मागणी असे. दुसऱ्या एखाद्याने लोकांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले तर लॉर्कांना त्याबद्दल विषाद वाटे व ते दुर्मुखलेले होत. त्यांचा अहंकार आणि स्वत:त गुंतून रहाणे, हे आश्चर्य वाटावे इतके पराकोटीचे होते. काही काव्यपंक्ती रचल्यानंतर त्यांनी एकदा म्हटले होते. "या काव्यात मी माझे स्वत:चे दर्शन घडविल्यानंतर मला किती यातना होतात याची कल्पना तुम्हाला करता येणार नाही. साचलेल्या भावनांच्या डबक्यावरची मी एक महाप्रचंड अशी जांभळ्या रंगाची Dragon fly आहे अशी मी माझ्याबद्दल कल्पना करतो."

कमालीच्या बालीश पद्धतीने लॉर्का आपल्या स्वाभाविक दंभाला वाट करून देत असत. ते तीस वर्षाचे झाले, तेंव्हा ते आपण २९ वर्षांचे आहोत असा बहाणा करीत. या नंतरच्या वर्षात परदेशी जाण्याकरता त्यांनी पारपत्र मिळविले. त्यात ते ज्या वयाचे होते, त्यापेक्षा ते दोन वर्षांनी लहान आहेत असे नमूद केलेले होते. उपहारगृहात बसलेल्या लोकांवर छाप टाकण्याचा प्रयत्न करताना ते काही वेळा ती कविता अगदी त्या क्षणाला उत्स्फूर्तपणे सुचली आहे असे भासवीत. वास्तविक तीच कविता त्यांनी अनेक दिवसापूर्वीच रचलेली असावयाची. माद्रीद शहरातील कॅफेमध्ये बसून गप्पा मारणाऱ्या बुद्धीजीवींच्या रोमारोमात एक "गुण" (!) भिनलेला होता. माद्रीद शहरात रहात असताना लॉर्कांनी हा 'गुण' आपलासा केला होता. उदा. जी पुस्तके वाचलेली नसत, त्याबद्दल आपणास फारच चांगले ज्ञान आहे अशा प्रकारे बोलणे. लॉर्का हे त्यांच्या एका समकालीन कादंबरीकाराने सांगितल्याप्रमाणे "एखाद्या स्पंजासारखे होते. ऐकलेले ज्ञान शोषून घेण्याची त्यांची ताकद कमालीची होती. म्हणूनच एकही पुस्तक न उघडता, आपणाकडे खूप मोठे ज्ञान भांडार आहे असे प्रदर्शन लॉर्कांना करता येत असे."

(७) लॉर्कांचा खून का झाला असावा? ते केवळ प्रिय कवी होते म्हणून झाला का? या प्रश्नाच्या संभाव्य उत्तराचा तपास करण्याअगोदर लॉर्काकालीन स्पेन मधिल परिस्थितीबद्दल अल्पशी माहिती असणे आवश्यक आहे. फ्रँको या हुकुमशहाने केलेल्या प्रचारात एक पालपूद कायम असे. 'कम्युनिस्ट, फुटीरतावादी, निरश्विरवादी आणि गूढ अशा ज्यूडीओमेसानिक कट या सर्वांपासून 'खऱ्या स्पेन'ला वाचविण्यासाठी, जनरल फ्रँको यांनी धर्मयुद्ध पुकारले होते असे या प्रचारात सातत्याने सांगितले जात असे. असेच जर असते, तर लॉर्कांचा खून करण्याचे काहीच कारण नव्हते. लॉर्का ज्यू नव्हते. ते निरश्विरवादी नव्हते, फ्री मेसन नव्हते आणि मार्क्सवादाचा अभ्यास त्यांनी कधीही केला नव्हता. कॅटोलीना आणि बास्क या प्रांतातील फुटीर चळवळीनांही त्यांनी कधीही पाठींबा व्यक्त केला नव्हता. अखिल स्पेनमधील

ते अत्यंत भोळसट असे राजकीय लेखक होते. परंतु कोणत्याही मार्क्सवादी बुद्धी- जीवी पेक्षा, ते फ्रँकोचे जबरदस्त शत्रू होते. हे विधान वरवर पहाता तसे स्पष्ट नाही, त्याकरता थोडे सुक्ष्मात जावे लागेल. स्पेनमधिल त्यावेळच्या लोकसभेत एकंदर ४७३ सभासद होते. त्यापैकी स्पॅनिश कम्युनिस्ट पक्षाचे फक्त १६ सभासद होते. थोडक्यात कम्युनिस्ट पक्ष हा तसा नगण्यच शत्रू होता. फ्रँकोचे पाय जमिनीवर असल्याकारणाने त्याची या वस्तुस्थितीची चांगलीच जाणीव होती. म्हणूनच त्यांनी उभारलेल्या बंडाच्या सुरुवातीला जो जाहीरनामा प्रसिद्ध झाला, त्यात कम्युनिस्टांचा उल्लेखही करण्याचे कष्ट जनरल फ्रँकोनी घेतले नव्हते. परंतु बंडाला रसद व पाठिंबा मिळविण्यासाठी 'कम्युनिस्टापासून संरक्षण' ही उपयुक्त घोषणा आहे याचे जनरल फ्रँकोना चांगले ज्ञान होते. इतकेच नव्हे तर इ. स. १९५० सालीही जनरल फ्रँकोनी याच घोषणेचा वापर पुन्हा केला. आपल्या आसनाला अमेरीकन पाठिंब्याने बळकटी आणण्यासाठी, आपण उदारमतवादाविरुद्ध लढत आहोत हे सत्य सांगण्याऐवजी आपण कम्युनिस्टांविरुद्ध लढत आहोत असे सांगितले म्हणजे मग जनरल फ्रँको हे अमेरीकेचे एक अतिशय मोलाचे मित्र ठरणार होते. वास्तविक फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळापासून उदारमतवाद हाच 'खऱ्या स्पेन'चा ऐतिहासिक शत्रू होता.

त्यावेळच्या स्पॅनिश प्रजासत्ताकात कोणतीही पुसटती राजकीय छटा नसलेला, भोळसट उदारमतवादी विचारसरणीचा प्रतिनिधी कोण असेल तर तो लॉर्का. या उदारमतवादाला शिक्षण, संस्कृतीचे आम जनतेत होणारे वितरण, समाजात अधिक सहिष्णूता राहावी, तत्वज्ञ मुनामुनो यांनी अगदी चपखलपणे वर्णन केलेल्या "बराकी मनोवृत्ती आणि सगळ्याच गोष्टींचे दुर्भिक्ष" यांच्या विवाहाविरुद्धचा संघर्ष या सर्वच गोष्टी विषयी लॉर्कांना कर्तव्य होते. स्पॅनिश "ज्ञानयुगाचे व प्रबोधनाचे शत्रू" यांचे मनस्वी असे विरोधक होते. आणि याच कारणासाठी लॉर्का यांचा खून झाला.

लॉर्का यांच्या मृत्यूनंतर, चिली या राष्ट्राचे व सर्व जगाचेच महाकवी पाब्लो नरूदा यांनी म्हटले होते की "कोणास बळी म्हणून निवडावे, एक प्रतिक म्हणून बळी द्यावे, या उद्दिष्टाने स्पेन देशाचा प्रत्येक कोपरा अगदी काळजीपूर्वक कोणी धुंडाळला असता, तर कोणातही किंवा कशातही या निवडलेल्या माणसात जे आढळते व जेवढे आढळते, त्या प्रमाणात ते दुसऱ्या कोणातही आढळले नसते. स्पेनचे सारतत्व, स्पेनचा जोश आणि स्पेनची गहनता, ही त्या निवडलेल्या माणसात जेवढी होती, त्या प्रमाणात ती अन्य कोणातही नव्हती."

पत्र फारच लांबले. पण तपशील मधील लॉर्कावरील लेखांमुळे तपशीलच्या वाचकांना लॉर्काबद्दल माहिती झाली व आपण सर्वांनी लॉर्काच्या शताब्दी निमित्त त्यांचे स्मरण केले ही त्यातली आनंददायी बाजू आहे. माझ्या माहितीनुसार 'तपशील' हे एकमेव प्रकाशन असावे की जेथे लॉर्कांचे स्मरण झाले. त्याचे नाटक मराठीत आणणाऱ्या भाषांतरकाराला याचे भान नसावे, ही विशेष करून बोचणारी गोष्ट आहे.

**- जयश्री जुन्नरकर**



अनुक्रमणिका

# साहित्य आणि समाज

## लेखक जॉर्ज ऑरवेल ते संत जॉर्ज ऑरवेल

**– नाना जोशी**

साहित्य समीक्षकला मनात नेहमीच असे कुठेतरी वाटत असते, की आपण करतो ती विधाने 'शास्त्रशुद्ध' असतात. अर्थात 'शास्त्र' या शब्दाचा अर्थ प्रत्येक जण आपल्या मगदुरा प्रमाणे करतो ही वस्तुस्थिती आहे. म्हणूनच मराठीत 'सौंदर्यशास्त्र' असा शब्द रूढ झालेला आहे. सामान्य वाचकाच्या दृष्टीने साहित्य समीक्षेचा काय उपयोग असतो हा साहित्य समीक्षकांतही नेहमीच वादग्रस्त प्रश्न ठरलेला आहे. एखाद्या लेखकाबद्दल वेगवेगळ्या समीक्षकांनी भिन्न भिन्न दृष्टीकोनातून केलेले मूल्यमापन जमेस धरून त्याची गोळा बेरीज करून, निष्कर्ष काढला तर तो सामान्य वाचकाच्या दृष्टीने मार्गदर्शक ठरेल असे कोणास वाटेल. पण प्रत्यक्षात तसे होतेच असे होताना दिसत नाही. **जॉर्ज ऑरवेल** – प्रख्यात इंग्लिश लेखक हे त्याचे एक अतिशय बोलके उदाहरण.

**जॉर्ज ऑरवेल** हे दुसरे महायुद्ध सुरू होण्यापूर्वीच **इ. स. १९३९** सालीच वारले असते तर त्यांना आज जे मोठेपण (माझ्यामते) रास्तपणे मिळालेले आहे, ते मिळाले असते का? या प्रश्नाचे उत्तर 'नाही' असेच द्यावे लागेल. कोणी असे म्हणेल की **ऑरवेल** इतक्या तरुण वयात मृत्यूमुखी पडतील, ही कल्पनाच कोणी करील हे असंभवनीय. पण तसे करणे हे अगदी वाजवी ठरले असते. इ. स. १९३९ साली त्यांना रक्तस्त्राव होऊन फार मोठ्या जीवावरच्या दुखण्यातून जावे लागले होते. जवळ जवळ सहा महिने ते सॅनिटोरीयममध्ये (रोग्यांनी हवापालट करून तंदुरुस्त व्हावे यासाठी बांधलेल्या वसाहती) त्यांना रहाणे भाग पडले होते. इ. स. १९३९ सालीच **जॉर्ज ऑरवेल** वारले असते तर इंग्लिश वाङ्मयातील एक मासलेवाईक दिलचस्पी एकांडा शिलेदार या बिरुदाखाली त्यांची नोंद झाली असती. त्यांची साहित्य सपंदा, तोवर तशी फारशी मोठी नव्हती. फारशा यशस्वी न ठरलेल्या काही कादंबऱ्या, पॅरिसमध्ये निरनिराळ्या उपहारगृहातून कपबश्या विसळणे, जेवण्याच्या प्लेटस (ताटल्या) घासणे असली जिकीरीची, शरीर थकवाणारी कामे करण्यात घालविलेल्या दिवसांचे अत्यंत वाचनीय, मनोरंजक व पारदर्शी असे वर्णन, खाण कामगाराबद्दल लिहिलेला एक अनवट वृत्तांत (या वृत्तांतात इंग्लंडमध्ये चपला घालून फिरणाऱ्या, शाकाहारी समाजवाद्यांचा त्यानी समाचार घेतला होता) एवढीच त्यांची वाङ्मयीन संपदा होती. याच्या जोडीला स्पॅनिश यादवी युद्धावर लिहिलेल्या पुस्तकाचा 'होमेज टू कॅटोलींना'

या पुस्तकाचाही समावेश करावयास हवा. **जॉर्ज ऑरवेल** यांनी त्या स्पॅनिश यादवी युद्धात प्रत्यक्ष भाग घेतला होता. त्या यादवी युद्धात कम्युनिस्टानी केलेल्या अत्यंत दुष्ट व क्रूर कृत्यांचे व कारवायांचे तपशीलवार वर्णन या पुस्तकात आहे. (हे पुस्तक प्रसिद्ध होऊ नये, यासाठी इंग्लंडमधील प्रगतीवादी, लाल निशाणी लोकानी केलेल्या भगीरथ प्रयत्नांनी गाथा ही फारच मनोरंजक व उद्बोधक आहे) या पुस्तकाची काही (रमेंड विल्यमय, या त्यामानाने कमी लाल निशाणी साहित्य समीक्षक यात नाहीत याची नोंद वाचकानी घ्यावी) समीक्षकांनी स्तुती केली होती. परंतु त्याकाळी सोव्हियट युनियनच्या– कम्युनिस्टांच्या-विरोधात म्हणण्या–पेक्षा त्यांच्यावर टिका करणारे लिखाण वाचणे हे शिष्टसंमत नव्हते. (भारतातही स्टॅलिनला शांतताप्रेमी मनुष्य असा किताब बहाल करणाऱ्या पं. नेहरुंच्या काळातही तसे वातावरण होते) ते फारसे वाचले जात नव्हते. **जॉर्ज ऑरवेल** इ. स. १९५० साली मृत्यु पावले. तोवर **'होमेज टू कॅटोलीना'** या पुस्तकाच्या एकंदर छापलेल्या १५०० प्रती पैकी फक्त ६०० खपल्या होत्या !

जॉर्ज ऑरवेल यांना प्रसिद्धी मिळाली ती त्यांच्या मृत्युनंतर. या प्रसिद्धीच्या झगमगाटात त्यांच्या समकालीन समिक्षकांचे मत काय होते याकडे साहजिकच दुर्लक्ष होते. वस्तुस्थिती अशी आहे की, इ. स. १९३० साली फारच थोडे सामीक्षक जॉर्ज ऑरवेल यांचे लिखाण लक्षणीय व दर्जेदार आहे असे मानीत. किंवा त्यांनी आपल्या लेखात मांडलेल्या व पुरस्कारलेल्या कल्पना ते गंभीरपणे विचारातही घेत नसत. जॉर्ज यांच्या विचारांकडे व लिखाणाकडे होणारे हे दुर्लक्ष दुसरे महायुद्ध संपेपर्यंत तसेच चालू राहिले होते. या नैराश्य–जनक वस्तुस्थितीला रूपेरीकडाही आहे असे काहीजण जरूर सांगतील. ऑरवेल यांचा As I Please हा ट्रिब्यून या वृत्तपत्रातील स्तंभ, अनेकांना आवडत असे. काहीजण तो वाचून अस्वस्थही होत. त्यांनी मुलांची साप्तहिके आणि 'चावट' पोस्ट कार्ड या दोन्ही संबंधी लिहिलेल्या लेखानीही अनेकांचे लक्ष वेधून घेतले होते. लौकीक संस्कृतीकडे (POPULAR CULTURE) बघण्याकडे एक सर्वस्वी नवा दृष्टीकोन त्यांच्या लिखाणात होता. अनेकांना त्याचे हे 'हलके-फुलके' लिखाण आवडे. THE ROAD TO WIGAN PIER या ऑरवेल यांच्या पुस्तकाचा खपही चांगला झाला होता. ऑरवेल हे आपल्या काळातही मान्यता पावलेले लेखक होते त्याचा हा सारा पुरावा आहे असे कोणी सांगेलही. परंतु वस्तुस्थिती फारच वेगळी होती. THE ROAD TO WIGAN PIER हे पुस्तक चांगले खपले याचे कारण ते लेफ्ट-बुक क्लबने प्रसिद्ध केले होते. त्या बुक-क्लबने या पुस्तकाचे प्रकाशन केल्याकारणाने, एका विशिष्ट पातळीपर्यंत त्याचा खप होणारच होता. परंतु लेफ्ट-बुक क्लबच्या अनेक सदस्यांना हे पुस्तक नापसंत होते व ते लेफ्ट बुक क्लबने प्रसिद्ध करू नये असेच त्यांचे मत होतो. युद्धपूर्व काळतील वाङ्मयीन मेळाव्यात वा चर्चेत ऑरवेल यांचा उल्लेख होत नसे. मग ऑरवेल हे समीक्षकांच्या नजरेच्या टप्प्यात केव्हा आले?





अगदी नेमके सालच सांगायचे झाले तर ते इ. स. १९४६. ॲनिमल फार्म (ANIMAL FARM) हे त्यांचे पुस्तक आदल्याच वर्षी प्रसिद्ध झाले होते. सोव्हियट युनियनची मर्जी खप्पा होईल या कारणाने तत्कालीन लाल निशाणी डाव्यानी हे पुस्तक प्रसिद्ध होऊ नये यासाठी प्रयत्नांची शर्थ केली होती. त्याना कान्झर्वेटीव्ह पक्षियांचीही साथ होती. राष्ट्रवाद, जेम्स बर्नहॉम, वाङ्मयाकडे बघण्याचा तानाशाही दृष्टीकोन, इत्यादी विषयावर त्यांनी POLEMIC या मासिकात लिहिले. हे मासिक अल्पजीवी ठरले असले, तरी ते तसे फार प्रभावी व वजनदार मासिक होते. वाचकांवरील त्याची छाप मोठी होती.

ऑरवेल हे सर्वसामान्य जनास एक महत्त्वाचे व प्रतिभाशाली विचारवंत म्हणून माहीत झाले ते त्यांच्या सामाजिक-वाङ्मयीन लिखाणामुळे. १९८४ ही कादंबरी त्याचे एक नामवंत उदाहरण. या कादंबरीबद्दलची प्रतिक्रियाही अतिशय बोलकी होती. परंतु त्याचबरोबर वाचकांच्या मनात 'घृणाही' निर्माण झाली होती. ऑरवेल हे कालांतराने 'मिथ' बनले. देव-स्वरूप झाले (ICON) आणि ऑरवेल या नावाचे धंद्यातही रूपांतर झाले हे खरे (सध्या महाराष्ट्रात पु. ल. देशपांडे हा 'धंदा' तेजीत आहे.) परंतु तसे होणे ही तशी फारच लांबची मजल होती.

ऑरवेल या 'धंद्या'चेच पहा. इ. स. १९८४ सालच्या आरंभीला १९८४ या कादंबरीच्या अमेरीकेमध्ये दररोज पन्नास हजारावर प्रती खपण्यास सुरुवात झाली. 'हॅरीस पोल' या नावाच्या पहाणीनुसार २७ टक्के अमेरीकनांना ही कादंबरी आपण वाचली आहे असा दावा केला होता. अर्थात या पहाणीतील आकेडवारीबद्दल शंका घेण्यास जागा आहे. ब्रिटनमध्ये इ. स. १९८४ साली या कादंबरीच्या चार लक्ष तीस हजार प्रती विकल्या गेल्या होत्या. ऑरवेल यांचे ॲनिमल फार्म हे पुस्तकही या तडाखेबंद खपात मागे नव्हते. १९७० ते १९८८० या कालखंडाच्या सुरुवातीला या दोन पुस्तकांच्या अमेरीका आणि इंग्लंड (ब्रिटन) या दोन्ही देशात मिळून जवळ जवळ दहा लाख प्रती विकल्या गेल्या होत्या. या जोडीला, ऑरवेल यांचे निबंध संग्रह, कादंबऱ्या आणि होमेज टू कॅटोलीना या प्रस्तकांचाही खपही तसाच एक सारखा वाढत होता व तोही प्रचंड होता. टॉम रेझेनथॉल या प्रकाशकाने या सर्व पुस्तकांच्या सहा महिन्यातील पुस्तक-विक्रीच्या आधारे रॉयल्टीचा हिशोब केला होता. सेकर (SECKER) कंपनाने प्रकाशित केलेल्या, पण इंग्रजी भाषिक नसलेल्या प्रख्यात लेखकांचा यादी त्याने केली. या यादीत, मिशिमा, मोराव्हिया, स्वेव्हो, जिद, कोलेट, काफ्का थॉमस मॅन, गुंतर ग्रास, बॉइल (B'O'LL) आणि आणखी सहा नामवंत लेखकांचा समावेश होता. या सर्वांच्या पुस्तक विक्रीतून मिळालेले पैसे, ऑरवेल यांच्या पुस्तक विक्रीतून मिळालेल्या पैशांच्या अर्धे होते. काही वर्षापासून ऑरवेल यांच्या पुस्तकांच्या 'नव्या आवृत्त्या (अधिकृत)' प्रसिद्ध होत आहेत. खरे म्हणजे या 'नव्या अधिकृत आवृत्त्या'त आणि पूर्वी प्रसिद्ध झालेल्या आवृत्त्यातील मजकुरात फारच थोडा फरक आहे' असे असले तरी 'अधिकृत आवृत्त्यांचा

खप होतोच. ऑरवेल प्रतिष्ठानने मान्यता दर्शविलेले ऑरवेल यांचे नवे चरित्रही प्रसिद्ध झाले आहे.

विशेषतः युद्धोत्तर पश्चिम जर्मनी आणि सोव्हियट युनियन या देशात ऑरवेल यांच्याकडे पहाण्याच्या दृष्टीकोनात जो आमूलाग्र फरक झाला होता तो विचारात घेणे उद्बोधक ठरेल. या दोन्हीही देशात ऑरवेल यांच्या ॲनिमल फार्म आणि १९८४ या कादंबऱ्यावर खास करून भर देण्यात आला व येतो. इ. स. १९८२ पासून इ. स. १९८४ पर्यंत १९८४ ही कादंबरी सर्वात अधिक खपाच्या कादंबऱ्यात मानाचे स्थान टिकवून होती. १९८४ या कादंबरीत ऑरवेल यांनी अनेक नवे शब्द तयार करून वापरले होते. उदा. DOUBLE THINK दुटप्पी विचार THPOGHT POLICE विचार-कोतवाल – हे सारे शब्द इंग्लिश भाषेत व तेथील प्रसार माध्यमातच नव्हेतर जर्मन भाषेत व प्रसार माध्यमात चांगलेच रूळले आहेत. सोव्हियट युनियनमधील परिस्थिती अधिकच मनोरंजक व चित्तवेधक आहे. स्टॅलीनच्या काळात ऑरवेल यांचे वर्णन 'मानवतेचा शत्रू' असे करण्यात येई. (साहित्य प्रेमी डांगेही, मान्यवर कै. काका काडगीळ एका वेगळ्या संदर्भात सांगत त्यानुसार, नीचे मुंडी–उप्पर हात या पवित्र्यात होते) इ. स. १९८० नंतर तेच ऑरवेल हे 'भाई ऑरवेल' बनले. स्टॅलिन व त्यानंतरच्या लगतच्या काळात, ऑरवेल यांना ते वॉल स्ट्रीट वरील 'भांडवल–दारांचे हुजरे', 'त्यांची थुंकी झेलणारे' ही बिरुदे बहाल करून संबोधण्यात येई. जगभरचे प्रगतीशील– लालनिशाणी विचारवंत त्यात सामील होते हे ओघानेच आले. परंतु त्यांनतर सोव्हियट युनियनला एकाएकी नवीन शोध लागला. '१९८४' ही कादंबरी सोव्हियट युनियनवर टिका नसून ती अमेरीका व त्या राष्ट्राची गुप्तपोलीस संघटना F.B.I. एफ. बी. आय. या दोघांच्या विरूद्ध केलेले ते लिखाण आहे असे सोव्हियट युनियनमध्ये सांगण्यात येऊ लागले. ऑरवेल स्वतः फार चांगले गृहस्थ (A GOOD MAN FALLEN AMOUNG THE FABIANS या चालीवर) पॅरिसमधील तळागाळातील माणसाबरोबर वाळून कडक झालेल्या शिळ्या पावाचे तुकडे त्यांनी खाल्ले होते. तेव्हा त्यांची थोरवी व चांगुलपणा उघडच आहे इत्यादी. त्या भांडवलशाही नरकपूरीचे वर्णन (अर्थात १९८४ ही कादंबरी) कोणत्याही प्रकारची काटछाट न करता – अगदी जॉर्ज ऑरवेलनी लिहिले होते तसेच– आम रशियन जनतेसमोर करण्याची कामगिरी त्याकाळी सोव्हियट युनियनमधील प्रकाशकानी आपल्या हाती घेतली. सोव्हियट युनियनमधील वस्तुस्थितीचे विदारक वर्णन करणाऱ्या दुसऱ्या लेखकांची अनुभव लक्षात घेता वर दिलेली माहिती ही फारच सपक ठरेल. डॉ. रॉबर्ट कॉंक्वेस्ट यांनी THE GREAT TERROR आणि THE HARVEST OF SORROWS हे दोन ग्रंथ स्टॅलिनच्या राजवटीत रशियन जनतेचे झालेले शिरकाण, कम्युनिस्ट शासन निर्मित दुष्काळात बळी पडलेले लोक, स्टॅलिनच्या दडपशाहीत ठार करण्यात आलेले पक्ष कार्यकर्ते, लेखक, व या सर्वातून निर्माण झालेल्या दुःखाचा महापूर या

सर्व गोष्टींचे तपशीलवार व पुराव्यानिशी वर्णन या ग्रंथात डॉ. रॉबर्ट कॉंक्वेस्ट यांनी दिलेले आहे. अमेरीका आणि इंग्लंड या देशातील स्टॅलीनवादी, अथवा त्याच्या रशियन राजवटीचे भाट– भारतातील लाल निशाणी याला अपवाद नाहीत. – डॉ. रॉबर्ट कॉंक्वेट यांचे वर्णन 'अतियशोत्त' आहे असे आज व अजूनही सांगतात. परंतु विद्यमान रशियन राज्यकर्ते या विचाराशी सहमत नसावे असे दिसते. सोव्हियट युनियनमध्ये काही वर्षापूर्वी डॉ. रॉबर्ट कॉंक्वेस्ट यांचा गौरव करण्यात आला. त्यांची दोन्हीही पुस्तक सोव्हियट नियतकालिकातून क्रमश: प्रसिद्ध करण्यात आली होती म्हणून **ऑरवेल प्रशस्तीबाबत** कोणत्याही प्रकारची कमतरता राहील असे कोणी मानू नये !

ऑरवेलं 'धंद्या'ला आलेल्या या तेजीला सध्यातरी मंदी येण्याची चिन्हे नाहीत. कारण काही प्रमाणात तरी ते राजकीयदृष्ट्या अनेकाना उपयुक्त आहेत. अनेक जहाल लालडावे (यातून लोकशाही समाजवाद्याना वगळावयाचे) 'ऑरवेल' यांना फंदफितूर, कामगारपक्षद्रोही समजतात. त्यांच्या मते आधुनिक जगात लाल-डाव्यांचा (रशिया धार्जिण्या कार्यकर्त्यांचा व विचारवंतांचा) पराभव होण्यास काही प्रमाणात तरी ऑरवेल 'जबाबदार' आहेत. 'लाल डाव्यां' च्या अपयशाचे व नामुष्कीचे कारण म्हणून ते 'ऑरवेल' यांच्याकडे बोट दाखवितात. थोडक्यात स्टॅलिन त्यांचे जगात सर्वदूर पसरलेले लाल निशाणी व इतर भाट– हे लाल– डाव्यांच्या विकलांग अवस्थेला जबाबदार नाहीत. लाल– डाव्यांना जसा ऑरवेल यांचा हा उपयोग आहे. तसाच 'जहाल-उजव्यानांही.' सर्वच डाव्या प्रवृत्तीच्या चळवळीना व पक्षाना बदडून काढण्यासाठी ऑरवेल या काठीचा उपयोग 'जहाल-उजवे'ही तेवढ्याच प्रमाणात करतात. पत्रकाराना दैनंदिन कामात उपयुक्त ठरणारे हे युक्तिवाद आपण क्षणभर बाजूस ठेवू या. परंतु जॉर्ज ऑरवेल हे आता संत महात्मे समजले जातात. त्यांना देवत्व प्राप्त झाले आहे. (ICON) उदा. जॉर्ज ऑरवेल 'आज जिवंत असते नर' (याठिकाणी मराठी वाचकांनी 'आज लोकमान्य टिळक असते तर'– या स्वरूपाच्या लोकमान्य टिळक स्मरणाची आठवण करावी) यासंबंधी अनेक विचार मांडण्यात येतात. विद्यमान काळातील अनेक प्रश्नांची उत्तरे देण्याचा प्रयत्न होतो. त्यानी प्रचलीत प्रश्नासंबंधी काय भूमिका घेतली असती याबद्दल तर्क करण्यात येतात. **प्रख्यात इंग्लिश कवी ऑडेन यांनी म्हटले की ऑरवेल हे खरे ख्रिश्चन होते. परंतु मादक द्रव्ये (ड्रग्ज) कामगार संघटना, संतती नियमन आणि विद्यार्थ्यांची निदर्शने, याबद्दल काय म्हणाले असते याबद्दल कवी ऑडेन यांना कुतूहल होते.** ग्रेनव्हील हिक्स हे प्रख्यात नाट्य समीक्षक– साहित्य समीक्षक. ते एकेकाळी अमेरिकन कम्युनिस्ट पक्षात होते. त्यांच्या मते स्टॅलीन आणि (कट्टर कम्युनिस्ट विरोधक अमेरीकन सिनेटर) जो मॅकॅर्थी यांच्या विरुद्ध ऑरवेल यांनी मत प्रदर्शन केले असते. हिक्स यांनी असेही सुचित केले की, पश्चात्ताप झालेल्या कम्युनिस्टांनी जो मॅकार्थी आयोगापुढे साक्ष देणे योग्यच ठरले असते, असे ऑरवेल यांनी सांगितले असते.

या अशा प्रकारच्या कल्पनेच्या वावड्या उठविल्याने कोणालाही इजा पोहोचत नाही. अशा वावड्या उठविणे हे निरर्थक आहे हेही तितकेच खरे. परंतु दुसऱ्या एका प्रकारचे खोडसाळ मतप्रदर्शन या वर्गात समाविष्ट नाही. उदा. प्रख्यात अमेरीकन कादंबरीकार मेरी मॅकॉर्थी यांनी ऑरवेल यांच्या समग्र 'निबंध, पत्रे, प्रासंगिक आणि वृत्तपत्रिय लिखाण' यांच्या प्रकाशित खंडाबद्दल लिहिताना अनेक प्रश्न उपस्थित केले. काहींची उत्तरे त्यांनी स्वत:च दिली. खरे म्हणजे त्यांनी हे प्रश्न स्वत:लाच, फार करून आपल्या चहात्या वाचकांना विचारले होते. ही प्रश्नमालिका चांगलीच लांबलचक आहे. पण त्यातल्या काहींची झलक. मेरी मॅकॉर्थी प्रश्न करतात व उत्तरही स्वत:च देतात ! ऑरवेल यांनी आईकमन यांच्यावरील खटला व त्यांना फाशी देणे या दोन्हीही गोष्टीना विरोध केला असता याबद्दल मला (मेरी मॅकार्थीला) खात्री आहे ! परंतु व्हिएटनाम युद्धा– संबंधी ऑरवेल यांनी काय भूमिका घेतली असती? अण्वस्त्र बंदी मोहिमेबद्दल (CND) त्यांचे विचार कोणत्या स्वरूपाचे असते? अण्व-अण्वस्त्रबंदीसाठी निघालेल्या मोर्चात ते नक्कीच सामील झाले नसते. (मेरी मॅकॉर्थीची स्वत:ची कल्पना व त्यांचे मत) अथवा बॉब डॉयलॉन यांचे काव्यवाचन त्यांनी ऐकलेच नसते. प्रतिवाद (PROTEST) या शब्दाने त्यांना भोवळच आली असती. (मेरी मॅकॉर्थी यांचे स्वत:चे मत) आणि अमेरिकेच्या व्हिएटनाम युद्धाला विरोध करणे म्हणजे 'वस्तूनिष्ठदृष्ट्या विचार करता, तसे करणे हे तानाशाहीला पाठिंबा देणे असे जॉर्ज ऑरवेल प्रतिपादन करताना 'मला मेरी मॅकॅर्थीला' ऐकू येत आहे ! मेरी मॅकॉर्थीनी हे विचारलेले प्रश्न अजिबात साळसूद नाहीत. हा प्रश्नोतरांचा तास वाटतो तितका साधा व सरळसोट नाही. या प्रश्नांची मेरी मॅकॉर्थीकडून येणारी उत्तरे (याचे कारण जॉर्ज ऑरवेल हयात होते,तेव्हा हे प्रश्न उपस्थितच झाले नव्हते. थोडक्यात लोकमान्य टिळकाना नियोजनाबद्दल आपले मत काय आहे? असे विचारून त्याचे उत्तर स्वत:च देण्यासारखे आहे) ही उघड उघडपणे जॉर्ज ऑरवेल यांच्या मेरी मॅकॉर्थीना न मानवणाऱ्या प्रतिमेला अगदी उघड उघडपणे काळोखी फासणारी असतील हे या उपस्थित केलेल्या प्रश्नात अनुस्यूतच आहे. ही प्रश्नोत्तरे ब्रिटन (इंग्लंड-स्कॉटलंड-वेल्स) मध्ये रेमंड विल्यमस या प्रख्यात 'लाल निशाणी' समीक्षकाने विस्तारीत केली. त्यात थोडी भरही घातली. रेमंड विल्यमस हे विचाराने कम्युनिस्ट असूनही कम्युनिस्ट पक्षाचे सदस्य नव्हते. गडी दोन्ही बाजूचा खवा खात होता. एकीकडे स्वतंत्र्य व एकीकडे कम्युनिस्ट, एकीकडे लालनिशाणी पण तरीही स्वतंत्र्य, ब्रिटन मधील सांस्कृतिक क्षेत्रातील विशेषत: वाङ्मयीन घडामोडीवर मार्क्सवादी (?) दृष्टीकोनातून ते टिका-टिप्पणी करीत. परंतु रशिया, पूर्व युरोप व इतर कम्युनिस्ट देशातील सांस्कृतिक, वैचारिक व राजकीय घडामोडीबद्दल ते कायम मिठाची गुळणी घेऊन असत. एवंच रेमंड विल्यमस यांना जॉर्ज ऑरवेल फारच नापसंत असणार हे ओघानेच आले. परंतु जॉर्ज ऑरवेल हे जनताप्रिय ठरले होते. हा मोठाच गुंता, म्हणजे 'जनता' ही मूर्ख आहे का? कारण कम्युनिस्ट

विचारप्रणालीत 'जनता' करते ते सारेच बरोबर. चतूर रेमंड विल्यमस यांनी या पेचातून मार्ग काढला – म्हणूनच ते चतूर. त्यांनी असे प्रतिपादन केले की ऑरवेल हे सुरुवातीला फारच फारच लढाऊ समाजवादी होते, त्यासाठी ते स्तुतीला पात्र आहेत. परंतु ऑरवेल हे आपल्या अखेरच्या पुस्तकातून (ॲनिमल फार्म, १९८४) ते आपला लढाऊ बाणा विसरले, निष्क्रीय झाले, त्यांचा उत्साह कमी झाला पण त्यांनी आपली जहाल मते त्याज्य ठरविली नव्हती. रेमंड विल्यमस यांच्या मते ऑरवेल आपल्या अखेरच्या वर्षात 'निराशा– वादी' जहाल झाले होते. आपले हे 'नैराश्य' व 'भांडवलशाही बरोबरची तडजोड' यांचे बेमालून मिश्रण करण्यात ऑरवेल यशस्वी झाले होते. लोकशाही समाजवादाचा विजय अटळ आहे असा भ्रम या नैराश्यवादी लोकशाही समाजवाद्याल्या-जॉर्ज ऑरवेलला-झाला होता. एवंच रेमंड विल्यमस यांनी ऑरवेल यांची कामगिरी उलटी-विकृत करून दाखविली होती. रेमंड विल्यम-सारखी विधाने कोणी केली तरी त्यांचा प्रतिवादही करता येत नाही, त्यासंबंधी वादसंवादही अशक्य असतो. जॉर्ज ऑरवेल हे आपल्या आयुष्याच्या अखेरपर्यंत आपण लोकशाही–समाजवादीच आहोत. आपण त्याच पद्धतीने विचार करतो असे ठासून सांगत. त्यांनी पत्रके काढून– पत्रातून असे जाहीरही केले होते की १९८४ ही कादंबरी हा समाजवादावर केलेल्या हल्ला नाही. परंतु जॉर्ज ऑरवेल यांचीही जाहीर विधाने, त्यांची पत्रे, पत्रके छुप्या लाल निशाणी रेमंड विल्यमस आणि त्यांच्या सारखेच अनेक प्रकारच्यां 'लाल निशाणी' लोकांनी, विचारत घेण्याचे कारण नव्हते, कारण त्यांना तसे करणे फारच गैरसोईचे होते. याउलट ऑरवेल यांचा लोकशाहीबद्दलचा "भ्रम" त्याहीपेक्षा अधिक करून ऑरवेल यांना भांडवलशाही बरोबर केलेली 'तडजोड' (?) हे त्यांच्या दृष्टीने ऑरवेल यांची बदनामी करण्यास पुरेसे कारण होते.

या अशा प्रकारच्या अमूर्त वैचारिक विधानांच्याबद्दल ऑरवेल काय म्हणाले असते. यासंबंधी कल्पना करण्याची वा अंदाज बांधण्याची काहीही गरज नाही. त्यांच्या POLITICS AND THE ENGLISH LANGUAGE (राजकारण आणि इंग्रजी भाषा) या निबंधात त्यासंबंधी त्यानी अगदी परखडपणे लिहिले आहे. इंग्रजी भाषेतील, राजकारण या क्षेत्रातील तज्ज्ञांच्या व तत्त्ववेत्तांच्या लिखाणातील 'सर्वस्वी अर्थहीन परिच्छेदांचा विचार करताना त्यांनी आपले विचार पारदर्शक अशा स्पष्टपणे मांडलेले आहेत. परंतु विल्यमससारख्या लाल–निशाणी विरोधकांची ऑरवेल यांना सवय होती. परंतु पॉल जॉनसनसारख्या मित्रांच्या लिखाणाने ते व्यथित झाले असते. पॉल जॉनसन, हे इंग्लंडमधील अगदी कालपर्यंत रशिया–कडे फारच प्रेमाने पहाणाऱ्या एका डाव्या साप्ताहिकाचे संपादक होते. सध्या ते जहाल प्रतिगामी आहेत. (NEO-CONSERVATVE) आहेत. जॉनसन यांच्या मते आज ऑरवेल हयात असते, तर मागरिट यांच्या कॉन्झर्वेटीव्ह पक्षाचे जोरदार समर्थक झाले असते? जॉन वेन हे प्रख्यात इंग्लिश कादंबरीकार. (आर्थर स्कारगिल हे खाणकामगारांचे पुढारी, त्यांनी

मध्यंतरी खाण-कामगारांच्या संपाचे नेतृत्व केले होते) जॉन लेन यांच्या मते ऑरवेल हे स्कारगिल यांचे विरोधक म्हणून उभे राहिले असते असे म्हणत त्यांना ऑरवेल यांच्या स्मृतीला उजाळा दिलेला आहे. अमेरिकेत आणखी वेगळाच सूर आहे. त्याचा पुढे विस्ताराने विचार होणार आहे. नॉर्मन पोधोरेटझ–एक काळचे ट्राटस्की पंथी– पण अलीकडच्या काळात ज्यूं जमातीचे प्रख्यात अमेरीकन मासिक कॉमेंटरीचे मान्यवर संपादक. ऑरवेल हे नव-कॉन्झर्वेटीव्हांच्या बरोबर डाव्याना विरोध करण्यासाठी ठामपणे उभे राहिले असते, असे पोधोरेटझ यांना वाटते. न्यूयॉर्क ट्रिबून या दैनिकातील एका स्तंभ लेखकाने, याच्यापलीकडे जाऊन विधान केले आहे. त्यांच्या मते ऑरवेल हे नव-कॉन्झर्वेटीव्ह पक्षियांचे जनक आहेत. या साऱ्या बौद्धिक स्वरूपाच्या हल्ला- प्रतिहल्यातून, ऑरवेल यांचे नाव याना एक पुराण कालीन महापुरुष (POPULAR MYTHOLOGY) या स्वरुपात जनमानसात चांगलेच रूजले ही गोष्ट स्पष्ट होते. जॉन रॉडेन यांनी आपल्या ऑरवेल या विषयावरील ग्रंथात या संबंधात अनेक उदाहरणे दिली आहेत. उदा. आज ऑरवेल न्यूयॉर्क शहराचे एक रहिवाशी असते. तर (आपल्याकडील आज लोकामान्य टिळक हयात असते तर या चालीवर) या नावाची असोशिएटेड प्रेस या संघटनेने, '१९८४' साली एका रोजनिशी 'तयार' केली. त्यात 'त्वचेचे रोग', 'धावावयास जाणे' 'स्त्रियांच्या झग्याची लांबी' इत्यादी विषयांची त्या रोजनिशीत नोंद आहे. एका मुलाखतीत फॉकलँड युद्धाबद्दल तुमचे मत काय आहे? असे ऑरवेल यांना विचारण्यात आले होते. 'ऑरवेलीय' हे विशेषण आता सर्वत्र आढळते. रॉय फुलर नावाचे ऑरवेल या लेखकाबद्दल अजिबात प्रेम व आपुलकी नसलेला एक लेखक आहे. आपल्या आत्मचरित्रात त्यांनी हे विशेषण प्रथम वापरले !

हे सारे जरी खरे असले तरी मुख्य प्रश्न राहतोच. ऑरवेल यांचे नाव एवढे सर्वत्र पसरण्यात, त्यांनी प्रसिद्धी मिळण्यास, व ते नाव एकाएकी जनमनात इतके सखोल रुजण्याचे कारण काय? त्याला नेमकी केव्हा सुरुवात झाली. याविषयी 'आपणास त्याचे कारण माहीत नाही' असा सरळसोट कबुली-जबाब देते, तर ते साहित्य समीक्षक कसले? वाचकास कोणते पुस्तक आवडेल? वाचकाच्या पसंतीस कोणता लेखक उतरले याबद्दल समीक्षकांचे अंदाज अनेक वेळा चुकले आहेत, हे आपणास चांगले माहीत आहे. परंतु ऑरवेल यांच्याबद्दल हे असे अदांज बांधण्याचे प्रयत्न अजूनही चालूच आहेत. जॉन रॉडेन यांच्यामते 'न्यू स्टेटसमन' या इंग्रजी डाव्या साप्ताहिकात त्यांच्यावरचा मृतूलेख प्रसिद्ध झाल्यानंतर ऑरवेल यांच्याकडे लोकांचे खरे लक्ष वळले. हा मृत्यूलेख व्ही. एस. प्रिटचेट या प्रसिद्ध इंग्लिश साहित्य समीक्षक व कथाकार यांनी लिहिला होता. जॉन रॉडेन यांच्या मते ऑरवेल यांचे असामान्यत्व प्रस्थापित करण्यासाठी या मृत्युलेखाने जेवढी प्रचंड कामगिरी बजावली, त्याच्या जवळपास येण्याइतकी कामगिरी दुसऱ्या कोणत्याही लेखकाने बजावलेली नाही. याठिकाणी दोन मुद्दे खास करून लक्षात ठेवले पाहिजेत. न्यू स्टेटसमन हे रशियाप्रेमी

डावे साप्ताहिक. दोन, इ. स. १९५६ सालपर्यंत म्हणजे हंगेरीयन क्रांतीपर्यंत इंगलंडमध्ये रशियाप्रेम त्या देशातील त्रुटी मान्य करूनही मोठ्या प्रमाणावर होते. हंगेरीतील उठावाने या परिस्थितीला कलाटणी मिळाली. व्ही. एस. प्रिटचेट यांनी हा मृत्युलेख फारच हातचे राखून लिहिला, याची ती कारणे असावीत. या लेखातील CONSCIENCE OF THE GENERATION (आपल्या पिढीची सदसत विवेकबुद्धी) यासारखे शब्दप्रयोग आणि डॉन क्वीझोट यासारखी बिरूदे. व्ही. एस. प्रिटचेट यांनी ऑरवेलला बहाल केली आहेत याकडे जॉन रॉडन वाचकाचे लक्ष वेधतात. आता ही सार्वत्रिक वापरात असलेली लेबले आहेत परंतु व्ही. एस. प्रिटचेट यांच्या मृत्युलेखाचा आणखी एक विशेष आहे. ऑरवेल विषयीचे आपले कौतुक व्यक्त करण्यासाठी त्यानी केलेला प्रत्येक वाक्यप्रयोग हा हातचे राखून केलेला आहे. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास 'ऑरवेल हे आपल्या पिढीची सदसत विवेकबुद्धी नव्हते, तर आपल्या पिढीची जिच्या करवी हुड़हुडी भरली अशी सदसद्विवेकबुद्धी (WINTRY CONSCIENCE OF HIS GENERATION) होते.' ऑरवेल यांची 'सदसद्विवेकबुद्धी ही एका सुशिक्षित व प्रस्थापित वर्गाची सदसद्विवेकबुद्धी होती.' 'आपल्या शत्रूपेक्षाही आपल्या पक्षातील लोकांची जास्त करून कानउघडणी करण्याकडे ऑरवेल यांचा कल होता' अशा प्रकारची विधाने व्ही. एस्. प्रिटचेट यांनी त्या मृत्युलेखात केलेली आहेत. प्रिटचेट आणखी असेही लिहितात की 'जगात जे हातचलाखीचे, फसवणूकीचे प्रयोग चालू आहेत त्याचा भेद आपण करतो याबद्दल ऑरवेल यांना अभिमान वाटत असे' प्रिटचेट यांनी कितीही उपरोधाने लिहिले असले तरी तो उपरोध फुसका ठरला आहे. त्याना यश अजिबात प्राप्त झालेले नाही. याबाबतीत ऑरवेल यांची कामगिरी त्यांच्या शत्रूनीही आता मान्य केली आहे. त्या तसल्या हातचलाखीचा, फसवणूकीचा भेद करण्याचे ऑरवेल यांचे व्रत होते, व ते आयुष्यभर ही कामगिरी करीत होते. त्यांना 'क्वीझोट' म्हणणे, हा त्याना हास्यास्पद ठरविण्याचा प्रयत्न होता. परंतु असा प्रयत्न केल्याकारणाने आज प्रिटचेट हास्यास्पद ठरले आहेत. दुसऱ्या अनेक मानवंतानी लिहिले आहे पण ते वेगळ्या प्रकारचे आहे. कारण प्रिटचेट यांच्याप्रमाणे त्याना रशियाप्रेमी लालनिशाणी लोकांशी या नामवंताचे काहीही देणेघेणे नव्हते. HORIZAN (क्षितिज) या एकेकाळच्या प्रख्यात मासिकाचे संपादक, साहित्य समिक्षा या प्रांतात कायमचे स्थान मिळविणाऱ्या ENEMIES OF PROMISE (प्रतिभेचे शत्रू) या ग्रंथाचे लेखक सिरील कॉलनी हे ऑरवेल यांचे शाळासोबती यांनी आपल्या मित्राचा गौरव होईल असेच लिहिले आहे. लिओनेल ट्रिलींग हे एक प्रख्यात अमेरीकन साहित्य समीक्षक इ. स. १९५० नंतर प्रसिद्ध झालेल्या HOMAGE TO CATOLINA या पुस्तकाच्या पहिल्या अमेरीकन आवृत्तीला ट्रिलींग यांची प्रस्तावना आहे. ती प्रस्तावना ऑरवेल यांच्या स्तुतीनेच भरलेली आहे. अनेक अराज्यवाद्यांनी (ANARCHIST) ऑरवेल यांचा मोठेपणा खुल्या दिलाने मान्य केलेला आहे. त्यांच्या मते ऑरवेल हा लेखकांचा लोकमान्य नेता

(TRIBNUNE) कॅथलीक पंथियाचे टॅबलेट नावाचे नियतकालिक याच्या संपादकानी असे सांगितले की खरे म्हणजे ऑरवेल हे मनातल्या मनात कॅथलिकांचे मित्र होते. (हा मोठा विनोद आहे त्याबद्दल पुढे विवेचन येणारच आहे) जहाल स्त्री-मुक्तीवाद्यांचा सूर आणखीनच वेगळा आहे. त्यांच्या मते स्त्री- मुक्तवादी कल्पनांबद्दल ऑरवेल यांना तिरस्कार वाटत होता. त्यांचे विचार लिंगवादाने (स्त्री-मुक्ती विरोधाने) लडबडलेले होते. तसेच समलिंगीवादी, 'स्त्रैण' डाव्याबद्दल ते फारच खोडसाळपणे लिहीत असा आरोप काही स्त्री-मुक्ती– वाद्यांनी केलेला आहे. आजकाल अमेरीकन-इंग्लिश शाळातून ऑरवेल यांचे लेख शिकवावे लागले तर शिक्षकाची परिस्थिती काय होते? याबद्दलही शिक्षकांनी मते व्यक्त केलेली आहेत, अमेरिकेतील महाविद्यालयातील प्रथम वर्षाच्या विद्यार्थ्यांना ऑरवेल शिकवणे सामान्यपणे कठीण जाते, याचे कारण त्या विद्यार्थ्यांना चार ओळीदेखील नीटपणे वाचता लिहिता येत नाहीत असे सांगितले जाते. परंतु ज्युलीयन सिमान्य (SYMONS) या प्राध्यापकाचा अनुभव यापेक्षा अगदी वेगळा आहे. ऑरवेल यांचा (BOYS WEEKLIES) (पौगंडान–स्थेतील मुलांची (मुलींची नव्हेत) साप्ताहिके) हा लेख अमेरिकन महाविद्यालयातील प्रथम वर्षियांना आपले मन गुंतवून ठेवणारा, चित्तवेधक असा वाटला. सिमॉन्स यांच्या मते या लेखातील माहिती त्या अमेरिकन विद्यार्थ्यांना अगदी नविन होती. म्हणून त्यांनी या ऑरवेल यांच्या लेखाचा गौरव करणारे निबंध लिहिले असावेत. सिमॉन्स यांच्या मते मॅथ्यू ऑरनॉल्ड या जुन्या पिढीतील लेखकापेक्षा, ऑरवेल यांनी या प्रथम वर्षिय विद्यार्थ्यांचे लक्ष अधिक प्रमाणात वेधून घेतले होते हे निश्चित.

२.

जॉर्ज ऑरवेल यांनी डिकन्स या कादंबरीकारावर एक भला मोठा लेख लिहिलेला आहे. डीकन्सवरच्या आजवरच्या समिक्षा लिखाणात तो लेख कायमचे मानाचे स्थान मिळवून आहे. त्या लेखाच्या सुरुवातीला ऑरवेल म्हणतात,"या लेखकाची चोरी केली असता, ते श्रम सार्थकी लागले आहेत असे वाटावे यापैकी एक लेखक डिकन्स हे होत. आपण त्या संबंधात विचार करणार असलाच तर वेस्ट मिनिस्टर अॅबे याठिकाणी त्यांचे जे दफन झाले ते एक प्रकारची चोरीच होती. एव्हरीमन या प्रकाशन संस्थेने डिकन्स यांचे समग्र वाङ्मय प्रसिद्ध केले. त्या खंडाना ब्रिटिश लेखक चेस्टरटन यांनी प्रस्तावना लिहिली आहे. चेस्टरटन यांचा स्वत:चा मध्ययुगिन आणि रोमन कॅथलिक पंथीय असा जो दृष्टीकोन होता. तसाच डीकन्स यांचाही होता. हे असे त्या प्रस्तावनेत नमूद करणे त्याना स्वाभाविक आहे असे वाटले. अगदी अलीकडे मार्क्सवादी लेखक व तत्त्वज्ञ टी. ए. जॅकसन यांनी डीकन्सचे परिवर्तन रक्तपिपासू क्रांतीकारकात करण्याकरता फार जोरदार व चैतन्यदायी प्रयत्न केले होते. डीकन्स हे जवळजवळ 'मार्क्सवादी' होते असा मार्क्सवाद्यांचा दावा आहे. डीकन्स हे जवळ जवळ रोमन कॅथलीक होते. असा रोमन कॅथलीकांचा दावा आहे असे सांगून डीकन्सवर

आपला हक्क प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला जातो. मार्क्सवादी व रोमन कॅथलीक या दोघांचा असाही दावा होता की, डीकन्स हे 'श्रमजीवीं'चे कैवारी होते. (चेस्टरटन यांनी श्रमजीवी ऐवजी आर्थिकदृष्ट्या गरीब असा शब्दप्रयोग केला असता) या सगळ्यात गमतीची गोष्ट वेगळीच आहे. अखिल जगातील मार्क्सवाद्यांचे हृदयसम्राट लेनिन यांचे मत मात्र सर्वस्वी वेगळे होते. त्यांची पत्नी नाडझदा क्रुप्रास्काया यांनी आपला नवरा लेनिन यांच्या-संबंधी एक छोटे पुस्तक लिहिले आहे. त्यात पुढील वृत्तांत त्या कथन करतात. डीकन्सच्या THE CRICKET ON THE THE HEARTH यावर आधारीत असलेला एक नाट्यप्रयोग पहाण्यासाठी लेनिन गेले. डीकन्स छाप मध्यमवर्गीय भावनावशता त्यांना इतकी असह्य झाली की तो नाट्यप्रयोग चालू असतानाच ते तेथून बाहेर पडले." लेनिनचे हे मत जाहीर असतानाही मार्क्सवादी डीकन्स हा लेखक जवळजवळ मार्क्सवादी आहे असे सांगून त्याची चोरी करू इच्छितात हा महत्त्वाचा भाग आहे. ऑरवेल या लेखात पुढे असेही म्हणतात "डीकन्स यांनी इंग्लिश सामाजिक संस्थावर इतका प्रखर हल्ला चढविला होता की, तितक्या जोरदारपणे व ताकदीने हल्ला चढविणे त्यानंतर कोणालाही कधीही जमलेले नाही. तसे असूनही आपल्याविषयी समाजात द्वेषभावना निर्माण होऊ न देण्यात डीकन्स यशस्वी ठरले आहेत. इतकेच नव्हे. त्यांनी ज्या लोकावर प्रखर हल्ला चढविला होता, त्यांनीच त्याही-पलीकडे जाऊन डीकन्सला इतका 'आपलासा' केला आहे की, डीकन्स हे आता एक संस्था बनले आहेत. थोडक्यात... डीकन्सनी प्रत्येकावर हल्ला केला असला तरी कोणाचेही शत्रूत्व निर्माण होणार नाही, असे घडवून आणण्यात डीकन्स यशस्वी ठरले आहेत असे दिसते."

ऑरवेल यांचे डीकन्स या लेखका संबंधीचे मत आज ऑरवेल यांनाच तंतोतंत लागू पडत आहे. सोव्हियेट युनियनमध्ये पूर्वी समाविष्ट असलेली राष्ट्रे (त्या राष्ट्रांबाहेरच्या लाल-निशाणी लोकांचा धीर एवढा चेपत नाही याचे कारण त्यांनी ऑरवेल या माणसाला व लेखकाला मोजलेल्या शिव्या माहीत असलेले अनेक लोक अजून हयात आहेत !) रोमन कॅथलीक आणि नव कॉर्न्झव्हेटीव्ह इत्यादी मंडळी अस्तन्या सरसावून ऑरवेल हे 'आमचेच' आहेत. हे सिद्ध करण्यासाठी प्रयत्नशील आहेत हे येथवर उद्धृत केलेल्या उदाहरणावरून स्पष्ट होण्यास अडचण पडू नये.

ऑरवेल संबंधी येथवर जी मते उद्धृत केलेली आहेत, त्याची वर्गवारी केली असता, त्यांचे विभाजन सामान्यपणे चार विभागात करता येईल. (१) लालनिशाणी डावे, इतर अनेक प्रकारचे डावे पुरोगामी व प्रगतीशील विचारवंत आहेत. पुरोगामी हा तसा घोटाळ्याचा शब्द आहे. मागे एका मराठी साहित्य समीक्षकाने लिहिले होते. जो बॅडमिंग्ट खेळतो, तो आधुनिक व पुरोगामी. पूर्वीच्या म्हणजे सोव्हियट युनियनचे विभाजन होण्यापूर्वी लाल निशाणी लोकांच्या लालपणाची गडदता त्यांची सोव्हियट युनियनवर कशा प्रकारची व किती प्रमाणात निष्ठा आहे यावर ठरत असे. एखाद्या बुवावरती भाविक लोक जसा विश्वास

वा श्रद्धा ठेवतात, तसा अंध विश्वास व श्रद्धा सोव्हियट युनियनवर असणे हे डावेपणाचे व्यवच्छेदक लक्षण समजण्यात येई. साहित्यप्रेमी भाई डांगे हे आपल्याकडील लक्षणीय उदाहरण – भाई डांगे यांचे उदाहरण घेण्याची कारणे अनेक आहेत. भाई डांग्याची बुद्धी वादविवाद कौशल्य यांचे स्मरण त्यांचे विरोधकही अजूनही करीत असतात. झाडावरच्या पाखरांनाही आकर्षित करणारी व त्याना जागच्या जागी खिळवून ठेवणारे अमोघ वक्तृत्व त्यांच्याकडे होते असे एका मान्यवर संपादकाने आपणास सांगितलेले आहे. भारताच्या इतिहासातील मान्यवर व्यक्तींच्या आणि समकालीन व्यक्तींच्या विचारांची आणि कर्तृत्वाची मार्क्सवादी चिरफाड भाई डांग्यानी अनेक वेळा केली होती. एका लाल निशाणी संपादकाने ते तीन पिढ्यांचे हिरो होतो असा निर्वाळा दिलेला आहे. साहित्य संमेलनाचे एक 'लाल निशाणी' अध्यक्ष कवीराज सुर्वे यांनी त्यांची साहित्यदृष्टी किती तरल व कुशाग्र होती याबद्दलचे अनुभव कथन केले आहेत. म्हणूनच कोणत्याही बौद्धिक वा साहित्यिक चळवळीच्या संदर्भात भाई डांगे विचारात घेतले की मग इतर नगण्य लाल निशाणी व्यक्तींचा विचार करण्याचे कारण नाही. या अशा डांग्यांच्या गावी जॉर्ज ऑरवेल नव्हते हे त्यांच्या कार्यमग्नतेचे उदाहरण मानावयाचे की 'स्वामी'कडून तसा 'बुलावा' आला नव्हता याचे लक्षण समजावयाचे. हे विधान व्यंजनेने केलेले नाही. ती वस्तुस्थितीच आहे. रशियात श्रमजीवींवर, लेखकावर, राजकीय कार्यकर्त्यांवर होणाऱ्या अनन्वित अत्याचाराबद्दल भरपूर पुरावा असूनही त्यांच्या कुशाग्र बुद्धीला ते भावले नाहीत, बोचले नाहीत, त्या घटनांची मार्क्सवादी चिरफाड करून सांगण्याचे त्यांच्या प्रदीर्घ राजकीय कारकीर्दीत कधीही आलेले प्रत्यक्षात तरी आढळत नाही. पण हेच डांगे मराठ्यांच्या इतिहासातील बाजीराव (पहिला) बद्दल नाना फडणवीसाबद्दल मार्क्सवादी थाटात भाष्य करावयास नेहमीच तयार असत कोणत्याही बुवाच्या भक्तांचे असेच असते. बुवाविरोधी सांगितलेल्या खऱ्या घटनाही, त्याच्या भक्ताना अरूचीच्याच असतात. त्यांना तो नेहमी अपप्रचाराचा भाग वाटत असतो. ऑरवेल यांच्याबाबत लालनिशाणी डाव्यांचे तसेच होते. सोव्हियट युनियन कोसळल्यानंतर व त्या घटनेच्या अगोदरची काही वर्षे,'लाल निशाणी' विचारवंताची या आपत्तीतून सुटका झाली आणि तोवर ऑरवेल यांच्याबद्दल त्यांचा जो दृष्टीकोन होता. त्यात आमूलाग्रबद्दल करून ते ऑरवेल यांचे मोठेपण मान्य करणाऱ्यांच्या दिंडीत जणू काही आपण या दिंडीचे प्रायोजक व सूत्रधार आहोत अशा थाटात ते सामील झाले. (२) ख्रिश्चन धर्मातील रोमन कॅथलिक हा पंथ यांची परिस्थिती फारच चमत्कारिक. ऑरवेल यांनी अनेक वर्षे सातत्याने या धर्मपंथियांचा अनेक वेळा निषेध केला होता. पण तसे होते तरी ऑरवेल यांनी व्यक्त केलेली अनेक विषयावरची मत कॅथलीकांच्या विचाराशी फारच मिळती-जुळती होती. या पेचातून, ऑरवेल हे मनातल्या मनात (at heart) कॅथलीकच होते, असे सांगून, कॅथलिकांनी आपली सुटका करून घेतली व ते ऑरवेल प्रशस्तीच्या दिंडीत मोठ्या दिमाखाने सामील



अनुक्रमणिका

झाले. (३) लोकशाही समाजवादी विचारांची जी मंडळी आहेत त्याना फारशी अडचण नव्हती. ऑरवेल यांची सगळीच मते सगळ्याच लोकशाही समाजवाद्याना मान्य झाली नसती वा कदाचित् होणारही नाहीत. असे असले तरीही जॉर्ज ऑरवेल हे आपलेच आहेत असे सांगण्यात त्यांना फारशी आडकाठी नाही. या संदर्भात एक गमतीदार व उद्बोधक आठवण. सोव्हियट युनियनचे 'ते तसे' झाल्यानंतर लोकशाही समाजवाद्यांची आंतरराष्ट्रीय परिषद न्यूयॉर्क येथे झाली. त्याचे अध्यक्ष होते प्रख्यात जर्मन लोकशाही – समाजवादी विली ब्रॅन्ड. त्यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात असे सांगितले की "लोकशाही– समाजवाद्यांनी सोव्हियट युनियनमधील समाजव्यवस्थेचे वेळोवेळी केलेले विश्लेषण, पृथ्थकरण आणि त्याच्या संदर्भात दिलेले धोक्याचे इशारे हे या क्षणी तंतोतंत बरोबर ठरले आहेत. पण सरतेशेवटी त्यातून काय निष्पन्न झाले? 'समाजवाद' बदनाम झाला. म्हणजे जुन्या-नव कॉन्झर्व्हेटीव– उजव्यानी आपण लोकशाही समाजवादी जे काही सांगत होतो त्याकडे साफ दुर्लक्ष केले, वेळप्रसंगी ते चुकीचे आहे असें सांगून त्याची चेष्टाही केली, 'लोकशाही – समाजवाद्यांना' जगाच्या महत्त्वाच्या देशातून सत्ता संपादन करता आली नाही म्हणून निर्माण केलेल्या नैराश्यातून ते असा नकरणात्मक दृष्टीकोन पत्करतात असे मोठे शहाजोगी विश्लेषणही केले. पण सोव्हियट युनियनच्या विभाजनाच्या प्रसंगी, बडेजावी पद्धतीने सोव्हियट युनियनमधील त्रुटीबद्दल आपण इ. स. १९१७ सालापासूनच सांगत होतो असा **कांगावा** करून **समाजवाद** हा किती चुकीचा व प्रत्यक्ष कार्यवाहीत येणारा नाही असे भासविण्यात ते यशस्वी झाले आहेत. साथीहो आपणाला किती कठीण परिस्थितीला सामोरे जावयाचे आहे याची यावरून कल्पना येईल." ही घटना नमूद करण्याचे कारण विवेचनात पुढे समजून येईल. ऑरवेल यांनी इ. स. १९३० सालापासून सोव्हियट युनियनमधील तानाशाहीबद्दल लोकांना जागृत करण्याचा आरंभ केला होता याचे स्मरण ऑरवेलच्या वाचकांना होईल. (३ अ) कोणत्याही पक्षाचे निशाण खांद्यावर नसलेले अनेक लेखक. (मराठी लेखकात हे पिक उदंड आहे !) या लब्धप्रतिष्ठित मंडळीची पंचाईत अशी होती की आजवर आपण ऑरवेल हे लेखक नाहीत अशाच थाटात वावरलो. पण आजकाल ऑरवेल हे तर जगतमान्य लेखक ठरले आहेत. थोडक्यात पेचच की? आपली आजवरची साहित्य समिक्षा व त्याजबरोबर आपणही केराच्या टोपलीतच गेलो की? या संदर्भात एक उत्तम उदाहरण ऑरवेल यांच्या लिखाणातील पुढील उतारा आहे. ऑरवेल यांनी वेळोवेळी आपल्या लिखाणाद्वारा दिलेल्या इशाऱ्यांकडे साफ दुर्लक्ष केले गेले होते. अनेक नामवंत विचारवंतानी दुर्लक्ष केले होते. "तो आजारी शरीराचा व मनाचा साहित्यिक आविष्कार आहे असे सांगून, त्याकेड क्षमाशील दृष्टीने पाहून ते निकालात काढले होते." 'बिचारा ऑरवेल' तो 'आजारी' तेव्हा असले काहीतरी बरळणारच ही भूमिका या वृत्तीपाठीमागे होती. इंग्रजी भाषेत सांगतात त्यानुसार हे विधान हे या वर्षातील अत्यंत सपक विधान (an under statement of the year). ऑर्थर

कोईस्लर यांच्या जगतविख्यात 'डार्कनेस ॲटनून' या कादंबरीच्या परीक्षणात ऑरवेल यांनी म्हटले होते. 'मॉस्को खटले' या नावाने कुप्रसिद्ध असलेल्या खटल्याबाबत सर्वात भयावह गोष्टी, ते खटले भरण्यात आले हे नाही. तानाशाही समाजाला (TOTALITARIAN) या अशा गोष्टींची आश्यकता असते हे उघड आहे. परंतु या खटल्यांचे ज्या उत्सुकतेने पाश्चिमात्य विचारवंत व बुद्धीवंतानी समर्थन केले ही घटना अधिक भयावह आहे. न्याया-लयासमोर 'खेचण्यात' आलेले निरपराध लोक अनेक वर्षे अंडा कोठडीत (SOLITARY CONFINEMENT) बंदिस्त होते. अशा लोकांनी जे कबुलीजवाब दिले; ते उदारमतवादी पाश्चिमात्य वृत्तपत्रांच्या प्रतिनिधीना समाधानकारक वाटले. तसे त्यानी जाहीरच केले होते. याही पुढे जाऊन या गुन्हेगाराना (?) वरिष्ठ न्यायालयात जाऊन आपले अपील दाखल करण्याचा हक्क नाकारण्यात येणे, हे फारच सोईचे आहे असा सिद्धांत एका पाश्चिमात्य नामवंत वकिलाने बसविला होता !! स्पेनमध्येही यादवी युद्धाच्या काळात अशाच प्रकारचे खटले न्यायालयात दाखल करण्यात आले होते. तशाच प्रकारचे आरोपही ठेवण्यात आले होते. परंतु स्पेनमध्ये कबुलीजवाब घेण्यात आले नव्हते. पण अगदी कट केल्यागत या खटल्यांचा वृत्तांत डाव्या वृत्तपत्रानी एकतर दाबून टाकला होता; अथवा त्या खटल्याबाबत चक्क खोटे वृत्तांत प्रसिद्ध केले होते. अर्थात रशियातील खटल्यात जे आरोपी होते त्यांचा छळ झाला होता, अगर त्यांचा छळ करण्यात येईल अशी धमकी त्याना देण्यात आली होती; हे अगदी उघडच आहे." हा उतारा व मागाहून जे काही घडले (भारतातही- भाई डांग्यानी या बदनाम 'मॉस्को खटल्याच्या' संदर्भात आपल्या अत्यंत बोचऱ्या वक्तृत्वाच्या शैलीत त्या या घटनांची मार्क्सवादी चिरफाड केली नाही) त्याची सूचना,इशारा,वा नोंद आहे.

थोडक्यात सर्वच प्रकारच्या विचाराच्या मंडळीना ऑरवेल हे 'आपलेच' आहेत हे सिद्ध करण्यासाठी, कोणाला त्यामानाने फारच थोड्या, पण इतराना फारच मोठ्या खटपटी लटपटी कराव्या लागतात. त्यातल्या चौथ्या वर्गात समाविष्ट असलेले नव-कॉन्झर्वेटीव्ह हे करीत असलेल्या "कसरती'बद्दल थोडेसे. इतर विचारसरणीबद्दल लिहिण्याचे कारण नाही. एकतर तथाकथित मार्क्सवादी आणि कम्युनिस्ट पंथीय यांची सोव्हियट युनियनचे 'ते तसे' झाल्याकारणाने एकसारखी पिछेहाटच होत आहे. ते तिसऱ्या जगात अजूनही 'भूई धरून' आहेत, ते त्या त्या देशातील इतर राजकीय पक्षातील नेतृत्त्वाच्या नाकर्तेपणामुळे. गमतीची गोष्टी अशी आहे की हे 'भूई धरून राहणे' हे देखील ज्या देशातून अधुरी का होईना लोकशाही अस्तित्वात आहे त्या ठिकाणीच प्रामुख्याने आहे. इतर देशात त्यांचे अस्तित्वच नाही. थोडक्यात आजच्या युगातही लाल निशाणी मंडळीना 'भूई धरून राहण्यासाठी' लोकशाही राज्यव्यवस्था आवश्यक ठरलेली आहे. रोमन कॅथिलिक- पंथियांची परिस्थिती थोडी वेगळी आहे. आचार, उच्चार व विचार यात जुन्या रोमकॅथलिकांच्यात असलेला फरक हा दिवसेंदिवस लोकांच्या लक्षात अधिक प्रमाणात येऊ लागल्याकारणाने, त्यांचीही वैचारीक

क्षेत्रात पिछेहाट होत आहे. शिवाय कम्युनिस्टाना विरोध करण्याबाबत रोमन कॅथलिक हे बिनीचे शिलेदार आहेत हा प्रचारही आज गैरलागू ठरला आहे. एवंच या दोन विचारधारा या विवेचनातून या कारणासाठी बाद ठरविण्यात आल्या आहेत.

ऑरवेल हे आपलेच आहेत हे सिद्ध करण्यासाठी या सर्वच मंडळीना अनेक खटपटी-लटपटी कराव्या लागतात. त्यापैकी नव कॉन्झर्व्हेटिव्ह करीत असलेल्या कसरती–संबंधी थोडेसे. कॉन्झर्व्हेटिव्ह हा इंग्रजी शब्द तसाच ठेवलेला आहे. याचे कारण या शब्दातून अनेक अर्थ सुचित होतात, व ते व्यक्त करणारा मराठी शब्द आज तरी नाही, 'प्रतिगामी' हा लालनिशाणी लोकांनी प्रचारात आणलेल्या शब्दातून, कॉन्झर्व्हेटिव्ह या शब्दाचा अर्थ व्यक्त होत नाही. लाल निशाणी लोकांच्या सांगण्याप्रमाणे त्यांच्याशी जो सहमत नाही तो प्रतिगामी. कॉन्झर्व्हेटिव्ह परंपराभिमानी आहेत पण परंपरेला अगदी घट्ट चिकटून बसणारे नाहीत. त्याना आधुनिकीकरण प्रिय आहे. खाजगी मालकीवर श्रद्धा असली तरी सर्वच गोष्टी खाजगी मालकीच्या असाव्यात असा त्यांचा आग्रह नसतो उदा. अमेरीकेतील एकंदर जमिनींपैकी १/३ जमीन अमेरीकन सरकारच्या मालकीची आहे. व्यक्ती स्वातंत्र्यावर ते भर देत असले, तरी परंपरागत निती त्यांना हवी असते. त्याबाबतीत नव– डाव्यांचे संत ग्रॅमस्की व कॉन्झर्व्हेटिव्ह यांचे एकमत आहे. या सर्व अर्थछटा व्यक्त करणारा एकच मराठी शब्द सध्या तरी नाही.

डाव्या समाजवाद्यांच्या राजकीय शहाणपणाची दखल घेऊन, त्याबद्दल उत्साह दाखविणे हे इंग्लिश भाषिक जगतात शिष्टसंमत नाही. इंग्लंडमध्ये असे लिखाण करणारा हा 'कोणाचा कोण' आहे हे लक्षात घेऊन त्याकडे थोडे तरी लक्ष देण्यात येते. पण अमेरीकन कॉन्झर्व्हेटिव्ह हे सर्वसामान्यपणे तसे कधीही करीत नाहीत. परंतु जॉर्ज ऑरवेल हे या नियमाला अपवाद. त्यांचे नशीबच तसे विचित्र. कसे ते पहा. अमेरीकेत जॉर्ज ऑरवेल यांचे लिखाण प्रसिद्ध होऊ लागल्यानंतर ते थोड्याच काळात कमालीचे लोकप्रिय लेखक ठरले. हे झाल्यानंतर ऑरवेल या लेखकाची 'चोरी' करण्याचे कॉन्झर्व्हेटिव्ह पंथियानी– विशेषत: नव–कॉन्झर्व्हेटिव्ह पंथियानी ठरविले. 'जॉर्ज ऑरवेल' हे 'मिथ्यक' निर्माण करणारी कॉन्झर्व्हेटिव्ह मंडळी या बाबतीत आघाडीवर होती. परंतु हे करीत असताना, ऑरवेल यांना आपल्या स्वत:च्या साहित्य निर्मितीबद्दल काय सांगायचे आहे याकडे हे लोक बुद्धीपुरस्सर दुर्लक्ष करीत होती असे दिसते. ऑरवेल यांना 'आपलेसे' करण्याची मोहीम अमेरीकेत ज्यावेळी ऐनभरात होती, त्यावेळी हे ऑरवेल हे क्षयरोगाच्या भक्षस्थानी पडून, मरणोन्मुख अवस्थेत दिवस मोजीत होते. **अशाही अवस्थेत** कॉन्झर्व्हेटिव्ह पंथीय करीत असलेल्या अपप्रचाराच्या **निषेध** नोंदविण्याचा त्यानी आग्रह धरला. **१९८४** या आपल्या कादंबरीचा ही मंडळी बुद्धीपुरस्स चुकीचा अर्थ लावीत आहेत असे ऑरवेल यांना वाटत होते. त्याबद्दल त्यांनी आपला निषेध लगेच नोंदविला. अमेरीकेतील ऑटो वर्कर्स लिमिटेडचे एक कार्यकर्ते फ्रान्सिस



अनुक्रमणिका

ए हॅनसन, याना लिहिलेल्या पत्राकरवी हा **निषेध** आविष्कृत झाला होता. या पत्रातील १९८४ या कादंबरीच्या संदर्भात असलेला उतारा 'लाईफ' या नियतकालिकाच्या २५ जून १९४९ च्या अंकात आणि न्यूयॉर्क टाईम्स बुक रिव्हू या साप्ताहिकांच्या ३१ जुलै १९४९ च्या अंकात प्रसिद्ध झाला होता. ऑरवेल यांनी पुढील शब्दात आपला निषेध नोंदविला आहे.

"१९८४ ही माझी अगदी अलीकडची कादंबरी. ही कादंबरी ही समाजवादावर अगर ब्रिटिश लेबर पार्टीवर (मी या पक्षाचा एक हितचिंतक आहे) **हल्ला नाही.** परंतु मध्यवर्ती आर्थिक नियोजन, व नियंत्रण यांतून ज्या विकृती निर्माण होतात, त्याचे ते वर्णन आहे. खरे म्हणजे या विकृती कम्युनिझम (साम्यवाद) आणि फॅसिझम या विचार प्रणालीनी प्रत्यक्ष अस्तित्वात आणलेल्या आहेत. मी १९८४ मध्ये ज्या प्रकारच्या समाजाचे वर्णन केले आहे, तो प्रत्यक्षात या भुतलावर अवतरेलच अशी माझी श्रद्धा नाही. १९८४ ही कादंबरी उपरोधात्मक लिखाण आहे. ही वस्तुस्थिती या ठिकाणी विचारात घेतली पाहिजे. परंतु त्या समाजासारखे काहीतरी प्रत्यक्षात अस्तित्वात **येण्याची शक्यता आहे** अशी माझी श्रद्धा आहे. जगातील बहुतेक विचारवंत व बुद्धीजीवी यांच्या मनात तानाशाही कल्पनानी चांगली पक्की मूळे धरली आहेत असा माझा विश्वास आहे आणि त्या कल्पनांची तार्किक दृष्टीने तड लावली असता काय होईल याचे शब्दांकन मी केलेले आहे. इंग्लिश भाषिक लोक हे मुलतःच, उपजतपणे इतरांपेक्षा अधिक चांगले नाहीत या मुद्यावर भर देण्यासाठी या कादंबरीची पार्श्वभूमी व त्यातील घटना यांच्यासाठी ब्रिटनची निवड करण्यात आलेली आहे. साम्यवाद वा फॅसिझम यासारख्या तानाशाहींच्या विरुद्ध संघष केला नाही तर त्यांचा विजय अन्य ठिकाणी वा कोठेही होईल."

परंतु ऑरवेल यांचा १९८४ ही कादंबरी लिहिण्यामागचा हेतू वा त्या लिखाणात त्यांना अभिप्रेत असलेला अर्थ याकडे कोणीही फारसे लक्ष दिले नाही. परंतु त्यानंतर त्यांची ANIMAL FARM ॲनिमल फार्म आणि १९८४ या दोन्हीही कांदबऱ्या ग्रंथ विक्री या व्यावसायिक क्षेत्रात प्रचंड यशस्वी ठरल्या होत्या. हे झाल्याकारणाने, ऑरवेल यांचे तोवर प्रसिद्ध झालेले इतर साहित्य जे तोवर फारच दुर्लक्षीत राहिले होते, ते हळूहळू पुर्नमुद्रीत होऊ लागले. त्यानी लिहिलेल्या वृत्तपत्रीय लिखाणाचे समग्र खंड हळूहळू प्रकाशित होऊ लागले. १९६०च्या अखेरीस कम्युनिस्ट विरोधक उदारमतवादी डाव्यांच्या गटात, ऑरवेल हे पंथ संस्थापक होऊन बसले. पण कॉन्झर्व्हेटिव्हापुढे असलेला पेच वेगळाच होता. ऑरवेल हा लेखक कोण होता? फ्रँकोच्या स्पेनमध्ये अत्यंत जहाल डाव्या गटाचे जे सैन्य होते. त्यातील एक सैनिक म्हणून लढत दिलेला ऑरवेल, दुसऱ्या महायुद्धात ब्रिटन कशामुळे वाचणार असले तर समाजवादी क्रांती झाली तरच अशी खात्री पटलेला ऑरवेल, कम्युनिझम (साम्यवाद) म्हणजे राष्ट्रीय भांडवलशाहीचे अत्यंत भिषण स्वरूप या संशयातच आपल्या कम्युनिस्ट विरोधाची मुळे आहेत असा इशारा देणारा ऑरवेल – अमेरीकन

कॉन्झर्व्हेटिव्हना आता या ऑरवेल बरोबर मुकाबला करावा लागणार होता.

गंमत अशी आहे की ब्रिटन मधल्या राज्यकर्त्या वर्गाबद्दल अमेरीकन कॉन्झर्व्हेटिव्हांच्या मनात अनेक वर्षे कौतुकाची व असूयेची भावना कायमची कर करून आहे. परंतु ऑरवेल यांचे त्या राज्यकर्त्यांबद्दल मत होते, "या वर्गातील सारे लोक ही बांडगुळे आहेत. एखाद्या कुत्र्याच्या अंगावर बसलेल्या माशांपेक्षा त्यांचा समाजाला कमीच उपयोग आहे." "या वर्गाला जेव्हा आर्थिक मंदी आणि फॅसिझम यांना सामोरे जावे लागले, त्यांच्याशी मुकाबला करण्याची वेळ आली तेव्हा त्यांनी मुर्खपणा प्रदर्शित करून आपली सुटका करून घेतली." "हा वर्ग असा होता की दोन महायुद्धाच्या काळात त्याची एकसारखी अवनतीच होत होती. ही अवनती अशा दशेला पेहोचली की ब्रिटिश साम्राज्यात पराकोटीची कुशाग्र बुद्धी असलेल्या व्यक्ती म्हणून कांजी घातलेले सदरे घालून मिरविणाऱ्या लार्ड हॅलीफॅक्स आणि अँथनी यासारख्या व्यक्तींची गणना होऊ लागली." "बिचारा स्टॅनले बाल्डविन- ही कांजी घातलेले सदरे घालून मिरविणारी व्यक्ती हे खरे. तो केवळ एक पोकळी (HOLE) होता." "चंबरलेन हा असा पंतप्रधान की ज्याच्याबद्दल घृणा व्यक्त करावी या लायकीचाही तो नाही." या अशा मताबरोबरच कॉन्झर्व्हेटीवाना लाडक्या असलेल्या व्हिन्सटन चर्चिल-बद्दल यांच्या विषयी त्यांच्या मनात फारशी आदराची भावना नव्हती. या अशा परखड मतांच्या पार्श्वभूमीवर कॉन्झर्व्हेटीव्ह ऑरवेल ही प्रतिमा फारच झटपट अंर्तधान पावेल. या नंतरचे ऑरवेल यांच्या वाङ्मयाबद्दलचे राजकीय कार्यकर्त्यानी लिहलेले जे शोध निबंध आहेत, ते डावे-समाजवादी घटक ज्या गुंतागुंतीचे रंगसप्तस आहे त्यात ऑरवेल यांचे नेमके स्थान कोठचे? याविषया संबंधी. हा असा ऑरवेल कॉन्झर्व्हेटीव्ह पंथियांच्या पचनी कसा काय पडणार हा प्रश्न कोणालाही पडला असता.

परंतु एकाएकी चमत्कार घडला. अमेरिकन कॉन्झर्व्हेटिव्ह पथियानी नव-कॉन्झर्व्हेटीव वादाचे निशाण आपल्या खांद्यावर घेतले; आणि ऑरवेल हे 'आपले'च आहेत असा दावा ते करू लागले. एवढी वर्षे उलटल्या नंतरही दिलासा मिळविण्यासाठी ऑरवेल या क्रांतीकारी समाजवाद्याकडे त्यांनी आपला मोर्चा का वळविला? हा प्रश्न रास्तपणे उपस्थित होईलही. कॉमेंटरी या अमेरिकन द्वैमासिकाचे संपादक नॉर्मन पोधोरेटझ. कॉमेंटरी हे अमेरिकेतील ज्यू समाजाचे एक दर्जेदार व वजनदार द्वैमासिक. त्यात अनेक विचारवंताचे सर्वानाच विचार करण्यास प्रवृत्त करील अशा स्वरूपाचे लिखाण वारंवार प्रसिद्ध होते. अनेक डाव्या लाल निशाणी वा तत्सम लोकाना या द्वैमासिकाने त्यांची योग्य जागा दाखवून दिलेली आहे. म्हणून या द्वैमासिकाच्या संपादकाच्या मताला महत्व. (आपल्या महाराष्ट्रीयांच्या तीन पिढ्यांचे हिरो या सारखेच हे उदाहरण आहे) या संपादकानी या उपस्थित होणाऱ्या प्रश्नाचे उत्तर ताबडतोब सादर केले होते! ऑरवेल यांच्या मृत्यूनंतर एक निबंधकार या स्वरूपाता ऑरवेल यांच्या किर्तीत प्रचंड प्रमाणात वाढ झाली होती. या घटनेची नोंद पोधोरेटझ यांनी

घेतल्यानंतर त्यांनी असा निष्कर्ष काढला की "आपल्या युगातील सर्वात महान राजकीय निबंधकार हा आपल्या बाजूस आहे ही काही सामान्य गोष्ट नाही. आपल्या स्वतःच्या राजकीय मताना त्यांच्यामुळे आत्मविश्वास, अधिकार आणि वजन प्राप्त होते." पोधोरेटझ यांनी हा असा दावा केल्याप्रमाणे, "ऑरवेल या लेखकाची ज्याची चोरी करणे हे वाजवी ठरेल इतक्या अनमोल किमतीचा लेखक होता." आता ही केवळ चोरी होती की ऑरवेल यांच्या मतांचा विपर्यास होता? पोधोरेटझ यांनी आपल्या 'चोरी'चे समर्थन करताना असे सांगितले की "ऑरवेल हे फारसे समाजवादी कधीच नव्हते." त्यांची नियोजन या प्रक्रियेवर सर्वसामान्य स्वरूपाची श्रद्धा होती. परंतु त्या पलीकडे जाऊन समाजवादाच्या उभारणीसाठी जी प्रत्यक्ष स्वरूपाची व्यवहारी जमवाजमव आणि कृती करावी लागते, त्याबाबत ऑरवेल यांनी कधीही दिलचस्पी दाखविली नाही. "पोधोरेटझ यांच्या मते ऑरवेल हे क्रांतीकारही नव्हते असे दिसते. नव–कॉर्न्झर्व्हेटिव्ह "ऑरवेल हे क्रांतिकारी होते हे नाकारतात, ते क्रांतीचे एक महत्त्वाचे व प्रमुख टिकाकार होते." असे त्यांचे सांगणे आहे. समाजवाद आणि क्रांती या दोन्हीपासून ऑरवेल यांची एकदा फारकत केल्यानंतर, मग ऑरवेल यांना एका वेगळ्याच राजकीय स्वरूपात खडे करण्यात अजिबात अडचण नव्हती ! पोधोरेटझ यांनी नेमके तेच केले. COMMITTE FOR A FREE WORLD (स्वतंत्र जगतासाठी स्थापन झालेले मंडळ) या मंडळाचे ऑरवेल हे 'मार्गदर्शक चैतन्य आहे' अशा स्वरूपात, ऑरवेल यांची 'समाजवादी व क्रांतीकारी' विचार व भूमिका आपल्या आपणच निकालात काढल्या–नंतर, ऑरवेल यांना कॉर्न्झर्व्हेटीव म्हणून सादर करण्यात आले.

ऑरवेल हे समाजवादी नव्हते अगर क्रांतीकारीही नव्हते, हे प्रतिपादन योग्य व खरे मानले तर मग खालील घटनांचे स्पष्टीकरण कसे देणार? इ. स. १९३९ साली ऑरवेल हे स्पेनमध्ये केवळ लिखाण करणे– वार्तापत्र पाठविणे या हेतून गेले होते. तेथे गेल्यानंतर स्पॅनिश कामगार वर्गाचा जो पराकोटीचा असा क्रांतीकारी विभाग होता, त्याचे प्रतिनिधित्व करणाऱ्या सैन्यात ते दाखल झाले, ही वस्तुस्थिती आहे. त्यानी असे का करावे? प्रज्या–सत्ताकाशी निष्ठा असलेल्या कामगारवर्गीय स्पेनच्या भागात (LOYALIST SPAIN) ते त्यावळी नेमके काय करत होते? स्पॅनिश युद्धासंबंधीच्या वाचकांचे हृदय हलविणाऱ्या आठवणी ऑरवेल यांनी मागे ठेवलेल्या आहेत. त्या वाचल्यानंतर ते स्पेनमधील यादवी युद्धात कोणत्या हेतूने लढत होते, याबद्दल यतकिंचितही संशय राहत नाही.

ऑरवेल यांनी लिहिले आहे "वृत्तपत्रासाठी लेख लिहावेत असा काहीसा हेतू मनात ठेवून मी स्पेनमध्ये आलो. परंतु स्पेनमध्ये पाऊल ठेवल्याबरोबरच मी सैन्यात दाखल झालो. त्याचे कारण त्यावेळी आणि त्या वातावरणात तीच एक गोष्ट माझ्या कल्पनेत बसण्याजोगी होती.......क्रांती ऐनभरात होती.......कामगार वर्गाने खऱ्या अर्थाने सत्तेचा ताबा घेऊन, तो वर्ग राज्यसकट हाकीत आहे असे ते शहर होते. या अशा प्रकारच्या शहरात आजवर

मी कधीच गेलेला नव्हतो. ही वेळ त्या अर्थाने अगदी पहिलीच वेळ होती. शहरातील इमारत लहान असो वा मोठी असो तिचा ताबा कामगारवर्गाकडे होता. प्रत्येक दुकानावर व कॅफेवर असे घोषित करणारा फलक होता की त्याचे सामुदाईकरण झालेले आहे.... उपहार–गृहातील नोकर आणि दुकानातील गुमास्ते विक्रेते हे तुमच्या नजरेला नजर भिडवीत होते, आणि तुम्ही त्यांच्या बरोबरीचे आहात अशी वागणूक तुम्हाला मिळे... क्रांतीकारी भिंतीचित्रे–पत्रिका (POSTERS) या सर्वत्रच होत्या... सर्व दिवसभर आणि मध्यरात्र उलटल्यानंतरही सार्वजिनक विजेरी कर्ण्यातून क्रांतिकारी गीते मोठ्या धामधूमीने वाजविली जात होती.. निदान या शहरात तरी धनवान वर्गाचे अस्तित्व हे जवळ जवळ निकालात निघालेले आहे असे निदान बाहेरून तरी भासत होते. फारच थोड्या परदेशी स्त्रिया-पुरुष यांच्याशिवाय 'चांगले कपडे घातलेले' कोणीही दिसत नव्हते. हे सर्व जे काही चाललेले होते, ते चांगलेच चमत्कारिक (QUEER) व हृदय हलविणारे होते. त्यातले बरेचसे मला समजतच नव्हते. त्यातले काही मला पसंत नव्हते, आवडतही नव्हते. परंतु ही जी सामाजिक अवस्था आहे, ती आपण प्राणाची बाजी लावावी अशी आहे हे मी ऑरवेलने ताबडतोब ओळखले."

ऑरवेलनी प्रवेश केलेले ते शहर होते बार्सिलोना. या शहरातील चर्चेस जाळण्यात आली होती. कॅफे आणि जोड्याना तकाकी देणारे कामगार यांचे सामुदाईकरण झालेले होते. आर्थिक समानतेचा अंमल अगदी काटेकोरपणे अंमलात आणला जात होता आणि 'चांगला पोशाख केलेले' ' लोक त्या शहरात गैरहजर होते. हे सारे जे वर्णन आहे ते नव–कॉन्झर्व्हेटिव्ह पंथियांच्या दृष्टीकोनातून पाहता हे एका पराकोटीच्या राजकीय दु:स्वप्नाचे (NIGHT-MARE) वर्णन आहे. तथापि भविष्य काळातील 'स्वतंत्र्य जगतासाठी स्थापन झालेल्या मंडळा'च्या या मार्गदर्शक चैतन्याने ते वर्णन "आपण ज्याच्याकाठी लढलेच पाहिजे अशी ती सामाजिक अवस्था आहे हे ताबडतोब जाणले होते."

स्पेनहून परतल्यानंतर कम्युनिस्टांबरोबरच्या ऑरवेल यांच्या वैयक्तिक युद्धाला सुरुवात झाली. मोठ्या तातडीने ते या युद्धात उतरले. परंतु येथे उन्मेखून लक्षात ठेवावयाचा मुद्दा एकच. ऑरवेल यांचा साम्यवादाला विरोध होता त्याचे स्वरूप कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षियाना अभिप्रेत आहे असे नव्हते. त्याउलट ते नेहमीच क्रांतीकारी राहिले होते. नव–कॉन्झर्व्हेटिव्ह ऑरवेल यांच्या लिखाणाचा हवाला वारंवार देतात. पण तसे करताना ऑरवेल यांचा कम्युनिझमला जो विरोध होता. त्याचे स्वरूप ते विसरतात किंवा त्या लिखाणातील त्याना गैरसोईचा भाग असेल तो बुद्धी पुरस्सर गाळून टाकतात. साम्यवाद ही एक प्रतिगामी शक्ती आहे. खरोखरीची आर्थिक व सामाजिक क्रांती दडपून टाकणे, हे त्या शक्तीचे ब्राद वाक्यच आहे, अशी ऑरवेल यांची श्रद्धा होती. ऑरवेल करीत असलेला साम्यवादाचा अत्यंत कडवट निषेध, त्याच श्रद्धेवर आधारीत होता. नव- कॉन्झर्व्हेटिवाना नेमका या वस्तुस्थितीचा विसर पडतो. खरीखुरी क्रांती होण्यास बुद्धीपुरस्सर प्रतिबंध करून, स्पेनमध्ये कामगारांचा

विश्वासघात कम्युनिस्टांनी केला, यावर ऑरवेल भर देत असत. "स्पेनमध्ये क्रांती होण्यास प्रतिबंध व्हावा असा सगळ्या जगाचा निश्चयच होता. **सोव्हियट युनियनच्या मदतीने विशेषतः कम्युनिस्ट पक्षाने क्रांतीविरुद्ध आपली सर्व ताकद पणास लाविली होती."** "कॉन्झर्व्हेटिव्ह वृत्तपत्रे सामान्यपणे अनेक वेळा चुकीच्या बातम्या छापतात. पण स्पेनमधील क्रांतीबाबत मॉस्कोने आर्थिक मदत केलेल्या स्पेनमधील लाल क्रांतीबाबत वाटेल त्या खोट्या बातम्या छापून ती वृत्तपत्रे नेहमीपेक्षाही अधिक पिसाटपणे चुकीची ठरली होती." **"स्पेनमध्ये क्रांती होण्यास प्रतिबंध- दुसऱ्या कोणत्याही पक्षापेक्षा अधिक प्रतिबंध कोणी केला असेल तर तो कम्युनिस्टपक्षियानी"** स्पेनमधील क्रांतीचा कम्युनिस्टानी केलेला विश्वासघात जगासमोर यावा या हेतू प्रामुख्याने मनात बाळगून ऑरवेल यांनी HOMAGE TO CATALONIA हे पुस्तक लिहिले होते. हे पुस्तक प्रसिद्ध होऊ नये म्हणून इंग्लंडमधील लाल निशाणी डाव्यानी पराकाष्ठा केली होती. स्पॅनिश यादवी युद्धातून गंभीर स्वरूपाच्या जखमा घेऊन बाहेर आल्यानंतर कॉन्झर्व्हेटिव्ह सर्वसामान्यपणे मानतात तेवढा ऑरवेल यांचा समाजवादाबद्दल भ्रमनिरास झाला नव्हता. त्याचे प्रमाण तसे बेताचेच होते. स्पेन सोडण्यापूर्वी थोडे दिवस अगोदर ऑरवेल यांनी लिहिले होते. "मी फारच विलोभनीय (WONDERFUL) गोष्टी पाहिल्या आहेत आणि यापूर्वी समाजवादावर माझा विश्वास कधीही नव्हती. पण सरतेशेवटी आता माझा समाजवादावर खरोखरच विश्वास आहे."

इ. स. १९३० सालात इंग्लंडमध्ये जे अनेक समाजवादी होते त्यांच्यापेक्षा ऑरवेल फारच वेगळे होते. इ. स. १९३० सालातील इंग्लिश समाजवादी आपल्या देशाबाहेरच्या देशात होणाऱ्या समाजवादी क्रांतीला फार जोरजोराने पाठिंबा देत, आणि स्वदेशातील भांडवलशाही बरोबर सुखासमाधानाने कालक्रमणा करीत. इ. स. १९३७ च्या जानेवारी महिन्यात ऑरवेल यांनी असा निष्कर्ष काढला होता की "भांडवलशाही उलथून टाकण्या-साठी (आपल्या स्वतःच्या देशात) काम केल्याशिवाय फॅसिझमला कोणी कसा विरोध करू शकेल हेच मला समजत नाही." हे सारे घडलेले आहे तरी पोधोरेटझ असा दावा करतात की "दुसऱ्या महायुद्धाला तोंड फुटल्यानंतर एका नव्या ऑरवेलचा जन्म झाला" ! आणि यास पुरावा म्हणून ऑरवेल यांचा My Country Right Or Left हा शब्दप्रयोग उद्धृत करून तो एक संस्मरणीय शब्दप्रयोग आहे असे सांगतात. खरे म्हणजे My Country Right Or Left हे ऑरवेल यांच्या निबंधाचे शिर्षक आहे. त्या निबंधात ऑरवेलनी असे जाहीर केले होते की, "फक्त क्रांतीच इंग्लंडला वाचविल" आणि असे लिहिल्यानंतर क्रांती साध्य करण्याकरिता वेळप्रसंगी हिंसा करावी लागेल या शक्यतेपासून त्यानी पळ काढला नाही. त्यांनी म्हटले होते. "लंडनमधील गटारातून रक्ताचे पाट वहाणारच. हे सांगण्याचे धाडस मी करीत आहे. होय आवश्यक असेल तर तसेही होऊ दे. रिटझ् या आलिशान हॉटेलमध्ये ब्रिटिश लाल फौजा वसती करून राहतील, तसे झाले तर फार

वर्षापासून अगदी वेगळ्या कारणाकरिता ज्या देशावर प्रेम करण्यास मला शिकविण्यात आले होते, ते इंग्लंड अजूनही आहे असेच मला वाटले.''

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात ऑरवेल यांच्या देशभक्तीच्या भावनेला नव्याने उधाण आले. मार्क्सवादी, डाव्या समाजवादातील अन्य घटक आणि शांततावादी यांच्यावर धारदार हल्ले त्यानी चढविले होते. या सर्वांच्या हेतूबद्दल त्यांनी शंका प्रदर्शित केली होती. परंतु खरे म्हणजे हा 'नवा ऑरवेल' नव्हताच. ऑरवेल यांनी लिहिलेले ROAD TO WIGAN PIER हे पुस्तक चांगलेच वादग्रस्त ठरून गाजले होते. त्या पुस्तकात जे विचार त्यांनी व्यक्त केलेले होते, त्याची ही वरची पट्टी होती. आपण डाव्या विचारसरणीचे टिकाकार आहोत आणि त्या विचारांची सदासद्विवेकबुद्धीही आहोत, या भूमिकेतून ऑरवेल लिहित होते. ही भूमिका त्यांनी आपण स्वत:हून पत्करलेली होती व तिच्याकडे अत्यंत गंभीरपणे ते पहात असत. या भूमिकेतून केलेली टिका नेहमीच न्याय होती असे नाही. गंमत अशी होती की अगदी नजिकच्या भूतकाळात ऑरवेल यांनी जी काही मते व्यक्त केली होती, ज्या राजकीय आणि सामाजिक मतांचा पुरस्कार करून विशिष्ट भूमिका घेतली होती, त्याच दृष्टीकोनावर भूमिकावर, व मतावर ऑरवेल यांनी कालांतराने धारदार शब्दात हल्ला चढवून त्यांचा निषेध केला होता ! परंतु भाषेचे वैभव त्यांच्याकडे असल्याकारणाने, ते अनेक संस्मरणीय शब्दप्रयोग अगदी सहजपणे करीत. नव-कॉन्झर्व्हेटिव्हानी ऑरवेल यांनी केलेल्या नर्म विनोदाचा, उपरोधाचा आणि त्यांच्या प्रामाणिकपणाचा अनेक वेळा गैरफायदा घेतलेला आहे. असे करताना ते संदर्भ सोडून ऑरवेल यांची मते उद्धृत करतात. 'रोड टू विगॅन पायर' मध्ये इंग्लिश समाजवादी चळवळीतील अवलियांचे मोठे खुमासदार व चित्ताकर्षक वर्णन आहे. पोघोरेटझना ते उद्धृत करणे फारच आवडते. ऑरवेलनी लिहिले आहे ''समाजवाद आणि साम्यवाद हे दोन शब्द इंग्लडमध्ये मोठ्या शक्तीशाली चुंबकीय शक्तीने, 'फळांचे रस तयार करणारे व पिणारे, नग्नावस्थेत रहाणे पसंत करणारे व त्यांच्या वसाहती स्थापणारे, चपला घालून चालणारे, क्वेकर पंथिय, निसर्गोपचारावर श्रद्धा असणारे, शांततावादी, आणि स्त्री- मुक्तीवादी अशा विचारांचे लोक, या सर्वांना आपल्याकडे खेचून घेतात, अशी भावना निर्माण होते.'' हे वर्णन नव- कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षियांच्या दृष्टीने चांगलेच विनोदी असले तरी समाजवादी समाजाच्या बाजूने सातत्याने केलेला युक्तीवाद हेच 'रोड टू विगॅन पायर' या पुस्तकाचे वैशिष्ट आहे ही वस्तुस्थिती सांगण्यास पोधोरेटझ विसरतात अथवा ती वस्तुस्थिती कोणाच्या लक्षात येणार नाही याची काळजी घेतात.

परंतु हे वरील परिच्छेदात उद्धृत केलेले वर्णन ज्या पानावर आहे त्याच्याच अगोदरच्या पानावर ऑरवेल यांनी वाचकाला असा इशारा दिला आहे की ''ते समजावादाच्या विरुद्ध नव्हे तर त्याच्याच वतीने युक्तीवाद करीत आहेत'' ते नुसता एवढाच कबुलीजवाब देत होते

की "ख्रिश्चन धर्माचे अनुयायी हे जसे त्या धर्माची अत्यंत वाईट जाहिरात आहेत, तसेच समाजवादांचेही आहे." ऑरवेल यांनी आपल्या कादंबऱ्यातून सामान्यमाणसाचे कौतुक व आदर केलेला आहे. या अशा सामान्य माणसाच्या दृष्टीकोनातून पहाता, मार्क्सवादी आणि समाजवादी चळवळीतील चक्रम लोक समाजवाद या ध्येयाची बदनामी करीत आहेत अशी भिती ऑरवेल याना वाटत होती. समाजवाद "हा ठोकळेबाज, पोथीवाज, आपण म्हणतो तेच सत्य असा दुराभिमानी पक्षिय भांडणे आणि तंटे, आणि अर्धा-कच्च्या 'प्रगतीवाद' अशा विचारांच्या पुटारवाली गाडला गेला आहे. सरतेशेवटी शेणाच्या डोंगराखाली गाडला गेलेल्या दडलेल्या हिऱ्याचे स्वरूप त्याला प्राप्त झाले आहे." या हिऱ्याला बाहेर काढून, त्याचे तेज त्याला परत दिले पाहिजे. 'न्याय आणि स्वातंत्र्य' या साठीच समाजवादाने उभे ठाकले पाहिजे. 'हा रोड टू बिगॅन पायर' या पुस्तकातील मध्यवर्ती सिद्धांत आहे. ही काही नव-कॉन्झर्व्हेटीव पंथियाचा पुरस्कार करणारी घोषणा खासच नाही.

ऑरेवल हे एकाकी होते. त्यांना आपला एकटेपणा भेडसावीत होता. ते ज्या युगात राहत होते. त्यात ते बसणारे नव्हते, अशा प्रकारचा युक्तीवाद अनेक वेळा करण्यात येतो. त्यात थोडे तथ्य जरूर आहे. परंतु ऑरवेल हे ज्या काळात राहत होते, त्याचेही ते होते. ऑरवेल यांनी असे गृहीत धरले होते की ब्रिटनमध्ये समाजवादी क्रांती झाली तरच ब्रिटन पराभूत होण्यातून बचावेल. मागे वळून पाहत हे असे गृहीत धरणे हे फारच भोळसटपणाचे लक्षण होते असे वाटेल. परंतु या ठिकाणी आपण हे लक्षात ठेवले पाहिजे की त्या काळातील हवा क्रांतीची होती. रिचर्ड रीज हे ऑरवेल यांचे एक मित्र. इ. स. १९३० च्या अखेरीस महा-विलक्षण अशा राजकीय उन्मादांकडे (Political hysteria) त्यांनी आपले लक्ष कालांतराने वेधले होते. त्यांना स्पष्टपणे व नेमकेपणाने असे आठवत होते की "The revolutionery toasts and dialectical materialist cocktails which flowed like water wherver progressive intellectuals qathered" यातील या अशा dialectical materialist cocktails मध्ये सामील होण्याचे ऑरवेल कटाक्षाने टाळीत. परंतु ते स्पेनमध्ये ज्या झींग आणण्याऱ्या क्रांतीकारी चैतन्याचे विशेषत: तेथे घडलेल्या 'महाविलक्षण' गोष्टीचे साथीदार होते, त्या सारखी परिस्थिती ब्रिटनमध्ये नव्हती. (अर्थात ब्रिटन काही स्पेन नव्हते) एवंच क्रांतीसाठी सैन्य पाठीशी नसलेले वा त्याचा पाठिंबा नसलेले इंग्लंडमधील बुद्धीजीवी हे भविष्यकाळातील क्रांतीचे नेते होते ! रीटझ् या आलिशान हॉटेलमध्ये ब्रिटनच्या लालसैनिकांची राहण्याची व्यवस्था होईल हे ऑरवेल यांचे स्वप्न दुसऱ्या महायुद्धांच्या दबावाखाली व तणावाखाली विराम पावले यांची ऑरवेल यांनी आपल्या स्वाभाविक प्रामाणिक प्रकृतीनुसार अशी कबुली दिली. त्यांनी सांगितले की, "युद्ध आणि क्रांती यांना अलग करताच येत नाही." हा आपला दृष्टीकोन "ही एका महान घोडचूक होती." आपण मनात जी स्वप्ने पहात होतो. त्या कारणाने तत्कालीन राजकीय वातावरणाचा अन्वयार्थ लावण्यात आपली चूक झाली असे त्यास वाटत होते.



अनुक्रमणिका

इंग्लंडने दुसरे महायुद्ध जिंकले. त्याच्या पाठोपाठ सार्वत्रिक निवडणुका आल्या. ऑरवेलनी आपले लक्ष त्याकडे वळविले. युद्धोत्तर काळात खऱ्या लोकशाही समाजाची उभारणी इंग्लंडमध्ये प्रस्थापित करण्यासाठी कोणत्या प्रकारची सामाजिक व्यवस्था असावयास हवी हा त्या काळात ऑरवेल यांच्या चिंतनाचा विषय होता. कॉर्न्झर्व्हेटीव पक्ष एक झंझावती निवडणूक प्रचार मोहीम हाती घेईल. आपल्या नेतृत्वाखालील महायुद्धात विजय प्राप्त झाला आहे असे तो पक्ष सांगेल. त्या स्वरूपात तो पक्ष लोकांपुढे सादर केला जाईल... या पृथ्वीतलावर जे काही शक्य आहे ते सारे आपण देणार आहोत असेही तो पक्ष सांगेल. एकदा सत्तेवर आल्यानंतर ही सारी आश्वासने तो पक्ष गटारात फेकून देईल, अशी भिती ऑरवेल यांच्या मनात त्या काळी होती. इ. स. १९४५ सालच्या लेबर पक्षाच्या विजयाचा आनंद ऑरवेल यांना जरूर झाला. 'पार्टीझान रिव्हू' या अमेरिकन द्वैमासिकात ते त्या काळी 'लंडन वार्तापत्र' या नावाचा स्तंभ लिहित असत. त्यातील एका वार्तापत्रात 'लेबर पक्षाच्या' मनात लोकशाही समाजवाद खरोखरच निर्माण करायचा असेल. तर त्याने कोठच्या गोष्टी केल्या पाहिजेत. याची यादी ऑरवेल यांनी पेश केली होती. (१) जमिन, कोळश्याच्या खाणी, रेल्वे, विज उत्पादन आणि वितरण, व तत्सम इतर गोष्टी आणि बँका यांचे राष्ट्रीयकरण **(२) भारताला - निदान कमीत कमी वसाहतीच्या दर्जाचे स्वराज्य (DOMINION STATUS) दिलेच पाहिजे.** (३) नोकरशाही, सैन्य, परराष्ट्र वकिलाती व त्यातील नोकरवर्ग यांचे शुद्धीकरण (Purge),उजव्या गटातील लोकांनी जनताप्रिय धोरणाचा सुरूंग लावू नये यासाठी हे आवश्यक आहे असे त्याचे कारणही त्यानी नमूद केले होते. (४) "जमिनीचे राष्ट्रीय करण" याचा अर्थ ऑरवेल यांनी पुढील प्रमाणे सांगितला होता, "प्रत्येकाकडे किती जमीन असावी याची कमाल मर्यादा निश्चित केली गेली पाहिजे. पंधरा एकरा पलिकडे ती नसावी ........ शहरातील सर्व जमिनीचे राष्ट्रीय करण करावे."

ऑरवेल यांनी आपल्या पूर्वीच्या लिखाणातून व्यक्तीच्या उत्पन्नावर काटेकोरपणे मर्यादा असावी असे प्रतिपादले होते. त्यांच्या मते सर्व कर वजा जाता राहिलेले जास्तीत जास्त उत्पन्न हे कमीत कमी उत्पन्नाशी दहा ते एक प्रमाणात असावे. ते त्या पलिकडे असता कामा नये. तसेच त्यानी लोकशाही विचारधारे नुसार शिक्षण पद्धतीत सुधारणा व्हावयास हवी असेही सांगितले होते. 'पब्लिक स्कूल आणि जुनी विद्यापिठे' यांना जे स्वातंत्र्य आहे ते काढून घेऊन, केवळ हुषारी व कार्यक्षमता हे गुण लक्षात घेऊन निवड झालेल्या विद्यार्थ्यांचा पूर त्या शाळा व विद्यापिठातून आला पाहिजे. या सर्व विद्यार्थ्यांना सरकारी मदत दिली पाहिजे." या गोष्टी प्रथम करून त्या शैक्षणिक सुधारणाना सुरवात केली पाहिजे. लेबर पक्षाचे सरकारने लोकशाही-समाजवादी समाजरचना प्रत्यक्षात आणण्यासाठी या सर्व गोष्टी खरोखरच केल्या पाहिजेत, हाऊस ऑफ लॉर्डसला टाळे लावले पाहिजे, आणि चर्च ऑफ इंग्लंड विस्थापित केले पाहिजे." राजघरणे व त्याचे हक्क हे तसेच ठेवू देण्यास त्यानी मोठ्या नाखूषीने मान्यता दिली होती, "नगारे, झेंडे, आणि देशनिष्ठा दर्शविणारी संचलने समाजात



अनुक्रमणिका

असल्याशिवाय आधुनिक लोकाना जीवनच अशक्य असते.'' असे असल्याकारणाने ज्या कोणा व्यक्तीकडे काहीही सत्ता नाही अशा व्यक्तीच्या नेतृत्वाची आधुनिकानी पूजा बांधणे हे ऑरवेल यांना त्या मानाने नाखूषीने कां होईना अधिक पंसतीचे होते, हे त्यांनी 'राजघराण्यास' मान्यता देण्याबाबतचे कारण सांगितले होतो.

ऑरवेल यांच्या या सर्व मागण्या व आदेश हे किती शहाणपणाचे होते वा त्यातले किती प्रत्यक्ष कार्यवाहीत येऊ शकले असते, याचे मूल्यमापन या ठिकाणी प्रस्तूत नाही. समाजवादाच्या उभारणीत कोणत्या गोष्टी आवश्यक आहेत, याबद्दल ऑरवेल याना जरूर खूपच आस्था होती. मानवी प्रगती व्हावी या यासाठी एक कार्यक्रम पत्रिका या स्वरूपात त्याकडे पाहिले पाहिजे. तेच निर्देशित करणे एवढाच मर्यादीत हेतू त्या मागे होता. कार्यक्रम पत्रिकेतील या साऱ्या गोष्टी नव-कॉन्झर्व्हेटीव वादाला मार्गदर्शक चैतन्या सारख्या आहेत अशी कोणी अपेक्षा करील का?

नव-कॉन्झर्व्हेटीवाना अडचणीत टाकणारी आणखी एक गोष्ट म्हणजे रोमन कॅथलिक चर्च विरुद्ध ऑरवेल यांनी उघडलेली आघाडी. ऑरवेल इ. स. १९३२ पासून, आपल्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत या चर्च विरुद्ध वेळप्रसंगी लिहित असत. रोमन कॅथलिक पंथाची नुकतीच दिक्षा घेतलेले लोक आणि कॅथलिक धर्मशास्त्रज्ञ (Theologians) यांच्याबद्दल उपरोधाने लिहणे, हा ऑरवेल यांचा आवडता उद्योग होता. विचार आणि भाषण स्वातंत्र्य, मानवी समानता, ऐहीक सुखात वाढ करणारा समाज या गोष्टी विरुद्ध नेहमी असणे आणि त्यासाठी आपला प्रभाव वापरणे हा रोमन कॅथलिक चर्चचा स्थाईभाव आहे अशी ऑरवेल यांची श्रद्धा होती. कॅथलिक हे केवळ मानवतावादी सुधारणा विरुद्ध नव्हते, तर ते "वस्तुनिष्ठपणे आणि आत्मनिष्ठपणे" फॅसिस्टांच्या बाजूचे होते; असे ऑरवेल यांचे मत होते. या कारणामुळे ऑरवेल यांचे रोमन कॅथलिक चर्च बरोबर असलेले भांडण कधीही मिटले नाही. एक नैमत्तिक कर्म या स्वरूपात चर्चची लूटालूट स्पेन मध्ये सर्वत्र करण्यात येत होती आणि भांडवलशाही षडयंत्राचा स्पॅनिग चर्च हा भाग आहे हे स्पेनमध्ये सर्वत्र ज्ञात आहे असे जेव्हा ऑरवेल यांना आढळून आले तेव्हा ते फारच खूष झाले होते. दुसऱ्या महायुद्धाच्या काळ्याकूट्ट दिवसात इंग्लिश कॅथलिक हे देशद्रोह करण्याचा कट करीत आहेत असा जवळं जवळ आरोप ऑरवेल यांनी केला होता. "पेताँ सरकार सारखे सरकार ब्रिटनमध्ये प्रस्थापित झाले, तर त्या सरकारला बहुतांशाने इंग्लिश कॅथलिक समाजाचा आधार घ्यावा लागेल. "इंग्लड मधील लोकशाहीचे खरेखुरे, जाणीवपूर्वक, तर्कशुद्ध विचार करणारे आणि बुद्धीवान विरोधक कोण असतील तर ते फक्त रोमन कॅथलिक.'' असे ऑरवेल यांनी इ. स. १९४१ साली लिहले होते.

वाङ्मयीन जगतातही रोमन कॅथलिक पंथियांचा प्रभाव अनिष्ट असाच होता, असे ऑरवेल यांना वाटत असे. "सनातनी कर्मठ रोमन कॅथलिक पंथवाद आणि बौद्धिक

स्वातंत्र्याचा विनाश'' या हातात हात घालून जाणाऱ्या गोष्टी आहेत. काही विशिष्ट वाङ्मयीन प्रकारावर विषेशत: कादंबरीवर त्या रोमन कॅथलिक पंथवादाचा असा परिणाम होतो की ते वाङ्मय प्रकार दडपलेच जातात. "चेस्टरटन ते ग्रॅहम ग्रीन पर्यंतच्या सर्व कॅथलिक लेखकावर'' ऑरवेल असा आरोप करीत की, सनातनी कर्मठ रोमन कॅथलिक पंथाचे प्रचारक बनून त्यानी आपली बुद्धी भ्रष्ट केली आहे; आणि आपल्या साहित्य निर्मितीला नुकसान पोचविले आहे.

ऑरवेल यांचा राग असा पराकोटीला पोचावा, असे रोम कॅथलिक चर्चने त्या काळी प्रत्यक्षात काय केले होते? हुकुमशाहा मुसलोनी आणि फ्रॅंको यांना पाठिंबा दिला होता, शरमेने मान खाली घालावी लागेल असा समझोता हिटलर बरोबर केला होता, अनेक पुस्तकांवर व लेखकावर बंदी घालण्याचे फर्मान काढले होते इत्यादी पोप जॉन XXIII हे पोपच्या गादीवर बसल्यानंतर रोमन कॅथलिक चर्चमध्ये फार फरक झाला आहे हे खरे आहे. परंतु ऑरवेल यांचा ज्या चर्चवर ते प्रतिगामी, एकाक्ष आहे असा आरोप आहे, तेच चर्च नव-कॉन्झर्व्हेटीवाना परत यावे असे वाटते. त्याचे पुनरुस्थान करण्याची आशा ते बाळगून असतात. मग अशा परिस्थितीत नव-कॉन्झर्व्हेटीवाना ऑरवेल हे आपलेच आहेत असे कसे सांगता येईल.

पण तसा प्रयत्न ते सातत्याने करीतच असतात. इ. स. १९८३ साली रॉबर्ट डी कामरा यांनी एक निबंध लिहला. त्यात ऑरवेल यांना आदरांजली वाहताना. त्यानी म्हटले होते. "फार प्रचंड संख्येचे सैन्य, अगदी सुसज्ज व अधिक संहारकारक असा दारूगोळा, मुक्ती करण्या करता होणाऱ्या चळवळी आणि बाजार बसवीची निष्ठा, या साऱ्या गोष्टी काळोख आणणाऱ्या ज्या शक्ती आहेत त्यांच्यापाशी आहेत; आणि प्रकाशाच्या बाजूला ऑरवेल आहेत, आणि त्यांच्यापासून आमची बाजू शक्ती प्राप्त करून घेते.'' अर्थात असा प्रश्न पडेल की आतल्या 'प्रकाशाच्या शक्ती' कोणत्या आणि काळोख आणणाऱ्या शक्ती कोणत्या? बर्ट्रांड रसेल यांनी मागेच सांगून ठेवले आहे प्रश्न फक्त व्याख्या करण्याचा असतो.

'नव-कॉन्झर्व्हेटीव ऑरवेल' नांवाचा ग्रामउद्योग इतक्या ऐन भरात कसा आला याचे संशोधन करण्याअगोदर, हे त्याना कसे शक्य झाले याची थोडक्यात नोंद घेणे आवश्यक आहे. असे केल्याने ही अशक्य गोष्ट – एक सच्चा समाजवादी हा मूलत: नव-कॉन्झर्व्हेटीव्ह आहे अशी हवा निर्माण करणे– कोठच्या प्रकारच्या चलाखीने शक्य झाले व सिद्धही झाले! हे आपणास समजावून घेता येईल. त्यासाठी आता नेहमीच शास्त्रापूत ठरलेला मार्ग वापरण्यात आला होता. समाजवाद, सोव्हियट-रशिया, चीन व इतर कम्युनिस्ट पक्षियांचा साम्यवाद आणि मार्क्सवाद या स्पष्टपणे वेगवेगळ्या विचारधारा आहेत. व त्या वेगवेगळ्या संकल्पनावर आधारीत आहेत. परंतु या वेगळेपणाकडे बुद्धिपूरस्सर दुर्लक्ष करावयाचे. या दुर्लक्ष करण्यात अर्थात दिलचस्प असे बारके फरक जरूर असतात. (जर्मन लोकशाही समाजा-

वादी नेते विली ब्रॅन्ड यांनी केलेल्या विश्लेषणाचे स्मरण वाचकानी या ठिकाणी करावे) ऑरवेल यांनी सोव्हिएट युनियन, इतर देशातील कम्युनिस्ट पक्षिय, मार्क्सवादी, तानाशाहीचा पुरस्कार करणारे समाजवादी पंथ आणि शांततावादी या सर्वावर टोकदार, धारदार व प्रखर असे हल्ले अनेक वेळा केले होते. म्हणूनच ऑरवेल यांच्या लिखाणातील काही भागांची अगदी काळजीपूर्व निवड करून त्यांचा मालिका गुंफावयाची. त्यातून नव-कॉन्झर्व्हेटव्हि काढत असलेले निष्कर्ष बरोबर आहेत हे आपोआपच स्पष्टपणे सिद्ध होते! पण हे करीत असताना ऑरवेल यांनी पुरस्कारलेला समाजवादी कार्यक्रम हा फारच काळजीपूर्वकपणे दडवून ठेवणे तसेच त्यानी सोव्हिएट युनियन आणि साम्यवादी यावर केलेल्या टिकेची खरी प्रकृती काय होती याकडे बहुतांशाने दुर्लक्ष करणे. हे केले की काम भागते. परंतु १९३०-४० च्या दरम्यान ऑरवेल यांनी केलेले लिखाण इतक्या सहजासहजी सर्वस्वी बाजूस सारता येत नाही. मग या अडचणीतून बाहेर पडण्यासाठी काय करायचे? उत्तर अगदी सोप आहे. दुसऱ्या महायुद्धाच्या सुरवातीच्या काळात ऑरवेल यांच्या विचारात आमुलाग्र परिवर्तन होऊन ते देशभक्त बनले असे भासवावयाचे ! मि. डी. कामेरा यांनी या प्रक्रियेचे वर्णन त्याना हवे तसे केले आहे. "इंग्लंडच्या दारात 'गॉथ' येऊन उभे राहिल्यानंतर ऑरवेल यांची" "डावी धडपड लगेच थांबली." या विधानातील दोन गफलती, मोठ्या चतुराईने वाचकाच्या गळी उतरविण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे. (१) देशभक्तीचा मक्ता कोणत्याही देशातील फक्त कॉर्न्झर्व्हेटिव्ह पंथियाकडे वा उजाव्या गटांकडेच असतो. (२) म्हणून कोणीही केलेले देशभक्तीपर विधान हे त्या व्यक्तीने कॉर्न्झर्व्हेटीव पंथाची 'दिक्षा' घेतल्याची निशाणी ठरते ! परंतु ऑरवेल ते तसे फारच अडचणीचे आहेत. ऑरवेल यांच्याबाबतचा प्रश्न अगदी वेगळ्या स्वरूपाचा आहे. इंग्लंडच्या दारात येऊन उभ्या राहिलेल्या गॉथस पासून सरंक्षण करावयाचे असेल तर त्यासाठी जहाल अशी समाजवादी क्रांती ब्रिटनमध्ये होणे आवश्यक आहे. तसे झाले तरच ब्रिटन या आपत्तीतून वाचेल असे त्यांचे मत होते. जसा जसा युद्धाचा भडका व काळ वाढत गेला तसतशी ऑरवेल यांची 'डावी धडपड' स्पष्ट अशा प्रतिपादनाकरवी आविष्कृत होत होती. या लेखात त्यांनी पुरस्कारलेल्या अनेक समाजवादी सुधारणांची यादी देण्यात आलेली आहे. त्यावरून हा मुद्दा वाचकाला स्पष्ट व्हावा. परंतु आरॅवेल यांच्या देशभक्तीतील कॉन्झर्व्हेटीव पक्षियाना अभिप्रेत असलेला गर्भितार्थ ऑरवेल यांच्या गावीही नसल्याकारणाने, ते आपल्या मृत्यूपर्यंत (इ. स. १९९०) 'मी ऑरवेल समाजवादी आहे' असे सांगताच राहिले.

केवळ अमेरिकेतील नव-कॉर्न्झर्व्हेटीव्ह ऑरवेल हे 'आपले'च आहेत असे सांगत होते वा सांगतात असे नाही. इंग्लंडमध्येही असे प्रयत्न झाले पण ते फारच थोडा काळ टिकले. याचे कारण ऑरवेल यांना अगदी जवळिकेने ओळखणारी माणसे हयात होती. त्यांचे इ. स. १९३० ते १९४० च्या दरम्यानचे व त्यानंतरचेही लिखाण चांगलेच परिचित असलेले

लोकही जीवंत होते, हे असावे. मुद्दा तो नाही. ऑरवेल यांना 'आपलेसे' करण्याचा प्रयत्न इंग्लंडमध्ये इ. स. १९४९ सालच्या सुरवातीपासून होत होते. हा मुद्दा आहे. नमुन्या दाखल एकत्र उदाहरण. डचेस ऑफ आथोल्ल (ATHOLL) यांची विनोदी ठरावी अशी राजकीय वाटचाल. स्पॅनिश यादवी युद्धाच्या काळात त्यांना 'लाल डचेस' या नांवाने अत्यंत प्रेमाने व जवळकीने संबोधण्यात येते. या बाई डेली वर्कर या कम्युनिस्ट दैनिकाची एक लाडकी व्यक्ती. कम्युनिस्ट त्या काळी ज्या खोट्या गोष्टी करीत होते, सांगत होते त्यांना पाठिंबा देण्यासाठी या बाई आपले सामाजिक वजन कितीतरी प्रमाणात खर्च करीत होत्या. असे ऑरवेल यांनी आपल्या आठवणीत नमूद केले आहे. परंतु इ. स. १९४९ नंतर डचेस ऑफ आथोल्ला बाईंचे एकाएकी हृदयपरिवर्तने झाले. या तोवरच्या 'लाल डचेस' बाईनी अगदी एकाएकी घुमजाव करून त्या उजव्या राजकीय पक्षात दाखल झाल्या. खरे, म्हणजे त्यावेळी फारच उशीर झाला होता. तरीही या भूतपूर्व 'लाल डचेस'ने पूर्व युरोपमधील रशियन साम्राज्याविरुद्ध मोहीम आपल्या हाती घेतली. वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास डावीकडून पार उजवीकडे असा नाट्यपूर्ण राजकीय बद्दल या बाईच्यात झाला होता. आधुनिक नव-कॉन्झर्व्हेटीवांचे हे व्यवच्छेदक लक्षणच आहे. या पूर्वी ज्यांचा उल्लेख झाला आहे त्या नार्मन पोधोरटझ यांची 'कमिटी फॉर दी फ्री वर्ल्ड' ही त्या मानाने अधिक नेमस्त व मर्यादीत आवृत्ती ठरेल, अशी 'ॲन्टी कम्युनिस्ट लीग फॉर युरोपियन फ्रीडम' (युरोपीय स्वातंत्र्यासाठी कम्युनिस्ट विरोधकांची संघटना) या संघटनेच्या स्थापनेत या भूतपूर्व 'लाल डचेस' बाईनी पुढाकार घेतला ! ऑरवेल यांनी या संघटनेची कधीही दखल घेतली नाही, तिच्याकडे लक्षही दिले नाही. असे होते तरी त्यानी त्या संघटनेचे सदस्य व्हावे व त्या संघटनेने आयोजीत केलेल्या एका मेळाव्यासमोर भाषण करावे यासाठी त्याना निमंत्रण देण्यात आले होते. नव-कॉन्झर्व्हेटीपैकी जे कोणी आधुनिक रुंगखट असतील त्यांनी ऑरवेल यांनी या नियंत्रणास दिलेल्या प्रतिसादातील गर्भितार्थाचा विचार करणे फलदाई ठरेल. ऑरवेल यांनी भूतपूर्व 'लाल डचेस' यांना पाठविलेले पत्र पुढीलप्रमाणे होते.

**प्रिय डचेस ऑफ आथोल्ल**

लीग फॉर युरोपियन फ्रीडम साठी मला बोलता येणार नाही, याबद्दल मला खेद आहे. आपण सुचविलेली तारीख मला गैरसोईची व अशक्य आहे असे सांगून मला सुटका करून घेता येईल. मला युगोस्लावियाबद्दल काहीही माहिती नाही. (खरे म्हणजे हे सत्यच आहे) हे कारणही दाखविता येईल. परंतु तसे करण्याऐवजी साधे सत्य अगदी साध्या शब्दात सांगतो. मी आपल्या 'लीगची' जी अंतिम उद्दिष्टे आहेत त्यांच्याशी मी सहमत नाही. याचे कारण ब्रिटिश साम्राज्यशाहीबद्दल ज्या संस्थेकडे बोलण्यासारखे काहीही नाही ती संस्था युरोपमधील लोकशाहीचे संरक्षण करण्याचा दावा करते. अशा प्रकारच्या मूलतः कॉन्झर्व्हेटीव संस्थेबरोबर मला संलग्न होताच येणार नाही. भारताला ब्रिटिशांची राजवट नको आहे. अशा राजवटीचा

शेवट व्हावा या मुद्यावर जर आपण भर देणार असलो तरच पोलंड, युगोस्लविया इत्यादी देशात जे गुन्हे सध्या घडत आहेत त्याचा फक्त आपल्याला निषेध करता येईल. सोव्हिएट तानाशाही या, हुकुमशाहीचा आणि अशा विचारांचा ब्रिटनवर प्रचंड विषारी असा प्रभाव आहे. म्हणून त्या देशांचा मी कितीही द्वेष करीत असलो, तरी मी डाव्या गटाचा मनुष्य आहे आणि त्या गटात राहूनच मला काम केले पाहिजे.

आपला

जॉर्ज ऑरवेल,

धार्मिक बाट्याप्रमाणेच राजकीय बाट्येही फार जोराने, मोठ्याने ओरडून बांग देतात. त्याजबरोबर हे सारेजण आपली जी उद्दिष्टे आहेत, त्याकडे आपल्या धर्माबाहेर (पक्षाबाहेर) असलेला प्रत्येक जण, धर्म वा पक्ष बदलण्यास परिपक्व झाला आहे, उत्सुक आहे असे गृहीत धरतात. परंतु जे कोणी जॉर्ज ऑरवेल यांची पुस्तके काळजी पूर्वक वाचतील, ते असा निष्कर्ष काढतील की, नव-कॉर्न्झर्व्हेटीव पक्षाची दिक्षा घेण्यास ते अजिबात परिपक्व झाले नव्हते वा उत्सुकही नव्हते. तसे काही होण्याची सुतराम शक्यता नव्हती. "आपल्या हृदयाचा कब्जा घेण्यास ज्या नगण्य व दुर्गंधी येणाऱ्या सनातनी विचारसरणी उत्सुक आहेत, त्यापैकी नव-कॉर्न्झर्व्हेटीववाद ही एक आहे" असे सांगून त्यानी तो 'वाद' निकालात काढण्याची अधिक शक्यता होती असे दिसते.

३

एवढ्या विवेचनानंतर मुख्य मुद्दा रहातोच. ऑरवेल यांना एकाएकी इतकी प्रचंड लोकप्रियता का प्राप्त व्हावी? ऑरवेल यांच्या राजकीय आणि सामाजिक दृष्टीकोनामुळे रागाविलेले असंख्य लोक होते. विशेषत: इ. स. १९३० ते १९५० च्या दरम्यान युरोप-इंग्लंडमध्ये कम्युनिस्ट पक्षियांची बरीच चलती होती. ऑरवेल तर प्रखर असे कम्युनिस्ट विरोधक. याच कारणामुळे कम्युनिस्ट व त्यांचे सहप्रवासी, कम्युनिस्ट विचारधारा मान्य असून कम्युनिस्ट पक्षाचे सदस्य नसलेले लोक, नवे-डावे पंथी (NEW LEET) सोव्हिएट युनियनबद्दल अपार प्रेम बाळगणारे उदारमतवादी आणि स्वत:स मार्क्सवादी म्हणविणारे तथाकथित स्वतंत्र लोक या साऱ्यांचा ऑरवेल विरोधकात समावेश होता. या सर्वांनी अनेक प्रकारचे घट-पट करून ऑरवेल हे समाजवादी कसे नाहीत ते मानवतावादी मूल्यांच्या बाजूचे कसे नाहीत इत्यादी मुद्दे चतुराईने सिद्ध करण्याचा सातत्याने प्रयत्न केला होता. अजूनही काही लाल-निशाणी लोक हा उद्योग करीतच असतात. यात ऑरवेल यांच्या प्रकृती वैशिष्टाने भर पडली होती. आपल्या मनाला पटेल व वाटेल त्यानुसारच अगदी परखड प्रतिक्रिया व्यक्त करण्याच्या ऑरवेल यांच्या सवयीमुळे अनेक साहित्य समीक्षकही ऑरवेल यांच्या विरोधात होते. परंतु या साऱ्या नामवंताच्या लिखाणाचा परिणाम सर्वसामान्य पाश्चिमात्त्य माणसाच्या मनावर झालेला दिसत नाही. याचे कारण काय असू शकेल?

काहीच्या मते ऑरवेल यांच्या लेखनशैलीला त्यांच्या प्रामाणिकपणाची जोड होती. याबद्दलच्या अनेक सत्यकथा पाश्चिमात्त्य जगतात चांगल्या परिचित होत्या व आहेतही. रिचर्ड रीज नांवाचे एक प्रख्यातं समीक्षक ऑरवेल हे धार्मिक असे निरीश्वरवादी, आणि महारोग्यांच्या जखमा चाटून,' मंहारोग्याना दिलासा देंण्याकरता सदैव तयार असलेला तो 'संत' असे रीज सांगतात. हीच त्यांची प्रतिमा त्यांच्या अनेक नामवंत विरोधकानी कितीही गिल्ला केला, तरी ती जशींच्या तशी अगदी एकही ओरखडा न येता जनमानसात चांगली घट्ट मूळे धरून बसली होती. ऑरवेल यांच्या लिखाणात ते बहाणा करून (पोझ घेऊन) नाटकीपणाने लिहीत होतें, असा जरासा संशय येणारे काहीही नाही. Down and out in London and Paris या पुस्तकांत त्यांनी गरीबी, व समाजातील तळागळातील लोकांचे जीवन जे स्वेच्छा पत्करले होते त्याचे मोठे खुमासदार व वाचनीय वर्णन आहे. या वर्णनात त्या प्रकारच्या जीवनातील बारकावे ज़ॉर्ज ऑरवेल यांनी टीपलेले आहेत. परंतु ऑरवेल वाचकाला असेही बजावतात की "मी हे इतक्या अलिप्तपणे करू शकलो, त्या जीवनातला असणारा विनोदही अनुभवला, याचे कारण माझ्या मनात असे कुठेतरी डोकावत होते की या जीवनाचा मला ज्यावेळी वाटेल त्यावेळी त्याग करून, मी पुन्हा एकदा माझ्या नेहमीच्या संपन्न जीवनाकडे परत जाणार आहे." त्यांनी या पुस्तकाचा जो शेवट केला आहे तो पुढील शब्दात –

My story ends here. It is a fairly trivial story, and I can only hope that it has been interesting in the same way as a travel diary is interesting. I can at least say, Here is the world that awaits you if you are ever penniless. Some day I want to explore that world more thorouhhly. I should like to know people like Mario and Paddy and Bill the moocher, not from casual encounters, but intimately; I should like to understand what really goes on in the souls of plongeurs and ramps and Embankmet sleepers. At present I do not feel that I have seen more than the fringe of poverty.

Still I can point to one or two things I have definitely learned by being hard up. I shall never again think that all tramps are drunken scounderls, nor expect a beggar to be grateful when I give him a penny, nor be surprised if men out of work lack energy, nor subscribe to the Salvation Army, nor pawn my clothes, nor refuse a handbill, nor enjoy a meal at a smart restaurant. That is the beginning. "म्हणूनच प्रख्यात अमेरिकन समीक्षक लिओनेल ट्रिलिंग यांना" खरोखरीचा सदगुणी गृहस्थ ( Truely Virtuous man ) असे म्हणून त्यांचा गौरव केला आहे.ते सर्वसामान्य वाचकास (बुजुर्ग साहित्य समीक्षकाना न पटले

तरी) पटते. या अशा त्यांच्या लाखो वाचकांच्या मते 'देवता- स्वरूप' (Icon) झालेले ऑरवेल, व प्रत्यक्ष व्यावहारीक जीवनातील ऑरवेल या दोन्ही गोष्टी अगदी तंतोतंत मिळत्या जुळत्या आहेत. असे होते म्हणूनच एके काळी सोव्हिएट युनियनच्या वतीने (व तिच्या नामवंत समर्थकानी त्या प्रचाराला साथ दिली तरीही) ऑरवेल यांच्या विरुद्ध ऑरवेल हे अमेरिकन साम्राज्य शाहीचे हस्तक आहेत असा जो विषारी प्रचार चालू होता त्याचा प्रभाव जनमानसावर पडला नाही. एवंच ऑरवेल हे 'देवता स्वरूप' आहेत या शिवाय दुसरी कोठचीही प्रतिमा जनमानसात कायम ठसली नाही. एक कारण असे असू शकेल की ऑरवेल यांच्या विरुद्ध गरळ ओकणारे रशियन राज्यकर्ते हे स्वत:च अमेरिकन साम्राज्यशाहीपेक्षा अधिक कठोर, व साधी माणुसकी नसलेली साम्राज्यशाही आहे हे त्या सामान्य युरोपियनानी प्रत्यक्ष अनुभवले असावे. ते काहीही असूदे. एवंच 'संत जॉर्ज ऑरवेल' हे वर्णन जनमानसातील ऑरवेल यांच्या प्रतिमेजवळ अधिक प्रमाणात जाते. दुसऱ्या महायुद्धापूर्वीचा व त्यानंतरचा काळच लेखकांची व विचारवंताची कडी परीक्षा पाहाणारा होता भारतीयानी आणीबाणी आठवावी. विचार स्वातंत्र्य आणि लेखन स्वातंत्र्य याबद्दल नेहमी तारस्वराने ओरडणारे लेखक कांय करत होते? समाजवादी नानासाहेब गोरे यांनी त्यावेळी म्हटले होते की, "इंदिरा गांधीचा चाबूक हवेतच गरगर फिरत होता. त्याचे फटके कोणाच्याही पाठीवर पडले नव्हते तो ही पांगापांग." युरोपमध्ये परिस्थिती नानासाहेब गोरे वर्णन करतात तशी नव्हती, कारण तो 'युरोप' होता ! या अशा परिस्थितीत ऑरवेल यांचे वागणे सामान्य माणसांच्या तर्कशास्त्रात बसणारे नव्हते असे होते तरी सुद्धा ऑरवेल यांनी पारदर्शिक प्रामाणिकपणा ही आपली प्रकृतीच आहे तो आपल्याला अंगभूतगुण आहे हे सिद्ध केले होते. ऑरवेल यांनी असे लिहिले आहे की, "संतकोटी' ही अवस्था ही प्रत्येक मानवाने काहीहो झाले तरी टाळावी." हे ऑरवेल यांनी लिहिले असले तरी ऑरवेल यांचे 'संतपण' हे कमी 'संतपणाचे' ठरत नाही. ऑरवेल हे एक धर्मातीत (secular) समाजवादी संत, म्हणूनच विसाव्या शतकाला अनुरूप असा आणि अगदी परिपूर्णपणे समाजवादी विचारांचा आशावादी मनुष्य. त्यांनी एके ठिकाणी लिहले आहे, "माणूस' आणि 'ईश्वर' यात निवड केलीच पाहिजे. सर्व जहाल पंथिय प्रगती वाद्यांनी अगदी मिळमिळीत उदारमतवाद्यापासून ते आत्यंतिक अराज्यवाद्यापर्यंत या सर्वांनी वस्तुत: 'माणसाचीच निवड केलेली आहे'."

एवंच ते काहीही असो. मुळातील मुद्दा रहातोच. साहित्य समीक्षकाना ऑरवेल यांचे मोठेपण कां समजले नाही? विचारवंत म्हणून त्यांची जी वैशिष्टे आहेत ती कां लक्षात येऊ नयेत? सामान्य वाचकाने, ऑरवेल यांच्या विरुद्ध कितीही प्रचार झाला, तरी ती वैशिष्टे व मोठेपण टिपले होते हे कोणासही नाकारता येणार नाही.

---

जी व्यक्ती कधीही कोणालाही शत्रू करीत नाही ती व्यक्ती मित्रही जोडीत नाही.

–टेनिसन

# समाज आणि प्रकाशक

## ॲलन लेनचे पेन्गिवन प्रकाशन

**–सौ. सुमती जोशी**

तुम्हाला ॲलन लेन यांचे स्मारक बघायचे असेल तर तुमच्या आसपासच्या इंग्रजी पुस्तकविक्रेत्याच्या दुकानात पाहा. पेन्गिवनचे मानचिन्ह असलेली अगणित पुस्तके तुमच्या नजरेस पडतील. पेन्गिवन पेपरबॅक पुस्तकांच्या स्वरुपात या पुस्तकाचे जनक 'ॲलन लेन' अप्रत्यक्षपणे आपल्याला भेटतात. उत्तमोत्तम कथा कादंबऱ्यासारखे वाङ्मय तसेच वैचारिक ग्रंथांची ज्ञानगंगा कमीत कमी मोबदल्यात सामान्य जनतेपर्यंत आणण्याचे महत्त्वाचे काम ॲलन लेन यांनी केले. विसाव्या शतकातील इंग्लंडमधील प्रकाशनव्यवसायाचा चालता बोलता इतिहास म्हणजे ॲलन लेन यांचे कार्य. इंग्लंडमधील हवामानामुळे तिथल्या लोकाना बाहेर जाताना ओव्हरकोट घालावा लागतो. या ओव्हरकोटला मोठाले खिसे असतात. या खिशात राहतील अशा आकाराची पुस्तके काढावीत असे ॲल्न लेन याना वाटले. हीच पेन्गिवनची 'पॉकिट बुकस' दुसऱ्या महायुद्धानंतर जेव्हा पेन्गिवन प्रकाशनाची अमेरिकेत शाखा निघाली तेव्हा या 'पॉकेट बुकस'चे नामांतरण 'पेपरबॅक' असे झाले. 'पेपरबॅक पुस्तके' काढण्याची ॲलन लेन यांची चळवळ इंग्लंडपुरतीच मर्यादित राहिली नाही. ती आज जगाच्या कानाकोपऱ्यात पोचली. कित्येक भारतीय लेखकांची पुस्तके या प्रकाशनसंस्थेने प्रकाशित केली. पुस्तकात कोपऱ्यात असलेले 'पेन्गिवन'चे बोधचिन्ह पुस्तक दर्जेदार असल्याची ग्वाही वाचकाला देते. पण पेन्गिवनचा आणि पुस्तकाचा काय संबंध असावा याचा आपण कधी विचार करत नाही. अर्थात् ते समजूनही आपला काही फार मोठा फायदा होणार असतो असे नाही. पण त्याविषयी जाणून घेण्यात एक प्रकारची गंमत असते. ॲलन लेन यांचा नातू-मुलीचा मुलगा होरॅशिओ मॉर्पुर्गो याने आपल्या बालपणीच्या आठवणी सांगताना यावर प्रकाश टाकला आहे. तो म्हणतो, 'आजोबांच्या घराच्या प्रवेशद्वाराच्या गंजक्या लोखंडी चौकटीत, नाचणाऱ्या पेन्गिवनची एक सुंदर जोडी होती. शाळेला सुटी लागली की आमचा मुक्काम तेथेच असे. माझ्या झोपण्याच्या खोलीच्या खिडकीजवळच हे गेट होते. गेट उघडमीट करताना या गंजक्या दरवाजाचा जो आवाज होई तो आवाज जणु काही 'ख्रिसमस, ईस्टर, ख्रिसमस ईस्टर' असं म्हणतोय असं माझ्या बालमनाला वाटे. वास्तविक पेन्गिवन हे काही आमच्या कुटुंबाचे मानचिन्ह नव्हते. पण दरवाजावरील या पेन्गिवनची निवड अगदी सहजपणे माझ्या आजोबांनी आपल्या प्रकाशन व्यवसायाचे प्रतीक म्हणून केली."



अनुक्रमणिका

**विल्यम्सचे लेन**

अॅलनची आई डेव्हनमधील शेतकरी कुटुंबातील तर वडील सॅम्युएल विल्यम्स हे वेल्श परगण्यातील. सॅम्युएल हे व्यवसायाने स्थापत्यविशारद. ब्रिस्टलच्या म्युनिसिपालिटीत नोकरी. साहजिकच लग्नानंतर अॅलनची आई ब्रिस्टलमध्ये येऊन राहिली- तरी तिला ओढ होती मातीची. प्रत्येक सुटीत हे सर्व कुटुंब डेव्हनमधील आजोबांच्या घरी आणि आजीच्या नातेवाईकांकडे जाऊन राहात असे. बालपणातील आजोळघरच्या वास्तव्यामुळे अॅलनला खेडगावातील जीवनपद्धतीची आवड निर्माण झाली आणि ती अखेरपर्यंत टिकली.

ब्रिस्टलमध्ये २१ सप्टेंबर १९०२ साली अॅलनचा जन्म झाला. ब्रिस्टल ग्रामर स्कूलमध्ये शालेय शिक्षण झाले. शालेय जीवनात अॅलनने कोणतेही विशेष प्राविण्य मिळवून आपला ठसा उमटवल्याची नोंद नाही. उलट गणित आणि इंग्रजी या दोन विषयात अॅलनला फारशी गती नव्हती. अॅलनने विश्वविद्यालयीन शिक्षण घ्यावे अशी त्याच्या वडिलांची इच्छा होती. पण अॅलनने सोळाव्या वर्षीच शिक्षणाला रामराम ठोकला ! शिक्षणात अॅलनला रस नाही हे त्याच्या आईने जाणले. तिचे एक दूरचे नातेवाईक जॉन लेन यांची लडनमध्ये 'बॉडले हेड' नावाची प्रकाशनसंस्था होती. जॉन लेन निपुत्रिक होते. प्रकाशनव्यवसायात त्याना मदतीची गरज होती. तिने अॅलनला मदतनीस म्हणून घेण्याची जॉन लेन यांना विनंती केली. त्यानी ताबडतोब होकार दिला. फक्त अॅलनने आपले 'विल्यम्स' हे आडनाव बदलून 'लेन' करावे अशी त्यानी अट घातली. सर्व कुटुंबाचे हित लक्षात घेता 'विल्यम्स' आडनावाचा आग्रह अॅलनने धरला नाही. अॅलनने आणि त्याच्याबरोबर त्याच्या सर्व कुटुंबियानी- आईवडिल आणि दोघे भाऊ - ताबडतोब 'विल्यम्स' या आंडनावाला निरोप देऊन 'लेन' या आडनावाचा स्वीकार केला. १९१९ सालापासून म्हणजे वयाच्या सतराव्या वर्षापासून त्याने 'अॅलन लेन' हे सुटसुटीत नाव लावण्यास सुरुवात केली.

**बॉडले हेड**

तरुण अॅलन, अंकल जॉनच्या मदतीला आला तेव्हा जॉन स्वत: पासष्ट वर्षाचे होते. तीन दशकाहून अधिक काळ त्यानी प्रकाशन व्यवसायात घातला होता. 'बॉडले हेड' तर्फे अनेक उत्तमोत्तम पुस्तके प्रकाशित केली होती. आपल्या ऐन उमेदीच्या काळात जॉन लेन यानी आपला व्यवसाय भरभराटीस आणला असला तरी आता त्यांचे शरीर त्यांना साथ देत नव्हते. अशा वेळ जॉन लेन याना अॅलनसारखा तरुण, उमदा, चुणचुणीत आणि होतकरू मदतनीस लाभला. त्यांच्यावरील कामाचा भार हलका झाला. पुस्तके आणणे-पोचवणे, पत्रव्यवहार पाहाणे, निरोप पोचवणे यासारखी कामे अॅलन तत्परतेने करू लागला. प्रकाशनव्यवसायाची प्राथमिक माहिती त्याने करून घेतली. शिवाय या व्यवसायातील खाचाखोचा, बारकावेही अॅलनने आत्मसात केले. पुस्तकाची मांडणी कशी असावी, त्यातील मजकूर कसा छापावा याबद्दल जॉन लेन फार चोखंदळ असत. त्यामुळे पुस्तक छापताना

त्यातील अंतरंगाबरोबर बाह्यरंगही तितकेच महत्त्वाचा असते हा संस्कार ॲलनच्या मनावर उमटला. पुस्तकाला आकर्षक शीर्षक, विषयाशी सुसंगत आणि लक्षवेधक मुखपृष्ठ आणि नीटनेटकी बांधणी असली पाहिजे ही जाण ॲलनला प्रकाशनव्यवसाय करताना फार उपयुक्त ठरली.

वास्तविक पाहता ॲलनने स्वत:करता खुषीने प्रकाशनव्यवसायाची निवड केली नव्हती. उच्च शिक्षण घेण्याची इच्छा नसलेल्या आपल्या मुलाने जॉन लेन यांच्या हाताखाली काहीतरी शिकावे, काम करावे या हेतूने त्याच्या आईने त्याला या व्यवसायाकडे वळवले. आयुष्याच्या या महत्त्वाच्या वळणावर प्रकाशन व्यवसायाशिवाय अन्य पर्याय ॲलनजवळ नव्हता. पण एकदा 'आपण प्रकाशन व्यवसाय करायचा' ही खुणगाठ मनाशी बांधल्यावर ॲलनचा दृढ निश्चय कायम राहिला. प्रकाशन व्यवसाय शिकण्याकरता लागणारी बौद्धिक क्षमता ॲलनजवळ होती. शिवाय भरपूर कष्ट करण्याची शारीरिक क्षमताही होती. कामाला सुरुवात केल्यापासून अवघ्या पाच वर्षात ॲलन 'बॉडले हेड' संस्थेचा संचालक झाला. प्रकाशनसंस्थेतील धोरणासंबंधीचे निर्णय ॲलन घेऊ लागला. आता तो जॉन लेन यांच्याच घरी राहू लागाला.

**बर्नार्ड शॉ यांचा संदेश**

जॉन लेन यांच्या घरी ॲलनला समाजात मिसळण्याची संधी मिळाली. ॲलन देखणा होता. त्याचे व्यक्तीमत्त्व आकर्षक आणि प्रसन्न होते. बॉडले हेडचा संचालक म्हणून अनेक लेखकांशी त्याला सुसंवाद साधता आला. कधी चहापान तर कधी मेजवानीच्या निमित्ताने थॉमस हार्डी, जॉन ड्रिंकवॉटर यासारख्या लेखकांचा सहवास ॲलनला लाभला डब्लू. जे. लॉक याने तर ॲलनला आपल्या फ्रान्समधील बंगल्यात राहायला नेले. थोरामोठ्यांच्या सहवासात ॲलनचे व्यक्तीमत्त्व विकसित होत होते, खुलत होते, फुलत होते. या काळातील ॲलनच्या जीवनातील एक घटना त्याच्या जीवनाला दिशा देणारी ठरली. सुप्रसिद्ध नाटककार बर्नार्ड शॉ यांचे एक व्याख्यान होते. ॲलन व्याख्यान ऐकण्यासाठी गेला. व्याख्यान संपल्यावर ॲलनने बर्नार्ड शॉ यांची सही मागितली. बर्नार्ड शॉनी आढेवेढे न घेता सही दिली. पण सही देताना ते उत्स्फूर्तपणे म्हणाले, "अरे, सगळ्यांच्या सह्या गोळा करण्यात वेळ कशाला फुकट घालवतोस? त्यापेक्षा तू असं काहीतरी कर की इतराना तुझी सही घ्यावीशी वाटेल." भविष्यात खरोखरच ॲलनने या थोर नाटककाराचे शब्द खरे केले.

१९२५ साल उजाडले. ॲलनचे गुरु-पालक-शिक्षक आणि सर्वेसर्वा जॉन लेन यांनी जगाचा निरोप घेतला. त्याच्या पुढच्याच वर्षी जॉन लेन यांच्या पत्नीसुद्धा स्वर्गवासी झाल्या. वारसाहक्काने बॉडले हेड कंपनीचा बहुतेक सर्व हिस्सा ॲलनला मिळाला. यावेळी कंपनीची आर्थिक स्थिती फारसी चांगली नव्हती. नेमक्या याचवेळी ॲलनने काही चुका केल्या आणि त्या चुका त्याला चांगल्याच महागात पडल्या. ॲलनने 'डिप्लोमॅटिक मेमॉयर' हे पुस्तक

काढले. पण ते प्रथितयश नटाऐवजी निरुद्योगी नटाने लिहिले असल्यामुळे खपलेच नाही. तसेच त्याने काढलेल्या मुलांच्या पुस्तकांच्या मालिकेलाही विशेषसा प्रतिसाद मिळाला नाही. त्यामुळे कंपनी चांगलीच डबघाईला आली. तरीसुद्धा ॲलन निराश झाला नाही अपयशाने खचून गेला नाही. आर्थिक संकटाने हतबल झाला नाही. जीवनाला सामोरे जाताना ॲलनने कधीही नकारात्मक भूमिका घेतली नाही. तो आशावादी होता. परिस्थितीवर मात करण्याच्या दृष्टीने तो योजना आखत होता. जेम्स जॉइस यांना आपले 'युलिसिस' हे पुस्तक इंग्लंडमध्ये छापायचे होते. **'फेबर' या प्रकाशनसंस्थेशी संबंधित टी. एस. इलियट यानी हे पुस्तक छापण्यास नकार दिला.** लोकांच्या क्षोभक प्रतिक्रियेची त्यांना भीती वाटत होती. पण ॲलनने हे आव्हान स्वीकारले. या व्यवसायातील ॲलनची अंतर्दृष्टी जागृत होती. त्याने 'युलिसिस' प्रकाशित केली. संकटकाळातील हा त्याचा पहिला विजय होता.

**आर्थिक ओढगस्त**

१९३४ साल होते. एकदा ॲलन अगाथा ख्रिस्ती या लेखिकेबरोबर सुटी संपल्यावर रेल्वेने घरी परतत होता. प्रवासात काहीतरी वाचावे म्हणून रेल्वे प्लॅटफॉर्मवरील पुस्तकविक्रेत्यांच्या स्टॉलवर ॲलनने नजर टाकली. पण तिथे तर सर्व महागडी पुस्तके होती. सहज विकत घेता येतील अशी दर्जेदार पुस्तके छापण्याची किती निकड आहे हे त्याला त्या दिवशी जाणवले. अशीच पुस्तके आपण प्रकाशित करावी असे त्याला मनोमन वाटू लागले. कंपनीला आर्थिक दिवाळखोरीतून बाहेर काढण्यासाठी अखेरचा आणि निकटाचा प्रयत्न म्हणून ॲलनने ही योजना तयार केली. सुप्रसिद्ध लेखकांच्या गाजलेल्या कलाकृती आपण पुन्हा प्रकाशित कराव्यात असे त्याने ठरविले. परंतु बॉडले हेडच्या पदाधिकाऱ्यांना ही कल्पना पसंत पडली नाही. आता जे साहस करायचे ते ॲलनने एकट्याच्या हिमतीवर करावे अशी त्रयस्थपणाची भूमिका त्यांनी घेतली आणि बॉडले हेड ही संस्था स्वखुशीने विसर्जित केली.

ॲलनने एकट्याने या योजनेशी कार्यवाही करण्याचे ठरवले. घर गहाण ठेवून पैसा उभा करून ॲलनच्या आईवडिलांनी त्याला उत्तम साथ दिली. ॲलनचे भाऊ जॉन आणि रिचर्ड हे ॲलनच्या मदतीला धावून आले. त्या दोघांनी आपला वेळ आणि मेहनतीचे योगदान दिले. जॉन लेन यांची मौल्यवान पेंटिंग्ज आणि पुस्तके विकून ॲलनने भागश: भांडवल जमवले. ॲलन आणि त्याच्या भावानी एकत्र जमून कोणते लेखक निवडावेत, त्यांची कोणती पुस्तके छापावीत, त्यासाठी कोणता कागद वापरावा, पुस्तकाचा आकार कसा असावा इत्यादी महत्त्वाच्या गोष्टी ठरवल्या. या स्वस्त पेपरबॅक पुस्तकांसाठी आपल्या घराच्या दरवाजावरील 'पेन्विन' या मानचिन्हाची निवड केली आणि पुस्तके छापण्यास सुरुवात केली

'कोणताही बदल मान्य करण्याची आपल्या मनाची तयारी नसते.' व्यक्तिगत पातळीवर हा नियम जसा लागू पडतो तसा तो सामाजिक बाबतीतही खरा ठरतो. पुस्तक विक्रेते ॲलनची स्वस्त पुस्तके विक्रीला ठेवण्यास तयार नव्हते. ही पुस्तके दुकानात विकायला

ठेवली तर जाड पुठ्याच्या उत्तम बांधणीच्या महाग कादंबऱ्या कोणी विकत घेणार नाही अशी भीती त्यांना वाटत होती. तसेच परंपरागत चालत आलेल्या उत्तम पुस्तकांमध्ये या हलक्या प्रतीच्या पुस्तकांची भेसळ होईल आणि पुस्तकांचा दर्जा खालावेल अशीही काळजी त्यांना वाटत होती. १९३५ च्या सुमारास इंग्लंडमध्ये महानगरपालिकेच्या आणि फिरत्या वाचनालयाची सुरुवात झाली असल्यामुळे सर्वसामान्याना पुस्तके सहजी उपलब्ध होऊ लागली होती. साहजिकच स्वत: विकत घेऊन पुस्तके वाचण्याचे प्रमाण कमी होईल असाही पुस्तकविक्रेत्यांचा होरा होता. 'जोनाथन केप' यांच्यासारखे यशस्वी प्रकाशक 'ॲलन लेन याना या योजनेत अपयशच येईल' अशी जाहीर ग्वाही देत होते. एकंदरीत इतर परिस्थितीबरोबर सामाजिक वातावरणही ॲलनच्या दृष्टीने प्रतिकूल होते.

**यशस्वी सुरुवात**

ॲलनने आपल्या प्रकाशनाला मोठ्या धीराने सुरुवात केली. सुरुवातीला त्याच्या पुस्तकाना तुरळक मागण्या येत होत्या. पण ॲलन निराश झाला नाही. आपल्या पुस्तकांची संग्राह्यता आणि व्यवहार्यता दुकानदाराला पटवताना उत्तम विक्रेत्याचे कसब त्याने दाखवले. इंग्लंडमध्ये 'वुलवर्थ' ही एक दुकानांची मालिका होती. या दुकानात विक्रीला ठेवलेल्या मालाची किंमत ६ पेन्सपेक्षा जास्त नसे. त्यामुळे वुलवर्थला '६ पेन्सचे दुकान' म्हणत असत. वास्तविक पेन्ग्विन पुस्तकांची किंमत सात पेन्स होती. परंतु ती ६ पेन्सला देण्याचे ॲलनने मान्य केले. 'वुलवर्थ' च्या मालकाने पेन्ग्विन प्रकाशनाच्या पहिल्या दहा पुस्तकांच्या प्रत्येकी दहा हजार प्रतींची मागणी नोंदवली. या मागणी बरहुकूम माल पोचवल्यावर अवघ्या आठवड्याच्या कालावधीत वुलवर्थकडून आणखी पुस्तकांची मागणी आली. या एका उदाहरणावरून 'इतर पुस्तकविक्रेतेही वुलवर्थचे अनुकरण करतील' अशी ॲलन याना खात्री वाटली. 'पेन्ग्विन' आता आपल्या पायावर उभा राहाणार होता. पेन्ग्विनने प्रकाशित केलेल्या पहिल्या दहा पुस्तकात अर्नेस्ट हेमिंग्वे यांची 'अ फेअरवेल टू आर्म्स' ही कादंबरी होती. तसेच अगाथा ख्रिस्ती यांचे डिटेक्टिव्ह पुस्तक होते. डोरोथी सेयर्स, मेरी वेब, स्टॅन्ले बाल्डविन यासारख्या मान्यवरांच्या कलाकृती होत्या. 'पेन्ग्विन' या प्रकाशनसंस्थेची प्रत्यक्ष 'स्थापना' अशी झालीच नाही. फार दक्षतेने नियोजन करून काढलेली ती संस्था नव्हती तर तो होता बॉडले हेडला वाचवण्याचा अखेरचा मार्ग ! अर्थात् ॲलनचा हा मार्ग कल्पनातीत यशस्वी होण्याच्या मार्गावर होता.

उत्कृष्ट साहित्यिकांच्या दर्जेदार कलाकृती पेन्ग्विनतर्फे प्रकाशित होऊ लागल्या. छोटा आकार, पुठ्ठ्याऐवजी पातळ कागदाचे वेष्टन. आकर्षक मुखपृष्ठ असलेली ही पुस्तके सर्वसामान्य जनतेला मोहिनी घालीत. ही पुस्तके फारच स्वस्त होती. पुस्तकविक्रेते 'सहा पेन्सपेक्षा जास्त नाही' अशी घोषणा पेन्ग्विन पुस्तकांबाबत करीत असत. 'फक्त दहा सिगरेट्सच्या किंमतीत पेन्ग्विनचे पुस्तक मिळते' असे ॲलन गमतीने म्हणत असे. ही पुस्तके

सर्वसामान्य वाचकांच्या खिशाला परवडणारी असल्यामुळे 'स्वत: विकत घेऊन वाचण्याची हौस' नागरिकांना पुरवता येऊ लागली. स्वत:च्या घरगुती वाचनालयात 'दर्जेदार पुस्तकांची' हजेरी लावता येऊ लागली. या पुस्तकांची चर्चा घरोघर होऊ लागली. हां हां म्हणता पुस्तकांचा खप वाढू लागला. ॲलनने काळाची पावले ओळखली होती. ज्ञान हे महागड्या पुस्तकात बंदिस्त ठेवून चालणार नाही हे ॲलनच्या लक्षात आले. 'जोनाथन केप' सारख्या प्रकाशकांची भाकिते खोटी ठरली. इतर प्रकाशकांच्या नजरेतून जे सुटले ते ॲलनने टिपले.

**टॉम सॉयर**

'दि ॲडव्हेंचर ऑफ टॉम सॉयर' हे या भविष्यकालीन यशस्वी प्रकाशकाचे लहानपणातील सर्वात आवडते पुस्तक. या पुस्तकातील एक घटना त्याला विशेष आवडत असे. या पुस्तकाचा नायक टॉम हा शाळकरी मुलगा. एका रविवारी टॉमच्या वडिलांनी त्याला घराचे कुंपण रंगवायला सांगितले. वास्तविक सुटीच्या दिवशी मित्रांबरोबर मनमुराद खेळण्याऐवजी असले कंटाळवाणे काम करायचे म्हणजे शिक्षाच ! टॉमने एक नामी युक्ती शोधली. टॉमने कुंपण रंगवण्यास सुरुवात केली. सभोवती बघ्या मित्रांची गर्दी जमली. त्यातील एका मुलाला ब्रश हातात घेऊन स्वत: रंगवून बघावेसे वाटले. 'टॉम, जरा ब्रश दे ना.' आता टॉमचा भाव 'वधारला' होता. तो म्हणाला, 'मला एक डाइम दिलास. तर मी तुला ब्रश हातात धरायला परवानगी देईन' मित्रांच्या मानसिकतेनुसार ही युक्ती फलदायी ठरली. झाडाखाली बसून पैसे गोळा करत टॉमने मित्रांकडून संपूर्ण कुंपण रंगवून घेतले. या गोष्टीतील टॉमच्या स्वभावाशी ॲलनचे साधर्म्य होते.

वरील घटनेशी समांतर अशी ॲलनची एक आठवण त्याचा भाऊ डिक याने नमूद केली आहे. डिक म्हणतो, "आम्ही आजोबांकडे गेलो होतो. भाजीपाल्याची बागाईत होती. बागाईत जमिनीच्या काही भागात नवीन बी पेरायचे होते. आम्हा तिघा भावाना कुदळी घेऊन जमीन खोदायला सांगितली. आम्ही तिघेजण कामाला लागलो. हे काम करून घेण्याचा एक सोपा मार्ग आहे असे ॲलनला वाटले. जेमतेम दहा मिनिटे काम केल्यावर त्याने चर्चमध्ये येणाऱ्या तरुणाना निरोप पाठवला. "थोडंसं काम केलं तर त्याच्या मोबदल्यात पुढच्या शनिवारी लेन यांच्या शेतावर फुकट मिठाई वाटण्यात येईल." ॲलनच्या या प्रस्तावाला उत्तम प्रतिसाद मिळाला. अनेक स्वयंसेवकानी थोडी थोडी अंगमेहनत करून पेरणी करण्यास जमीन सज्ज केली.

व्यक्तीची गुणवैशिष्ट्ये ओळखणे, त्यापैकी कोणाची आपल्याला व्यवसायात मदत होईल याचा अंदाज बांधणे, त्याच्याशी कशा पद्धतीने संवाद साधला असता ती व्यक्ती पेन्ग्विन परिवारात सामील होण्यास तयार होईल या सर्व गोष्टी जाणण्याचे विलक्षण कसब ॲलनमध्ये होते. पेन्ग्विनची पेपरबॅक पुस्तके प्रकाशित करण्यास सुरुवात केल्यावर अनेक विद्वान हुशार माणसे त्यानी हेरली आणि सहसंपादक, सल्लागार म्हणून त्यांची नेमणूक

केली. वास्तविक ॲलनकडून त्यांना मिळणारे वेतन अगदी नगण्य होते. परंतु तरीही ही सर्व मंडळी पेन्विन परिवारात वर्षानुवर्षे काम करत राहिली. पेन्विनच्या उत्कर्षासाठी परिश्रम घेत राहिली. पेन्विनच्या आर्थिक भरभराटीत योगदान देत राहिली. याचे श्रेय ॲलनच्या माणसे जोडण्याच्या अद्‌भूत सामर्थ्याला द्यावे लागेल. स्वत:चे शिक्षण अत्यंत सीमित– ॲलनने फक्त शालेय शिक्षण घेतले होते. विश्वविद्यालयीन उच्च शिक्षण घेण्याची सुतराम शक्यता नसल्यामुळे ॲलनला इतर सहकाऱ्यांच्या विद्वत्तेवर अवलंबून राहावे लागे. ॲलनपेक्षा हजारोपटीनी अधिक शिकलेल्या विद्वान मंडळींच्या मनात पेन्विनचे प्रकाशनाकरता आपण प्रामाणिकपणे काम करावे असा भाव निर्माण करण्याचे सामर्थ्य ॲलनमध्ये होते. ॲलनच्या अल्पशिक्षणाबद्दल त्याच्या चरित्रकाराने गमतीने म्हटले आहे, "ग्रीक भाषेविषयीचे त्याचे ज्ञान त्याच्या शोफरपेक्षाही कमी होते." हे जरी सत्य असले तरी ग्रीक विद्वानांजवळ अभावाने आढळणारी एक गोष्ट ॲलनमध्ये होती आणि ती म्हणजे विद्वान, हुशार, प्रामाणिक माणसे जमवण्याची कला ! ॲलनने पेन्विनच्या संपादक मंडळावर जाणकार विद्वानांची नेमणूक केली आणि उत्तमोत्तम पुस्तके प्रकाशित केली.

**पेलिकनचा प्रारंभ**

इ. स. १९३७ साली पुढे फारच सुप्रसिद्ध झालेले भारतीय वकील आणि भारताच्या स्वातंत्र्यासाठी धडपडणारे कृष्ण मेनन इंग्लंडमध्ये होते. ते ॲलन लेन यांचे सल्लागार आणि हितचिंतक होते. त्यांनी डब्लू. इ. विल्यम्स या विद्वान गृहस्थांचा ॲलनशी परिचय करून दिला. विल्यम्स स्वत: कामगाराना प्रशिक्षित करण्यासाठी स्थापन केलेल्या ब्रिटिश संस्थेचे संचालक होते. पेन्विन प्रकाशन संस्थेतील प्रवेश आपल्या कार्याला पूरक ठरेल, ही सुसंधीच चालत आली आहे असे त्यांना वाटले. त्याचवेळी विल्यम्स यांचे दोन सहकारी–लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स येथील इतिहासाचे प्राध्यापक एच् एल्. बेल्स (Beales) आणि झूलॉजिकल सोसायटीचे कार्यवाह सर पीटर चामर्स् मिचेल (Peter chalmers Mitchell) यानीही पेन्विन परिवारात प्रवेश केला. जुन्या कादंबऱ्या पुनर्मुद्रित करण्यापेक्षा विज्ञान, तंत्रज्ञान, समाजशास्त्र, इतिहास, जीवशास्त्र इत्यादी विषयावरील वैचारिक साहित्य आपण छापावे अशी बहुमोल सूचना विल्यम्स यांनी केली. ॲलनला ही कल्पना एकदम पसंत पडली. त्याने तात्काळ होकार दिला. या वैचारिक पुस्तकांचे प्रकाशन 'पेलिकन' या नावाने करावे आणि वरील चौघांनी त्याचे संपादकत्त्व पत्करावे असे ठरले. सुप्रसिद्ध नाटककार बर्नार्ड शॉ यानी या योजनेला खरी दिशा दिली. पेन्विनची पुस्तके प्रकाशित करताना बर्नार्ड शॉ अनेक उपयुक्त सूचना करीत असत. त्यांच्या एका पत्राला उत्तर देताना 'मला तुमचं इंटलिजंट विमेन्स गाइड टू सोशॅलिझम अँड कॅपिटेलिझम् हे पुस्तक छापायची इच्छा आहे.' असं ॲलनने कळवलं. शॉनी ताबडतोब मान्यता तर दिलीच. पण या नवीन आवृत्तीकरता हिटलर आणि स्टॅलिन यांच्यावर स्वतंत्र प्रकरणे लिहिली. पैशाची कोणतीही अट न घालता आपल्या

पुस्तकाची सुधारित आवृत्ती काढण्यास परवानगी दिली. 'मोठी माणसे फार साधी असतात, असे असले तरी एवढ्या मोठ्या नाटककाराला ॲलनकरता लेखन करावेसे वाटले असे संबंध ॲलनने निर्माण केले हेही तितकेच खरे ! बर्नार्ड शॉ यांचे वरील पुस्तक पेलिकन या वैचारिक मालिकेतील पहिले पुस्तक ठरले. इतर अनेक मान्यवर लेखकांनी या थोर नाटककाराचे अनुकरण केले. पेलिकनच्या संकल्पनेचे संपूर्ण श्रेय विल्यम्स यानाच द्यावे लागेल.

**प्रौढ शिक्षणाला पूरक पेलिकन**

इ. स. १९३० इंग्लंडमध्ये 'ॲडल्ट एज्युकेशन' प्रौढ शिक्षणाची चळवळ सुरु झाली होती. गिरण्या कारखान्यात काम करणारे कामगार, शिक्षणापासून वंचित राहिलेली सामान्य जनता, आर्थिक दृष्टया न परवडल्यामुळे अशिक्षित राहिलेले नागरिक या सर्वांना ज्ञानाच्या सर्व शाखाउपशाखांमधील अद्ययावत् ज्ञान दिले पहिजे अशी विचारधारा तत्कालिन धुरिणांमध्ये होती. स्वत: विल्यम्स हे 'ब्रिटिश इन्स्टीट्युट ऑफ ॲडल्ट एज्युकेशन' या संस्थेचे संचालक होते. त्यांच्या टॅविस्टॉक स्केअर येथील सुप्रसिद्ध कार्यालयात अनेकदा ॲलन आणि विल्यम्स यांच्या अनौपचारिक बैठका होत. त्यावेळी पेलिकनच्या ध्येयधोरणाबद्दलचे अनेक महत्त्वपूर्ण निर्णय ते दोघे घेत असत. या संस्थेप्रमाणे स्त्रियांनाही सर्व ज्ञानशाखामधील अद्ययावत् माहिती दिली जावी यासाठी 'विमेन्स इन्स्टिट्युटस्' आणि 'टाऊनविमेन्स गिल्डस्' यासारख्या संस्थांचा विस्तार झपाट्याने होत होता. समाजातील अत्यंत मान्यवर विद्वान स्वत: अशा लोकाना शिकवीत असत. त्यामुळे इतिहास, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, स्थापत्यशास्त्र यासारख्या विषयांचे ज्ञान आपल्याला असेल पहिजे अशी इच्छा समाजातील कनिष्ठ स्तरातही निर्माण होत होती. गंभीर विषयाचे वाचन करणारा ज्ञानार्थी वाचकवर्ग तयार होत होता. पेलिकनने नेमक्या याचवेळी अशी वैचारिक पुस्तके ज्ञान मिळवण्यास उत्सुक असलेल्या या समाजाला दिली. पेलिकनतर्फे या सर्व विषयातील तज्ज्ञांना खास विनंती करून त्या त्या विषयावरील उत्तम पुस्तके लिहून घेतली. यात शरीरक्रियाविज्ञान, पक्षीविज्ञान, वास्तुरचनाशास्त्र यासारख्या आधुनिक विषयांवरील पुस्तकांचाही समावेश होता. तसेच हॅलेव्ही, रॉजर फ्राय, क्लाइव्ह बेल, फ्रॉइड, जीन्स इक्सले, ज्युलियन हक्सले यासारख्या मान्यवरांची गाजलेली वैचारिक पुस्तकेसुद्धा पेलिकनतर्फे प्रकाशित केली. पेलिकनची पुस्तकेसुद्धा फक्त सहा पेन्सना मिळत असत. 'अद्ययावत् ज्ञानाचे सर्वात स्वस्त वाचनालय' पेलिकन पुस्तकानी निर्माण केले. या पुस्तकांचा उपयोग नागरिकांप्रमाणे विद्यार्थ्यांनाही झाला. विश्वविद्यालयात उच्चशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना पेलिकनची पुस्तके 'आपल्या विषयाचे पूरक' वाचन म्हणून फारच उपयोगी ठरत. म्हणूनच पेलिकन पुस्तकांच्या मागणीचा ओघ अखंड राहिला.

## पेन्ग्विन स्पेशल

पेन्गिन आणि पेलिकनच्या यशानंतर ॲलनला कधी मागे वळून बघावे लागले नाही. उत्तरोत्तर त्याची प्रगती होती गेली. १९३७ साली ॲलन व त्याच्या सहकाऱ्यानी 'पेन्ग्विन स्पेशल' ही मालिका सुरू केली. तत्कालिन इंग्लंडमध्ये ज्या विषयांबद्दल समाज जागृती आणि प्रबोधन होणे आवश्यक आहे अशा विषयावरील पुस्तकाना या मालिकेत प्राधान्य देण्यात आले. उदा. ब्रिटिश हेल्थ, ब्रिटिश ॲग्रीकल्चर, वर्ल्ड शिपिंग, टवेंटिअेथ सेंच्युरी सोशालिझम इ. तसेच आंतरराष्ट्रीय पातळीवर कोणत्या नवनवीन घडामोडी होत होत्या त्याची माहिती नागरिकांना होणे जरूरीचे होते. त्याचा वृत्तांत देऊन समाज प्रबोधन करणाऱ्या पुस्तकांच्या समावेश 'पेन्ग्विन स्पेशल' मध्ये होता. उदा. सर्चलाइट ऑन स्पेन, ब्लॉकमेल ऑर वॉर? मुसोलिनिज रोमन एम्पायर, जर्मनी पुटस् दि क्लॉक बॅक, दि ज्युईश प्रॉब्लेम इत्यादी.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात किंग पेन्ग्विन, मुलाकरता नोअेल करिंग्टन यानी संघटित केलेली पफिन पिक्चर बुक्स, अेलेनॉर ग्रॅहॅम यांनी संपादित केलेली पफिन स्टोरी बुकस्, केनेथ क्लार्क यानी संपादित केलेली 'पेन्ग्विन मॉडर्न पेंटर्स' या चार नवीन मालिका प्रकाशित झाल्या. किंग पेन्ग्विनच्या मालिकेचे संपादन निकोलाय पेवस्नेर (Nikolaus Pevsner) या जर्मन ज्युईश विद्वानाने केले. नाझीच्या त्रासाला कंटाळून हा जर्मन तरुण लंडनमध्ये आला. किंग पेन्ग्विन या मालिकेतील पुस्तके सचित्र, छोटी, कठिण पुठ्ठ्याच्या वेष्टनात प्रकाशित होत. 'दि बिल्डिंग्ज् ऑफ इंग्लंड' या मालिकेत ब्रिटनमधील कानाकोपऱ्यातील सर्व उल्लेखनीय इमारतींची सचित्र माहिती, त्यातील बारकावे यांचे विद्वत्तापूर्ण विवेचन आहे. त्याची मांडणी नीटनेटकी आणि आकर्षक आहे. 'दि पेलिकन हिस्टरी ऑफ आर्टस्' ही मालिका सुद्धा निकोलाय पेव्हस्नर यांच्या काटेकोर देखरेखीखाली प्रकाशित झाली. पेन्ग्विनतर्फे पेलिकन, किंग पेन्ग्विन, पेन्ग्विन क्लासिक, दि बिल्डिंग्ज ऑफ इंग्लंड, पेलिकन हिस्टरी ऑफ आर्ट, दि पफिन्स, पेन्ग्विन स्पेशल, म्युझिक मॅगॅझीन फिल्म रिव्ह्यू या सुप्रसिद्ध मालिकांप्रमाणेच सायन्स न्यूज, न्यू बायॉलॉजी या विज्ञानविषयक नवीन मालिका काढण्यात आल्या. यात विज्ञानाच्या शाखाउपशाखांचे तज्ज्ञ लिहित असत. विज्ञानातील अवघड संकल्पना सोप्या शब्दात, सर्वसामान्य लोकांना समजतील अशा पद्धतीने मांडल्या जात. त्यामुळे या दोन्ही मालिकेतील पुस्तके लोकप्रिय झाली. या सर्वांबरोबर 'पेन्ग्विन न्यु राइटिंग' ही एक अभिनव मालिका पेन्ग्विनने सुरू केली. देशोदेशींच्या 'नवोदित' लेखकांचे लेखन या मालिकेत प्रकाशित करण्यात येई. यात इंग्लिश लेखकांप्रमाणे जर्मन, फ्रेंच, इटालियन इ. देशातील लेखकांचे लेख प्रसिद्ध होत. 'पेन्ग्विन न्यु राइटिंग' मालिकेत आपल्या लेखनाचा प्रारंभ करणाऱ्या कित्येक जणांनी भविष्यात उत्कृष्ट लेखक म्हणून 'नावलौकिक' कमावला.



अनुक्रमणिका

**पेन्विन क्लसिक**

ॲलनला खचितच प्रकाशन व्यवसायातील अंतर्दृष्टी होती. त्याचा आतला आवाज त्याला एखादी गोष्ट करण्यास भाग पाडत असे. या सादाला 'प्रतिसाद' म्हणून वरवर पाहता अव्यवहार्य वाटणारा निर्णय ॲलन आत्मविश्वासपूर्वक घेत असे आणि तो यशस्वी होत असे. प्रकाशनव्यवसायातील चार दशकाहून अधिक काळात अशा कित्येक घटना घडल्या होत्या. वानगीदाखल त्यातील एक येथे देत आहे. होमरच्या 'ओडिसी'चे इ. व्ही. रिअ (Rieu) यानी केलेल्या भाषांतराचे हस्तलिखित १९४५ साली पेन्विनकडे आले. दुसरे महायुद्ध होण्यापूर्वी ओडिसी ची आठ विविध भाषांतरे एकट्या इंग्रजी भाषेत प्रकाशित झाली होती. त्यापैकी एकाही भाषांतराची उत्तम विक्री झाली नव्हती. हा धोक्याचा इशारा देऊन 'हे पुस्तक पेन्विनने छापू नये' असे मत इतर सहकाऱ्यांनी व्यक्त केले. पण ॲलनचा आडाखा वेगळा होता. दशकापूर्वी ओडिसीतील नायकाने ॲलनच्या मनावर विलक्षण परिणाम केला होता. ॲलनने पुस्तक छापण्याचा निर्णय घेतला. १९४६ च्या जानेवारीत हे पुस्तक प्रकाशित झाले. या पुस्तकाने विक्रीचा उच्चांक गाठला. ओडिसीच्या वीस लाख प्रती खपल्या. अजूनही हे पुस्तक विकले जाते. 'पेन्विन क्लासिक' या पुढे निघालेल्या मालिकेतील हे पहिले पुस्तक ठरले. ई. व्ही. रीझ हे स्वत: अत्यंत विद्वान होते. अनेक विषयांवरील त्यांचे वाचन आणि अभ्यास उल्लेखनीय होता. 'पेन्गिव क्लासिक' या मालिकेचे संपादन 'रीझ' यानी केले.

**संपादकाची चौकट**

पेन्विनच्या प्रत्येक मालिकेला व्युत्पन्न व्यक्तीमत्त्व असलेले संपादक लाभले असले तरी सुद्धा या सर्वांचा मूळ आराखडा ॲलन लेन, विल्यम्स, ॲलन ग्लोव्हर आणि युनिस फ्रॉस्ट ही चौघेजण ठरवीत असत. युनिस फ्रास्ट यानी ॲलनची सेक्रेटरी म्हणून पेन्विनमध्ये प्रवेश केला. परंतु त्या अत्यंत कर्तबगार, हुशार होत्या. पुस्तकांबद्दलची आणि प्रकाशन व्यवसायाची उत्तम जाण त्याना होती. त्यामुळे अल्पकाळात त्यानी पेन्विनच्या चार प्रमुख संपादकात आपले स्थान निश्चित केले होते. ॲलन ग्लोव्हर यानी १९४४ साली पेन्विनमध्ये प्रवेश केला. अनेक भाषांची जाण. विविध विषयावरील विस्तृत वाचन यामुळे ॲलन ग्लोव्हर म्हणजे चालता बोलता ज्ञानकोशच वाटे. मुद्रित वाचनाचे प्रुफ रिडींगचे काम ॲलन ग्लोव्हर अत्यंत जलद गतीने करीत असत. वीस वर्षाहून अधिक काळ या चौघानी एकत्र काम केले. या चौघा संपादकांच्या बैठका अनौपचारिक पद्धतीने होत. नवीन पुस्तकांच्या हस्तलिखितांचे वाचन आणि अभ्यास इतर तिघेजण करीत. ॲलनने मात्र ते वाचलेले नसे. तरी या तिघांच्या चर्चेतून विषयाचे मर्म जाणून घेण्याची ॲलनची क्षमता लक्षणीय होती. त्यानंतर कित्येकदा ॲलन अशा महत्त्वपूर्ण सूचना करीत असे की ज्यामुळे या संपादकांनी केलेल्या तात्त्विक चर्चेचे स्वरूप स्पष्ट होई. अशा बैठकीनंतर ते चौघेजण 'बार्सिलोना' या छोट्याशा स्पॅनिश हॉटेलमध्ये जेवायला जात. त्यावेळी मनमोकळ्या गप्पा आणि पेन्विनच्या ध्येयधोरणांची

चर्चा होत असे. कित्येक वर्षे हा उपक्रम चालू होता. 'बार्सिलोना'च्या मुशीत पेन्गिवनच्या नवनवीन कल्पना परिपक्व होत असत.

संपादक मंडळाच्या बैठकीत एखादी नवीन योजना मांडली तर ॲलनचा उत्साह भरभरून वाहात असे. 'आपल्याला सर्व काही माहित आहे' असे भासविण्याची कित्येकाना सवय असते. पण ॲलनने असले ढोंग कधीही केले नाही. इतरांचे म्हणणे तो ऐकून घेत असे. इतरांनी मांडलेल्या मुद्यांचा सम्यक् विचार करून मगच तो आपल्या मनातल्या शंका व्यक्त करीत असे. इतर सहकाऱ्यांशी सल्लामसलत करून, विविध प्रश्न उपस्थित करून तो आपल्या शंकांचे निरसन करून घेत असे. आपल्या व्यवसायाव्यतिरिक्त इतर कित्येक गोष्टी जाणून घेण्याचे औत्सुक्य ॲलनजवळ होते. फारसे शिक्षण न घेतलेला ॲलन ज्ञान आणि माहिती मिळवण्याचा प्रामाणिक प्रयत्न करत असे. पेन्गिवनच्या नवीन योजनेचा आराखडा ठरवताना पुस्तकाचा आकार, मांडणी, किमत अशा गोष्टी पेन्गिवनचे हे चौघे संपादक निश्चित करीत असत. पण एकदा या गोष्टी ठरल्या की पुढील कारवाई करण्याचे स्वातंत्र्य त्या मालिकेच्या खास संपादकाला असे. ॲलन त्यात ढवळाढवळ करीत नसे. त्याचे धोरण नेहमीच सहकार्याचे असे. म्हणूनच निकोलाय पेवस्नर, इ. व्ही. रीझ, जॉन लेहमन, एडवर्ड यंग, इलेनॉर ग्रॅहॅम, सर मॅक्स मलोवॅन, केनेथ क्लार्क, डॉ. गॉर्डन जेकब, हयुबर्ट फिलिप्स, जेम्स फिशर यासारख्या दिग्जांनी पेन्गिवनच्या विविध मालिकांच्या संपादकत्त्वाची धुरा सांभाळली. अत्यंत व्युत्पन्न व्यक्ती संपादक म्हणून लाभल्या हे ॲलनचे भाग्य होते. पण ॲलनसारख्या सनसनाटी नेतृत्त्वाखाली काम करण्याची संधी त्या दिग्गजांना मिळाली हे त्यांचेही फार मोठे भाग्य होते !

**शैक्षणिक पेन्गिवन**

१९६४ साली सुरू केलेली पेन्गिवन एज्युकेशनल– शैक्षणिक पेन्गिवन ही मालिका अत्यंत यशस्वी झाली. याचे संपादन सुरुवातीला ख्रिस्तोफर डॉली यांनी व नंतर चार्लस् क्लार्क यानी केले. या मालिकेने विश्वात क्रांती घडवून आणली प्राथमिक शाळेपासून विश्वविद्यालयीन पातळीवरच्या सर्व स्तरातील शैक्षणिक पुस्तके या मालिकेत प्रकाशित झाली. त्यातील शैक्षणिक मूल्यांमुळे या पुस्तकांची तडाखेबंद विक्री झाली. अजूनही या पुस्तकांना विद्यार्थ्यांकडून मोठ्या प्रमाणावर मागणी आहे.

पेन्गिवनतर्फे प्रकाशित होणारी बहुतांश पुस्तके वैचारिक होती. मानवी बुद्धिने लावलेले शोध आणि बुद्धिगम्य आनंद यावर प्रकाश टाकणारी होती. त्यामुळे 'लोकशिक्षण करणारे प्रकाशन' अशी पेन्गिवनची जनमानसातील प्रतिमा तयार झाली. ॲलनला याचा सार्थ अभिमान वाटत असे.

**हाडाचा शेतकरी**

यशस्वी व्यावसायिक भरपूर माया गोळा केल्यावर स्वत:चे शेत किंवा वाडी घेतात. एक

तर ते प्रतिष्ठेचे लक्षण असते आणि कर वाचवण्याचा सुप्त हेतूही त्यात असतो अॅलनने मात्र शेती केली ती स्वत:च्या आनंदाकरता ! अॅलन हाडाचा शेतकरी होता. शेती-हा त्याचा परंपरेने लाभलेला व्यवसाय. शेतीची आवड असल्यामुळे प्रकाशक म्हणून यशस्वी झाल्यावर सवड मिळताच अॅलनने दोन शेते विकत घेतली. जमिनीची मशागत, उत्तम बी बियाणाची निवड, रोपांची काळजी, शेत शिंपणे यासारखी कामे करायची त्याला आवड होती. शेतीच्या अत्याधुनिक अवजारांचा वापर तो करीत असे. स्वत:च्या शेतातील कोंबाची लवलव त्याला आनंद देत असे. या मातीची ओढ त्याला सुखवीत असे. प्रकाशन व्यवसाय करीत असता एकीकडे चोवीस वर्षे अॅलनने शेती केली. स्वत:च्या शेतीविषयक समस्यांची उकल इतर शेतकऱ्यांची चर्चा करून अॅलन करत असे. हिरवेगार शेत पाहून तो उल्हसित होत असे. प्रकाशन व्यवसायातील चढउतार, समस्या, चिंता यावरचा रामबाण उपाय म्हणजे 'शेती' आपल्या आयुष्याची अखेरची काही वर्षे त्याने याच शेतावर समाधानात घालवली. आपल्या आयुष्यातील हा काळ सर्वोच्च आनंदाचा होता असे अॅलनला वाटत असे.

**मतभेद**

अॅलनने ज्या सहकाऱ्यांच्या मदतीने पेन्ग्विनची धुरा यशस्वीपणे सांभाळली त्यापैकी काहीजण १९५० ते ६० च्या दशकात निवृत्त झाले. आता पेन्ग्विनचा व्याप इंग्लंडपुरता मर्यादित राहिला नव्हता. अमेरिका, ऑस्ट्रेलिया इत्यादी देशात पेन्ग्विनच्या शाखा सुरू झाल्या होत्या. अॅलनचे काही सहकारी त्या देशातील पेन्ग्विनच्या कारभार सांभाळत होते. अनेक नवीन लोकांची नियुक्ती अॅलनने केली होती. पण 'आमच्या पिढीप्रमाणे झोकून देऊन काम करण्याची प्रवृत्ती पुढच्या पिढीत नाही' असे अॅलनला वाटत असे. याच सुमारास दूरदर्शनच्या प्रक्षेपणास सुरुवात झाली. करमणुकीच्या या नव्या साधनामुळे वाचकवर्गाची संख्या रोडावेल अशी भीती निर्माण झाली. काम करताना आता पूर्वीची मजा राहिली नाही, त्यात कशाची तरी कमतरता आहे याची खंत अॅलनला वाटत असे.

पेन्ग्विन प्रकाशन इंग्लंडच्या सीमारेषा ओलांडून इतरही अनेक देशात पोचल्यामुळे पेन्ग्विनचा व्याप प्रमाणाबाहेर वाढला होता. त्यामुळे पेन्ग्विन प्रकाशनाची सूत्रे पूर्वीप्रमाणे प्रमुख चार व्यक्तींच्या हाती राहिली नाहीत. पूर्वी मालक व प्रकाशक या नात्याने पुस्तक प्रकाशनाच्या कोणत्याही महत्त्वाच्या धोरणाबाबत अंतिम निर्णय अॅलनचाच असे. अॅलन हे पेन्ग्विनचे सर्वेसर्वा निर्णायक व्यक्तीमत्त्व होते. व्याप वाढल्यावर ते शक्य होईना. पेन्ग्विन प्रकाशनाची सूत्रे कॉर्पोरेट बॉडीच्या (निगम निकाय) हाती गेल्यामुळे 'हे प्रकाशन आता आपलं राहिले नाही' हे अॅलनच्या लक्षात आलं. तेव्हापासून त्यांनी प्रकाशनाच्या प्रत्यक्ष कामकाजातून काढता पाय घेण्यास सुरूवात आली. अनेक तरुण संपादक पेन्ग्विन प्रकाशनाचे काम सांभाळू लागले. या तरुण पिढीची मते अॅलनच्या पिढीपेक्षा निश्चितच वेगळी



अनुक्रमणिका

होती. योग्य, अयोग्य, नीती-अनिती, अश्लील– पवित्रतेच्या पुढील पिढीच्या संकल्पना ॲलनला पटणाऱ्या नव्हत्या. हे तरुण संपादक पेन्विनला नवीन साज चढविण्यास सज्ज झाले होते त्याना पेन्विन पुस्तकांच्या मुखपृष्ठावर रंगीबेरंगी आणि अनेक रंगी चित्रे छापायची होती. परंतु ॲलनने ती कल्पना फेटाळून लावली. ॲलनला न पटणाऱ्या आणि मानसिक अशांतता निर्माण करणाऱ्या विचारांचे वारे पेन्विनमध्ये वाहू लागले होते. 'सिने' हा सुप्रसिद्ध फ्रेंच चित्रकार होऊन गेला. त्याच्या चित्रांचे पुस्तक छापावे असे पेन्विनच्या एका तरुण संपादकाने ठरवले परंतु ती चित्रे अश्लील आणि धर्माविरुद्ध प्रचार करणारी आहेत असे ॲलनचे मत पडले. त्याने आपला विरोध नोंदवला. अखेर हा मुद्दा मताला टाकण्यात आला. संपूर्ण संपादक मंडळाने ॲलन विरुद्ध मत देऊन त्या तरुण संपादकाला पाठिंबा दिला. अखेर ते चित्रांचे पुस्तक पेन्विनने छापले. एका महिन्यानंतर एका रात्री ॲलन आपल्या जुन्या विश्वासू मदतनीसाला घेऊन पेन्विनच्या गोडाऊनमध्ये गेला. सिनेच्या चित्रांची सर्व पुस्तके आपल्या गाडीत घातली आणि गाडी घेऊन आपल्या शेतावर गेला. तेथे त्याने या सर्व पुस्तकांची होळी केली. साठीकडे वाटचाल करणाऱ्या ॲलनच्या मनातील परस्परविरोधी मूल्यांचे द्वंद्व या एका उदाहरणावरून स्पष्ट होते.

डेव्हन या आजोळगावाची ॲलनला ओढ होती. आपल्या बालपणातील सुटीचा काळ त्याने तेथील सवगंड्याबरोबर घालवला होता. साठीकडे झुकू लागलेला ॲलन आपल्या दोन्ही मुलीना घेऊन वरचेवर डेव्हनला जाऊ लागला. जुन्या मित्रांना भेटून त्यांच्याशी गप्पागोष्टी करू लागला. त्याचा हा काळ फार मजेत जाऊ लागला. 'डेव्हनमधील माझ्या या सहकाऱ्यांनी सिनेच्या चित्रांचे अश्लील (?) पुस्तक पाहिले असते तर त्यानी डेव्हनमधून मला हाकलून दिले असते.' ही भीती त्या पुस्तक जाळण्यामागे होती. जगप्रसिद्ध प्रकाशन संस्थेच्या मालकाने अशी भीती बाळगावी हे आश्चर्यकारक वाटते !

### लेडी चॅटर्लीचा खटला

पेन्विनच्या इतिहासातील आणि ॲलनच्या जीवनातील एक संस्मरणीय घटना म्हणजे १९६० सालातील पेन्विन प्रकाशनावरील खटला. सुप्रसिद्ध कादंबरीकार डी. एच्. लॉरेन्स यांच्या बहुतेक सर्व कादंबऱ्या १९५० साली पेन्विनने प्रकाशित केल्या होत्या. १९६० साली लॉरेन्सची पंचाहत्तरावी जयंती आणि तिसावी पुण्यतिथी होती. त्यानिमित्ताने त्याचे 'लेडी चॅटर्लीज लव्हर' हे राहिलेले पुस्तक प्रकाशित करावे असे पेन्विनने ठरवले आणि ते प्रकाशित केले. हे पुस्तक अश्लील आहे, असे अश्लील पुस्तक छापणे हा अक्षम्य गुन्हा आहे. असा आरोप करून पेन्विन प्रकाशनावर खटला भरण्यात आला. ग्रिफीथ जोन्स हे विरोधी पक्षाचे वकील म्हणून काम पाहत होते. त्यानी या पुस्तकातील अश्लील उतारे न्यायाधीशांच्या नजरेस आणून दिले. तसेच 'Love' लव्ह हा शब्द पुस्तकात किती वेळा

आणि कोणत्या स्वरूपात आला आहे हेही त्यांनी सांगितले. "असे पुस्तक तुम्ही तुमच्या आयाबहिणीना आणि मुलांना वाचायला द्याल कां?" असा खडा सवाल त्यांनी न्यायालयात केला. परंतु पेन्विनतर्फे जिराल्ड गार्डिनर या वकिलानी खटला चालवला. १९५९ साली केलेल्या ब्रिटिश कायद्यानुसार 'एखादे पुस्तक अश्लील आहे की नाही हे ठरवताना संपूर्ण पुस्तकाचा साकल्याने विचार करावा, त्यातील स्वतंत्र परिच्छेदांचा स्वतंत्रपणे विचार करून निर्णय घेणे गैर आहे' असा ठरावा झाला होता. त्याचा आधार गार्डिनर यानी घेतला. शिवाय 'हे पुस्तक आम्हाला अजिबात अश्लील वाटले नाही' असे सांगणारे पस्तीस साक्षीदार कोर्टात हजर केले. यात इ. एम्. फॉर्स्टर, रिबेका वेस्ट, व्हेरोनिका, वेजवुड, लॉर्ड ॲनन, स्टीफन पॉटर यासारख्या मान्यवरांच्या समावेश होता. अखेर खटल्याचा निकाल पेन्विनच्या बाजूने लागला. ॲलनचा विजय झाला. पेन्विनच्या प्रसिद्धीला आणि नावलौकिकाला गालबोट लागले नाही. ॲलनची आणि पर्यायाने पेन्विनची प्रतिष्ठा अबाधित राहिली. प्रख्यात लेखक अल्विन केरनान यानी 'दि डेथ ऑफ लिटरेचर' या आपल्या पुस्तकात या खटल्याची अनेक अंगानी चर्चा केली आहे. इतकेच नव्हे तर **विश्वविद्यालयीन पातळीवर वाङ्‌मयाचे अध्यायन करणारे प्राध्यापक, लेखक व विद्वान मंडळीना 'व्हॉट इज लिटरेचर?' "वाङ्‌मय म्हणजे काय" याची व्याख्या करता आली नाही हे केरनान यानी वाचकांच्या निदर्शनास आणून दिले आहे.**

**अखेरचे पर्व**

पेन्विनची पुस्तके प्रकाशित होत होती. आर्थिक आणि सामाजिक स्तरावर पेन्विनचा उत्कर्ष लक्षणीय होता. परंतु नवीन सहकाऱ्यांशी ॲलनची विचारसरणी जुळत नव्हती. बारीक सारीक मुद्यावर त्याचे इतरांशी खटके उडत होते. संघर्ष होत होते. ताणतणाव वाढत होते. १९६५ नंतरची तीन चार वर्षे प्रकाशनव्यवसायाच्या दृष्टीने ॲलनला त्रासदायक ठरले. त्याच सुमारास ॲलनची प्रकृति खालावली ॲलनला आतड्याचा कर्करोग झाला १९६९ साली ॲलनवर शस्त्रक्रिया करण्यात आली. शस्त्रक्रियेनंतरचा बहुतेक सर्व काळ त्याने डेव्हनला आपल्या शेतावर शांतपणे व्यतीत केला. मध्यंतरी १९६९ साली त्याने आपल्या प्रकाशनाव्यवसायाचे पन्नासावे वर्ष आपल्य सहकाऱ्यांसमवेत थाटामाटात साजरे केले. जॉन लेन यानी सोपवलेली कामगिरी ॲलनने यशस्वीरित्या पार पाडली. ७ जुलै १९७० रोजी ॲलनने जगाचा निरोप घेतला. बॉडले हेडचे प्रमुख आणि ॲलनचे गुरू जॉन लेन यांच्या शेजारी डेव्हनमधील हार्टलँड येथील चर्चमध्ये ॲलन चिरविश्रांती घेत आहे.

---

खास हक्क असलेल्या निरीक्षकाला आइनस्टाईनच्या जगात स्थान नाही. तसेच खऱ्या कादंबरीचेही असते. तिच्यातही खास हक्क असलेल्या निरीक्षकाला स्थान नाही.

**– सार्त्र**



अनुक्रमणिका

# नोंदवही

## १) पूर्ण विरामाची महती

मराठीतील विरामचिन्हांसंबंधी इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी अभ्यासपूर्ण लेख लिहिला होता. जुन्या काळातील ऐतिहासिक बखरी व इतर गद्य-पद्य लेखनाचा सखोल अभ्यास करून त्यांनी विरामचिन्हांविषयी आपले मत व्यक्त केले होते. त्यांच्या मते, "महाराष्ट्रांतील ग्रंथकारांना व लेखकांना इंग्रजी विरामचिन्हांची ओळख होईपर्यंत ।, ।।, : ह्या तीन विरामचिन्हांखेरीज इतर चिन्हे माहीत नव्हती. या चिन्हांखेरीज स्वल्पविराम, अर्धविराम, उद्‌गार, प्रश्नचिन्ह, अवतरण इत्यादि चिन्हे वापरण्याची चाल मराठी पद्यात तर नव्हतीच, पण गद्यातही नव्हती. विरामचिन्हांच्या बाबतीत मराठी भाषा फारच लंगडी होती." मराठी भाषेची विरामचिन्हांच्या बाबतीत अशी अवस्था असता तिचा इंग्रजी लेखनपद्धतीशी परिचय झाला व त्या भाषेतील बहुतेक सर्व विरामचिन्हे मराठी भाषेने उचलली. पूर्णविराम हे त्यापैकी सर्वात महत्त्वाचे ! लिखित वाङ्‌मयात महत्त्वपूर्ण कामगिरी बजावणाऱ्या पूर्णविरामाबद्दल इंग्रजीमध्ये व्यक्त केले गेलेले काही विचार –

धुळीच्या एका कणाएवढा छोटा, पेनच्या टोकाच्या पृष्ठभागावरील हलक्याशा स्पर्शामुळे निर्माण होणारा, संगणकाच्या कळफलकावर जणु काही ब्रेडचा छोटा कण ठेवावा त्याप्रमाणे भासणारा तो पूर्णविराम ! वाक्याचा शेवट झाला आहे असे सूचित करणारा पूर्णविराम हा खरोखरच आपल्या लेखनपद्धतीमधील कायदेकानून करणारा (विधिविधानकर्ता) आहे. परंतु त्याची दखलही कोणी घेत नाही.

या पूर्णविरामाशिवाय तरुण वर्दरच्या दु:खाची समाप्ती झाली नसती. शुद्धलेखनात पूर्णविराम नसता तर टोल्कीन या सुप्रसिद्ध कथालेखकाच्या गोष्टींतील कल्पित पण मानवसदृश असणाऱ्या 'हॉबिट' या जातीच्या छोट्या आणि केसाळ पायाच्या प्राण्यांचा प्रवास कधीच पूर्ण झाला नसता. या पूर्णविरामाच्या अनुपस्थितीमुळे जेम्स जॉईस या सुप्रसिद्ध लेखकाला 'फिनिगन्स वेक' ही वर्तुळाकार कलाकृती गुंफता आली. दिवस ज्या क्षणापासून चालू होतो त्याच क्षणी दुसऱ्या दिवशीपर्यंतच्या २४ तासात घडणाऱ्या घडामोडी आणि व्यक्तीच्या मनातील विविध विचार यावर आधारित ही कादंबरी आहे. इ. . १९३९ साली प्रकाशित झालेली ही कादंबरी म्हणजे साहित्यिक प्रयोगशीलतेचा परमोच्च बिंदू मानला जातो. ज्या ठिपक्याला मृत्यू गिळंकृत करतो त्या ठिपक्याशी मनुष्यप्राण्याच्या अत्यावश्यक अस्तित्वाची तुलना हेन्री मिचो या लेखकांनी केली आहे.

विचारपूर्तीनंतर दिलेला पूर्णविराम हा त्या विचारांच्या परिपूर्तीचा परमोच्च बिंदू ठरतो. निर्णायकत्वाचा आभास पूर्णविरामामुळेच निर्माण होतो. चणीने लहान असूनसुद्धा शीघ्रकोपी



अनुक्रमणिका

नेपोलिअनला जसा दिमाख प्राप्त झाला होता त्याप्रमाणे छोटासा आकार असूनसुद्धा पूर्णविरामाला एक विशिष्ट तोरा प्राप्त होतो. पुढे सरकण्यासाठी उत्सुक असल्यामुळे आपल्याला कार्याची सुरुवात झाली आहे हे सूचित करण्यासाठी कोणत्याही संकेताची जरुरी नसते, परंतु कोठे थांबावयाचे हे आपल्याला समजणे मात्र आवश्यक असते. 'मोमेंटो मोरी' हे सुप्रसिद्ध लॅटिन वचन. 'लक्षात ठेवा, तुम्हाला एक दिवस मरायचं आहे.' असा अर्थ या वचनातून ध्वनित होतो. "प्रत्येक गोष्ट कधी ना कधी तरी नष्ट होणार आहे, यात माणसाचासुद्धा समावेश आहे." याची आठवण हा पूर्णविराम (मोमेंटो मोरी) करून देतो. एका अनामिक इंग्रज लेखकाने इ. स. १६८० साली लिहिलेल्या "पूर्णविराम, बिंदू व स्वल्पविराम यावरील विवेचक ग्रंथात" पूर्णविराम हा परिपूर्ण अर्थ आणि परिपूर्ण वाक्य याची नोंद घेतो असे म्हटले आहे.

आपण लिहिलेल्या शब्दप्रयोगाची समाप्ती झाली आहे हे दर्शविण्याची गरज ही बहुतकरून लेखनाइतकीच जुनी आहे. परंतु त्यावरील 'पूर्णविरामाचा' हा छोटासा आणि सुंदर उपाय इटली या देशाच्या प्रबोधनकाळापर्यंत मांडला गेला नव्हता. विरामचिन्हांचा शोध लागण्यापूर्वीची कितीतरी शतके विरामचिन्हांचा वापर अनियमितपणे होत असे. इसवीसनाच्या पहिल्या शतकात (इ. स. ३५-९६) 'क्विंटिलियन' हा प्रख्यात स्पॅनिश लेखक होऊन गेला. तो प्रख्यात शिक्षक होता. 'वक्त्याचे प्रशिक्षण' या आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथात त्याने 'अलंकारशास्त्र आणि उत्तम वक्त्याचे प्रबोधन' याविषयी आपले विचार व्यक्त केले आहेत. 'वाक्याद्वारे एखादी संपूर्ण कल्पना व्यक्त करता आली पाहिजे पण त्याचबरोबर ते संपूर्ण वाक्य एका दमात उच्चारता आले पाहिजे.' असे क्विंटिलियनचे मत होते. हेन्री जेम्स हा अमेरिकेत जन्मलेला ब्रिटिश लेखक एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेला (इ. स. १८४३-१९१६) दि पोट्रेट ऑफ अ लेडी, दि टर्न ऑफ दि स्क्रू अशा कितीतरी कादंबऱ्या हेन्री जेम्सने लिहिल्या. त्याने आपल्या भाषणात वाक्य आणि वक्ता याबद्दलची आपली मते व्यक्त केली होती. योगायोग असा की क्विंटिलियनची मते हेन्री जेम्सच्या मताशी मिळती जुळती होती. वाक्याचा शेवट कसा करावा हा वैयक्तिक अभिरुचीचा प्रश्न असला तरी लेखनिक दीर्घकाळपर्यंत आपले लिखाण पूर्ण झाले आहे हे दर्शविण्यासाठी साध्या मोकळ्या जागेपासून विविध प्रकारचे बिंदू आणि लेखणीच्या फटकाऱ्यापर्यंत नाना विचित्र चिन्हांचा वापर करीत असत.

सेंट जेरोम हे पाचव्या शतकातील बायबलचे भाषांतरकार. यांनी एक अभिनव पद्धत शोधून काढली. त्या पद्धतीचे नाव होते 'पर कोला एटे कॉमाटा' या पद्धतीत विचार पूर्ण झाल्याचा संकेत नवीन परिच्छेदाची सुरुवात करावी त्याप्रमाणे समासातून बाहेर डोकावणाऱ्या एका अक्षराने केला जाई. तीन शतकानंतर पंकटस किंवा बिंदू हा स्वल्पविराम म्हणून वाक्याच्या अधेमधे आणि पूर्णविराम म्हणून वाक्याच्या शेवटी अशा दोन्ही हेतूने वापरीत

असत. अशा प्रकारच्या गोंधळया संकेतामुळे लेखकाला अभिप्रेत असलेला अर्थ वाचकांपर्यंत पोचण्याची शक्यता कमी होती.

इंग्रजीमध्ये 'पेपरबॅक' या स्वरूपात अनेक पुस्तकांच्या स्वस्त आवृत्त्या काढतात. 'पेपरबॅक' या पद्धतीत पुस्तके छापण्याचा प्रारंभ एका व्हेनेशियन मुद्रकाने केला. अल्डस मॅन्युशस हा त्या मुद्रकाचा नातू. त्याने विरामचिन्हांवर हस्तपुस्तिका काढली होती. त्याचे नाव होते 'इंटरपंजेंडी रेशो' 'विरामचिन्हांची नियमावली' यात मॅन्युशसने पूर्णविरामाची व्याख्या केली होती. त्या काळी लॅटिन ही युरोपीय ज्ञानव्यवहाराची भाषा असल्यामुळे या पुस्तिकेचे हेतू आणि पैलू शुद्ध व स्पष्ट लॅटिनमध्ये मॅन्युशसने नमूद केले होते. या हस्तपुस्तिकेच्या रूपाने मुद्रणकलाकारांना आपण विरामचिन्हांविषयीची नियमपत्रिकाच देत आहोत असे त्याला वाटले. या लेखकाच्या नंतर कितीतरी अभिजात साहित्य निर्माण होणार होते. शब्दाच्या उच्चारावर जोर देत तुकड्या तुकड्यांवर आघात करणारे हेमिंग्वेचे लेखन, वर्णनात्मक अथवा संभाषणात्मक उतारे संगीतात्मक पुरावृत्तीच्या स्वरूपात सादर करणारा बेकेट, लांब पल्लेदार वाक्ये लिहिणार प्राउस्ट अशा अभिजात कलाकृतीतील आशयाच्या आकलनाची आणि सुरेलतेची देणगीच त्या नियमपुस्तिकेच्या रूपाने मॅन्शुशस बहाल करीत होता. अर्थात् ही वस्तुस्थिती त्याला समजणे शक्य नव्हते !

वाक्यात योग्य ठिकाणी दिलेला पूर्णविराम ज्या ताकदीने हृदयाचा वेध घेतो त्याच्याहीपेक्षा अधिक ताकदीने जोरात खुपसलेले पोलादी शस्त्र हृदयापर्यंत पोचत नाही." असे आयझॅक बॅबेलने म्हटले आहे. शब्दाचे सामर्थ्य तसेच शब्दांचा दुबळेपणा या दोन्हीची कबुली देण्यासाठी पूर्णविराम या विश्वासू आणि निकाली अशा छोट्याशा ठिपक्याइतके आपल्याला दुसरे कोणीही उपयोगी पडलेले नाही.

पाश्चात्य वाङ्मयातील 'पूर्णविराम' या विरामचिन्हाची वाखाणणी किती परिणामकारक रितीने केलेली आहे हे अल्बर्टो मँग्वेल यांच्या या लेखावरून वाचकांच्या सहज लक्षात येईल. तरीसुद्धा इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी मात्र या पूर्णविरामाबद्दलचे आपले सडेतोड मत निर्भिडपणे नोंदविले आहे. "इंग्रजीत वाक्याच्या शेवटी पूर्णविरामाचे शून्य देतात तसेच एखाद्या शब्दाचा संक्षेप करावयाचा असला म्हणजेसुद्धा त्या शब्दाचे आद्याक्षर लिहून पुढे पूर्णविरामाचे शून्य देतात. म्हणजेच एकच चिन्ह दोन कार्याकरता योजले जाते. त्यामुळे लेखनात आलेले शून्य संक्षेपदर्शक आहे की पूर्णविरामदर्शक असा संभ्रम निर्माण होतो." तात्विकदृष्ट्या इतिहासाचार्य राजवाड्यांचे म्हणणे जरी संयुक्तिक असले तरी वाचनाच्या ओघात कोणत्याही हेतूने आलेला पूर्णविराम वाचकाला सहजी ओळखता येतो हेही तितकेच खरे आहे.

(आयझॅक बॅबेल : जन्म १८९४ रशियातील 'ओडिसा' येथे. हिब्रू, टालमूड, बायबल याबद्दलचे प्रशिक्षण घरी तर पदवीपरीक्षा ओडेसा येथे उत्तीर्ण. पंधराव्या वर्षी फ्रेंच

वाङ्मयाबद्दल औत्सुक्य निर्माण झाले. फ्रेंच भाषा आत्मसात. आपली पहिली कथा फ्रेंच भाषेतच लिहिली. ८ ते १० वर्षे राज्यक्रांतीत सक्रीय सहभाग. १९२३ पासून पुन्हा वाङ्मयीन क्षेत्रात पदार्पण. अनेक कथा व कथासंग्रह प्रकाशित. हिंसाचार आणि शांतता, पराकोटीचे क्रौर्य आणि हृदयाला हात घालणारा हळुवारपणा, विनोद आणि शोकांतिका अशा तीव्र विरोधाभासात्मक भावभावनांचा कलात्मक आविष्कार बॅबेलच्या कथात प्रकर्षाने जाणवतो)

– सुमती जोशी

## २) बुकर पारितोषिक

अरुंधती रॉय यांच्या 'दि गॉड ऑफ स्मॉल थिंग्ज' या कादंबरीला १९९७ सालचे बुकर पारितोषिक मिळाल्याचे जाहीर झाले. आंतरराष्ट्रीय दर्जाचे हे साहित्यिक पारितोषिक एका भारतीय लेखिकेने पटकावले याचा सार्थ अभिमान सर्व भारतीयांना वाटला. इंग्रजी साहित्याची उत्तम जाण असणाऱ्या मूठभर लोकांना या पारितोषिकाविषयी माहिती असली तरी इतर मराठी वाचकांना त्याविषयीची खुलासेवार माहिती नसते. त्यासाठी बुकर पारितोषिकावरील ही नोंद.

बुकर पारितोषिक हे इंग्लिशचे अत्यंत प्रतिष्ठित पारितोषिक असून ते 'कादंबरी' या साहित्यप्रकाराला देण्यात येते. ब्रिटिश, आयरिश अथवा राष्ट्रकुलातील देशाच्या (कॉमनवेल्थ कंट्रीज) नागरिकांनी लिहिलेल्या आणि वर्षभरात प्रकाशित झालेल्या कादंबऱ्या या पारितोषिकासाठी विचारात घेतल्या जातात. बुकर पारितोषिक देण्याची सुरूवात १९६९ सालापासून झाली. दरवर्षी ३० ऑक्टोबर या दिवशी हे पारितोषिक देण्यात येते. म्हणजे गेली ३० वर्षे ही प्रथा चालू आहे. त्यासाठी लागणारी आर्थिक तरतूद मॅकनील या बहुराष्ट्रीय कंपनीने केली आहे. या पारितोषिकाची रक्कम ३५ हजार डॉलर्स असून त्यावर कर आकारण्यात येत नाही. ब्रिटिशांच्या दृष्टीने या पारितोषिकाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. प्रत्यक्ष पारितोषिक वितरणाचे थेट प्रक्षेपण बी. बी. सी. वरून केले जाते. त्यावेळी बी. बी. सी. वर बिनीचे साहित्यिक, समीक्षक वगैरे जाणकार मंडळी येतात. आणि कार्यक्रमाचे धावते समालोचन करून त्यावर भाष्य करतात.

राष्ट्रकूल-देश, ब्रिटन आणि आयर्लंड यामधील प्रकाशक वर्षभरात अनेक कादंबऱ्या प्रकाशित करतात. त्यापैकी त्यांच्या दृष्टीने दर्जेदार असणाऱ्या कादंबऱ्या बुकर पारितोषिकाच्या निवड समितीकडे ते पाठवितात. प्रतिवर्षी या समितीकडे सुमारे दीडशे कादंबऱ्यांची हजेरी लागते. या निवडसमितीत प्रकाशक, लेखक, समीक्षक इ. पाच व्यक्तींचा समावेश असतो. ही पंच मंडळी या सर्व कादंबऱ्यांचे सम्यक् वाचन करून त्यातील सहा कादंबऱ्यांची निवड

करतात. ही निवडीची पहिली फेरी असते. या अवघड कामगिरीसाठी पंचांना भरपूर वेळ द्यावा लागतो. या निवडलेल्या सहा कादंबऱ्यांमधून एका कादंबरीची निवड बुकर पारितोषिकासाठी करावयाची असते. ही निवड करताना समितीतील पाचही सदस्यांचे एकमत झाले तर उत्तमच! पण तसे न घडल्यास वादग्रस्त पुस्तके मताला टाकतात. सर्वाधिक मते मिळालेल्या कादंबरीचे नाव 'बुकर पारितोषिकप्राप्त' म्हणून जाहीर केले जाते.

पुस्तकनिवडीची ही पद्धत स्पष्ट करण्यास १९९६ सालचे उदाहरण येथे देत आहे. १९९६ सालच्या निवड समितीकडे एकूण १५० कादंबऱ्या आल्या होत्या. त्यांचे वाचन करून पंचांनी पहिल्या फेरीत एकूण सहा कादंबऱ्यांची निवड केली. दुसऱ्या फेरीत त्यातील एका कादंबरीची पारितोषिकासाठी निवड करावयाची होती. परंतु त्याबाबत एकमत झाले नाही. ग्रॅहॅम स्विफट यांनी लिहिलेली. 'लास्ट ऑर्डर्स' आणि आयरिश कवी सीमस डीन यांनी लिहिलेली 'रिडींग इन दि डार्क' या दोनपैकी कोणत्या कादंबरीची निवड करायची याचा निर्णय करणे कठीण झाले. म्हणून या दोन्ही कादंबऱ्या मताला टाकल्या. शेवटी दोन विरुद्ध तीन मतांनी ग्रॅहॅम स्विफट यांच्या 'लास्ट ऑर्डर्स' या कादंबरीची सरशी झाली.

या कादंबरीची मूळ कल्पना अशी : लंडनमधील मित्रांच्या चौकडीचा एक सामाईक खाटिक मित्र ! 'मृत्यूनंतर माझी रक्षा सागरात विलीन करावी' अशी इच्छा त्या खाटिक मित्राने व्यक्त केली होती. आपल्या मित्राच्या या अखरेच्या आदेशाचे पालन करण्यासाठी या मित्रांनी केलेल्या केंटपर्यंतच्या प्रवासाचे वर्णन 'लास्ट ऑर्डर्स' या कादंबरीत केले आहे. अधूनमधून येणारे भूतकालीन घटनांचे चित्रण, वर्णनपर शैली आणि दक्षिण लंडनमधील बोली भाषेचा वापर ही या कादंबरीची वैशिष्ट्ये होत.

बुकर पारितोषिक जरी ग्रॅहॅम स्विफट यांच्या 'लास्ट ऑर्डर्स' या कादंबरीला मिळाले असले तरी दुसऱ्या फेरीपर्यंत आलेल्या इतर पाच कादंबऱ्यांचा दर्जासुद्धा सामान्य पातळीच्या खूप वरचा होता. त्यामुळे त्या पाच कादंबऱ्यांची व त्यांच्या लेखकांची नावे येथे नमूद करीत आहे.

मागरिट ॲटवुड यांचे 'अलायस ग्रेस'

बेरिल बेनब्रिज यांचे 'अेव्हरी मॅन फॉर हिमसेल्फ'

रोहिंटन मिस्त्री यांचे 'अे फाइन बॅलन्स'

शीना मॅके यांचे 'दि ऑर्चार्ड ऑन फायर'

पाश्चात्य देशात पुस्तक प्रकाशित झाल्यावर त्या पुस्तकाच्या एकूण किती प्रती खपल्या याच्या आकडेवारीची नोंद ठेवतात. तसेच या खपाच्या आकडेवारीनुसार प्रत्येक वर्षातील

पहिल्या पाच हजार पुस्तकांची यादी प्रसिद्ध करतात. त्या यादीतील प्रत्येक पुस्तकाला जनमान्यतेनुसार गुणानुक्रमही देतात. बुकर पारितोषिकप्राप्त अथवा ते पारितोषिक हुकलेल्या दुसऱ्या फेरीतील कादंबऱ्यांची नावे जाहीर होण्यापूर्वी त्यांच्या अनेक प्रती खपलेल्या असतातच असे नाही. कित्येकदा या कादंबऱ्यांचा वाचकांनी लावलेला गुणानुक्रम खूप खालचा असण्याचा संभव असतो. याउलट वाचकांनी उचलून धरलेल्या 'सर्वाधिक खपाच्या' कादंबऱ्यांची निवड बुकर पारितोषिकासाठी होते असे नाही. १९९६ सालच्या उदाहरणावरून ही गोष्ट अधिक स्पष्ट होईल. बुकर पारितोषिकाचा निकाल जाहीर होण्यापूर्वी सीमस डीन यांच्या 'रिडींग इन द डार्क' या कादंबरीच्या अवघ्या ७५ प्रती खपल्या आणि त्याचा गुणानुक्रम होता १६५५ वा. मागरिट अँटवुड यांच्या 'अलायस ग्रेस' या कादंबरीच्या ४८५ प्रतींची विक्री झाली होती तर तिचा गुणानुक्रमही बराच वरचा म्हणजे त्रेपन्नावा होता. बेरिल बेनब्रिज यांच्या 'अेव्हरी मॅन फॉर हिमसेल्फ' या कादंबरीच्या १६१ प्रती ब्रिटनमध्ये विकल्या गेल्या आणि तिचा गुणानुक्रम होती चारशे सव्वीसावा ! रोहिंटन मिस्त्री यांच्या 'अ फाइन बॅलन्स' या कादंबरीच्या ६६ प्रती विकल्या गेल्या होत्या आणि ती १९८१ व्या गुणानुक्रमावर स्थिरावली होती. शीना मॅके यांच्या 'ऑर्चार्ड ऑन द फायर' या कादंबरीच्या अवघ्या २० प्रतींची विक्री झाली होती. बुकर पारितोषिक पटकावलेल्या 'लास्ट ऑर्डर्स' या ग्रॅहॅम स्विफट यांनी लिहिलेल्या कादंबरीच्या ब्रिटनमध्ये फक्त तीन प्रती विकल्या गेल्या होत्या ! ही आकडेवारी वाचकांना स्तिमित करणारी आहे यात शंका नाही.

एकदा बुकर पारितोषिकाचा मान मिळाल्यावर मात्र त्या कादंवरीचे आणि बुकर पारितोषिक हुकलेल्या इतर दर्जेदार कादंबऱ्यांचे साहित्य समीक्षक मंडळी स्वागत करतात. या कादंबऱ्या इंग्रजी भाषेत असतात आणि इंग्रजी ही जगातल्या अनेक देशांची ज्ञानव्यवहाराची भाषा असल्यामुळे त्या कादंबऱ्यांना विस्तृत वाचकवर्ग लाभतो. पाश्चात्य देशातील वाचक पुस्तके स्वतः विकत घेऊन वाचतात. साक्षरता, आर्थिक सुबत्ता, जागेची मुबलकता, ज्ञानलालसा आणि पुस्तक विकत घेऊन वाचावे अशी मानसिकता अशा विविध कारणांमुळे अनेक व्यक्ती स्वतःचे स्वतंत्र ग्रंथालय आपल्या घरी तयार करतात. त्यामुळे पारितोषिक प्राप्तीपूर्वी दुर्लक्षित झालेल्या या कादंबऱ्यांना वाचकवर्गाकडून उत्तम प्रतिसाद मिळतो. कालांतराने अशा कादंबऱ्यांची जगातील इतर अनेक भाषात भाषांतरे होतात आणि त्या कादंबऱ्या जगाच्या कानाकोपऱ्यात पोचतात.

बुकर पारितोषिकाची निवड करताना दोन उद्दीष्टे साध्य करण्याचा प्रयत्न केला जातो. अत्युत्तम् साहित्यकृतीचा (कादंबरीचा) गौरव करणे हा पहिला उद्देश अगदी स्वाभाविक असाच आहे. पण त्याचबरोबर लेखकाने कल्पनासृष्टीतून साकारलेल्या गंभीर कादंबऱ्या–

विषयीची समाजाची जाण आणि आकलनक्षमता यांचा दर्जा उंचावणे असा सूक्ष्म आणि तरल असा दुसरा उद्देशही त्या कृतीमध्ये अभिप्रेत असतो. प्रत्यक्षात मात्र या दोन्ही उदात्त हेतूंची पूर्ती होते का हा प्रश्न सर्वसामान्यांच्या मनात रेंगाळत राहातो.

बुकर पारितोषिकाबाबत समाजात बरीच साधक बाधक चर्चा केली जाते. ही निवड अन्याय्य पद्धतीने केली जाते, पंच मंडळी सद्सद्विवेकबुद्धीला फाटा देऊन कादंबरीची अंतिम निवड करतात असा आरोप निवड समितीवर केला जातो. हा जनप्रवाद कितपत सार्थ आहे हे विषद करून सांगणारा एक लेख मार्टिन गॉफ यांनी २३ ऑक्टोबर १९९८ सालच्या न्यू स्टेट्समन या साप्ताहिकात लिहिला होता. मार्टिन गॉफ हे १९७२ सालापासून बुकर पारितोषिकाच्या पंचांच्या प्रत्येक मिटींगला हजर राहिले होते. आपल्या लेखात गॉफ यांनी बुकर पारितोषिकासाठी कादंबरीची अंतिम निवड करताना कसे घोटाळे होतात याचा साद्यंत वृत्तांत वाचकांपुढे सादर केला आहे.

१९८४ सालच्या बुकर पारितोषिक निवड समितीचे अध्यक्ष होते. रिचर्ड कॉब. हे अध्यक्षमहाशय ऑक्सफर्ड विश्वविद्यालयात 'आधुनिक इतिहास' या विषयाचे प्राध्यापक होते. 'कॉलेज दि फ्रान्स' येथे अतिथी प्राध्यापक हे पदही ते भूषवित असत. १९४५ ते १९५५ या संपूर्ण दशकात त्यांचे वास्तव्य पॅरिसमध्ये होते. कॉब यांनी स्वत:ची पहिली तीन पुस्तके फ्रेंच भाषेतच लिहिली होती. फ्रेंच राज्यक्रांती या विषयाचे ते एक अधिकारी लेखक मानले जातात म्हणूनच विद्वान म्हणून त्यांची ख्याती होती. तरीसुद्धा जेम्स जॉईस, प्रूस्ट यासारखे पहिल्या श्रेणीतील नामवंत लेखक कॉब यांनी अजिबात वाचले नव्हते. त्यांनी स्वत:च जाहीर सभेत हा गौप्यस्फोट केल्यामुळे वाचक आश्चर्यचकित झाले !

१९८४ सालचे बुकर पारितोषिक जे. जी. बॅल्लार्ड यांच्या 'दि अेम्पायर ऑफ दि सन' या कादंबरीला मिळेल असा साहित्यिकांचा व तज्ज्ञांचा अंदाज होता. परंतु प्रत्यक्षात मात्र अनिता ब्रुकनर यांच्या 'हॉटेल ड्यू लॅक' या कादंबरीची पारितोषिकाकरता निवड झाली. विशेष म्हणजे अवघ्या एका आठवड्यापूर्वी मार्टिन गॉफ यांना अनिता ब्रुकनर यांच्याबरोबर सहभोजनाचा योग आला होता. त्यावेळी 'बुकर पारितोषिक तुला मिळावे' अशा शुभेच्छा मार्टिन गॉफ यांनी अनिता ब्रुकनर यांना दिल्या होत्या. हे पारितोषिक आपल्याला मिळेल अशी सुतराम कल्पना नसल्यामुळे अनिता ब्रुकनर उद्गारल्या, 'हे पारितोषिक मला हुलकावणी देऊन गेले आहे. ते मला मिळण्याची मुळीच शक्यता नाही' अर्थात् शेवटच्या फेरीत मात्र विजयाचे पारडे याच लेखिकेकडे झुकले !

डेव्हिड लॉज यांनी ६ नोव्हेंबर १९९८ च्या स्टेट्समनच्या अंकात याबद्दलची अधिक

माहिती वाचकांपुढे ठेवली आहे. १९८४ च्या निवड समितीवर लेबर एम. पी. टेड रोलँड होते. पारितोषिकासाठी कादंबरीची अंतिम निवड करताना पंचांमध्ये चांगलेच मतभेद झाले. वरील दोन कादंबऱ्यांपैकी एका कादंबरीची निवड करावयाची होती. अशा कसोटीच्या वेळी पॉल डेव्हलीन यांनी हा निर्णय फिरवला. त्याचे असे झाले– डेव्हिड लॉज यांनी अनिता ब्रुकनर यांच्या एका कादंबरीचे परीक्षण केले होते. त्या परीक्षणातील अनिता ब्रुकनर यांच्याबद्दलचे प्रशंसोद्गार 'होटेल ड्यु लॅक' या कादंबरीच्या मलपृष्ठावर छापले होते पॉलीडेव्हलीन यांनी निर्णायक क्षणी या उद्‌गारांचे परिणामकारक वाचन पंचांच्या सभेत केले! त्याचा परिणाम म्हणजे पारितोषिकाच्या निवडीबाबत झालेला निर्णायक बदल !

इ. स. १९८८ सालीसुद्धा निवड समितीच्या अखेरच्या सभेत पडद्यामागचे नाट्य घडले! या सभेचे अध्यक्ष होते मायकेल फूट. 'सलमान रश्दी यांच्या 'सटॅनिक व्हर्सेस' या कादंबरीची निवड बुकर पारितोषिकासाठी व्हावी असे मला वाटते' असे सांगून मायकेल फूट यांनी इतर सदस्यांचे मत विचारले. त्यावेळी ब्लेक मॉरिसन, सेबेस्टियन फॉक्स, फिलिप फ्रेंच या तीनही सदस्यांनी पीटर कॅरे यांच्या 'ऑस्कर अँड ल्युसिंडा' या कादंबरीचे नाव सूचित केले. मायकेल फूट यांनी आपले म्हणणे ताबडतोब मागे घेतले. "मी लोकशाही तत्त्वाचा पुरस्कर्ता आहे. बहुमताने जे मान्य होईल त्याचीच निवड होणे योग्य" असे म्हणून त्यांनी पीटर कॅरे यांच्या 'ऑस्कर अँड ल्युसिंडा' या कादंबरीचे नाव पारितोषिकासाठी जाहीर केले. वास्तविक अंतिम निर्णय घेण्यापूर्वी रश्दी आणि कॅरे यांच्या साहित्यकृतींवर तुलनात्मक चर्चा व्हावी असे मॉरिसन आणि फॉक्स यांना वाटत होते. त्याच उद्देशाने त्या सर्वांनी कॅरे यांचे नाव सुचविले होते. परंतु हा उद्देश मायकेल फूट यांच्या लक्षात आला नाही. लोकशाही तत्त्वांचा पुरस्कार करीत त्यांनी अंतिम निर्णय घेतला आणि या संभाव्य, आकर्षक चर्चेला सुरुवात होण्यापूर्वीच अचानक आणि ठामपणे पूर्णविराम दिला गेला !

त्यानंतरच्या वर्षी म्हणजे १९८९ सालीसुद्धा अशा प्रकारच्या घोटाळ्याची पुनरावृत्ती झाली. बुकर पारितोषिक मिळण्याची शक्यता असणाऱ्या संभाव्य लेखकांची यादी जाहीर झाली तेव्हा मार्टिन अमीस आणि अँजेला कार्टर या दोघांची अपेक्षित असलेली नावे वगळण्यात आली होती. त्यामुळे लोकांना फार आश्चर्य वाटले. निवड समितीचे १९८९ सालचे अध्यक्ष होते डेव्हिड लॉज. त्यांनी मार्टिन अमीस यांच्या नावाला जोरदार पाठिंबा दिला होता. निवड समितीचे इतर दोन सदस्य डेव्हिड प्रोफ्युमो व अेडमंड व्हाइट या उभयतांचा मार्टिन अमीस यांच्या 'लंडन फील्डस्' या कादंबरीची निवड करण्याचा मनोदय होता. परंतु त्या वर्षीच्या निवड समितीच्या दोन स्त्री सदस्या मॅगी गी आणि हेलन मॅकनील यांनी मार्टिनच्या नावाला कडाडून विरोध केला होता. 'मार्टिन स्त्रीद्वेष्टा आहे' असा या

पंचद्वयांचा आरोप होता. हे आरोप सिद्ध होतील अशा प्रकारचे कादंबरीतील उतारे मॅगी गी यांनी पंचांच्या सभेत सादर केले. खरं पाहता तीन विरुद्ध दोन अशा बहुमताने मार्टिन अमीस यांच्या 'लंडन फील्डस्' या कादंबरीची निवड होणे आवश्यक होते. पण डेव्हिड लॉज यांनी नमते घेतले ते मॅगी गी निवड समितीच्या सदस्यत्वाचा राजिनामा देतील या भीतीपोटी ! "डेव्हिड लॉज" यांना आपल्या निर्णयाचा पश्चात्ताप होत राहिला असा बोलबाला साहित्यिक वर्तुळात झालाच !

याबद्दलचे स्पष्टीकरण डेव्हिड लॉज यांनी न्यू स्टेटसमनमधील (६ नोव्हें १९९८) लेखात दिले आहे. डेव्हिड प्रॉफ्युमो हेही त्यावर्षीच्या निवड समितीवरील आणखी एक पंच हे वर आलेच आहे. दोन स्त्रीपंचांनी सबळ कारण आणि पुरावे देऊन जोरदार विरोध केल्यावरही त्या विरोधाला न जुमानता म्हणजेच दोन पंचांच्या मताला किंमत न देता मार्टिन अमीस यांच्या 'लंडन फील्डस्' या कादंबरीची निवड करण्यास डेव्हिड प्रॉफ्युमो अजिबात तयार नव्हते. डेव्हिड लॉज म्हणतात, "अंतिम निवड करताना मताधिक्याला महत्त्व न देता सद्सद्विवेकबुद्धीला स्मरून निर्णय घ्यावयाचा असे आम्ही आधीच ठरविले होते. त्यामुळे आम्ही मार्टिन अमीस यांच्या 'लंडन फील्डस्' या कादंबरीची निवड केली नाही."

बुकर पारितोषिक वितरणाची सुरुवात झाल्यानंतर पहिल्याच दशकात लेखक, प्रकाशक, सर्वसामान्य नागरिक या सर्वांचे लक्ष या पारितोषिकावर केंद्रित झाले. १९८० च्या सुमारास उच्च वाङ्मयीन अभिरुचीचे वलय या पारितोषिकाभोवती निर्माण झाले. या पारितोषिकाची प्रतिष्ठा आणि लोकप्रियता टिपेला पोहोचली. परंतु पुढील दशकात मात्र या पारितोषिकाचे वाङ्मयीन मूल्य कमी होऊ लागले. एखाद्या चित्राचे रंग कालांतराने फिके व्हावेत तशी बुकर पारितोषिकाची प्रतिष्ठा काही प्रमाणात कमी झाली. हे असे का झाले असावे त्याची थोडीफार कल्पना वर सांगितलेल्या बहुचर्चित किश्श्यांवरून आपल्याला येते. पारितोषिकाबाबत तक्रारीचा सूर समाजमनात उमटतो. 'पंच अनेक वेळा चुकीच्या पुस्तकाला सन्मानित करतात. त्यामुळे दर्जेदार साहित्याला कधीकधी अगदी सामान्य पातळीवर आणले जाते, लेखकांचा मानभंग केला जातो." अशा प्रकारच्या कुरबुरी ऐकू येतात. पंच त्यांच्यावर सोपवलेले काम कितपत प्रामाणिकपणे करतात, पंचांच्या मनात एखाद्या लेखकाविषयी असलेला जिव्हाळा किंवा वैयक्तिक नावड अंतिम निर्णय बदलण्यास किती परिणामकारक ठरतात. हे लोकांच्या चांगलेच लक्षात आले आहे.

**–सुमती जोशी**

---

माझा मित्र एकाक्ष असला तर मी त्याचा चेहरा बाजूनेच पाहतो.

**–जोसेफ मोबर्ट**

# आमची प्रकाशने

## थोडाबहुत काफ्का

शकुनी. कनयाळकर

मूळ किंमत रु. २००/ -   सवलतीची किंमत रु. १२०/-

## डोस्टोएवस्कीचा का[illegible]ास

श्री[illegible]मत

मूळ किंमत रु. १५०/-   [illegible]ीची किंमत रु. [illegible]

## संगीत आणि मनोविज्ञान

श्री. ह. देशपांडे

मूळ किंमत रु. ३००/-   सवलतीची किंमत रु. १५०/-

## प्रेमपुजारी डी. एच. लॉरेन्स

श्रीकृष्ण कामत

मूळ किंमत रु. ४००/-   सवलतीची किंमत २००/-

---

**केवळ 'नवी क्षितिजे' व 'तपशील' यांच्या वर्गणीदारांकरिता**

---

अनुक्रमणिका